**सारण.**— ( हांसून ह्म० ) अहाहा! क्षत्रियाधम **कौशिक** याची उपायज्ञता केवढी ही! अहो **ताटिका** बाई, यज्ञाचें मिष करून **सीता** व **राम** यांचें लग्न साधून घ्यावें एवढ्याकरितां **जनक** आणि **कौशिक या** उभयतांचा हा उद्योग आहे.

**ताटिका.**—मिष तें कशाकरितां बरें?

**सारण.**—आपले महाराज **सीते**ला मागून घेतील म्हणून.

**ताटिका.**—असें आहे तर मीच महाराजांकरितां **जानकी**चें हरण करून तिला घेऊन येतें.

**सारण.**—नाहीं नाहीं, हरण करून आणणें उपयोगीं नाहीं.

**आर्या.**

हरिली बळेंच जरि, तरि **दशानना** ती न होय अनुरक्त.
प्रभुला[१] न मान्य तें ही, कांकीं तो **जनकराज** शिवभक्त.२४

गोष्ट,

**आर्या.**

हिमगिरिवरि **रंभे**ला धरितां शापा दिलें तिनें प्रखरा;
यास्तव रक्षःपति[२] ही करुं नशके स्त्रीवरी बलात्कारा. २५

( परंतु असें असें करायाचें ह्मणून तो तिच्या कानांत सांगतो. )

**ताटिका.**—( ऐकून हर्षानें ह्मणते) त्वां ही चांगली मसलत योजिली!

**आर्या.**

या योगेंचि **दशास्या**, जाणावें, **जानकी** सुलभ आहे-
कपट्याशीं कपटानें वर्तावें हेंचि योग्य, बा, पाहें. २६

असो, आतां मी जातें आणि **कौशिक** हा मार्गांत रात्रीच्या वेळीं निजलेला पाहून मायेच्या योगानें त्याला त्याच्या सेवकजनासुद्धां मारून टाकितें. तूंही लंकेंत जाऊन **रावणमहाराजा** कडून प्रस्थान करीव.

( असें म्हणून निघून जाते )

---

टीप.—१ रावणाला. २ रावण.

**सारणः. —**

ताटकायाः सहायार्थं जयस्यानियमादितः
मायावी पुत्रमारीचः सानुगः प्रेषयिष्यते. २३

( इति निष्कांतः मिश्रविष्कंभकः )

( ततः प्रविशति विद्युज्जिव्हेन सारणेनच दशाननः )

**दशाननः —**

द्रष्टव्या जनकात्मजेति कुतुकं धत्ते दृशां विंशति,
बांहूनामपिसा तथैव रभसादालिंगितव्येति मे,
किंत्वस्या त्हृदयाय नामिरुचितं रूपंधिगेताद्दशं,
हा कष्टं ! नृपशोरपि स्वयमतोधर्तव्यमास्ते वपुः. २४

**अपिच**

सीरध्वजे सहजमप्रकटय्य रौक्ष्यं
माहेश्वरप्रणयपालनपात्रतोमे,
कन्यानिमित्तमनुकर्तुमनर्हवेषं
मानः कथं कथय सत्रपयोज्झितव्यः ? २५

**सारणः.—** महाराज; मानहानि रित्यलमावेगेन.

दिक्पालैरपियः क्षुण्णो दमयंतीस्वयंवरे,
अपूर्वः किमयं पंथा येन त्वमपि यास्यसि ? २६

**विद्युज्जिव्हः —** ( सपुलकोद्भेदं स्वगतं. ) दिक्पालैरिव दमयंती रा-
ज्ञा प्रार्थितापिनलभ्यतेजानकी. ( प्रकाशं )

सारण— **आर्या.**

जयसंदिग्ध ह्मणुनियां "जावें त्वां सांगुं[1] त्वरें करूनी
साह्यार्थ तात्विकेच्या " पाठवितों तत्सुतास[2] हें कथुनी. २७.

( असें बोलून निघून जातो. )

( ही पूर्वोत्तरकथेची संगती. )

( तदनंतर **विद्युज्जिव्ह** आणि **सारण** यां सहवर्तमान **रावण** पडद्याच्या बाहेर येतो. )

**रावण—** **श्लोक.**

देखावी **जनकात्मजा** असि विसां डोळ्यांस ही वासना,
बाहू वांछिति हे मदीय तितुके[3] तीच्या दृढालिंगना.
उत्कंठा मजला, परंतु तिजला हें रूप कीं नावडे,
तस्मात् धिग् मज हें मनुष्य पशुचेंही रूप घेणें पडे. २

आणखीही **श्लोक.**

श्रीसांबभक्त **मिथिलेश्वर**[4] जाणुनी तो,
स्नेहा धरोनि निजरूक्षपणा त्यजीतों[5].
कन्यानिमित्त धरुनी अतिनीच रूपा,
लज्जेसव[6] त्यजुं कसा निजमान, बापा. २९

**सारण.—** महाराज खेद कशाला करितां? यांत कांहीं मानहानि आहे असें नाहीं.

**आर्या.**

दिक्पतिनींही धरिली जी **दमयंती**स्वयंवरीं वाट,
नोहे अपूर्व, यास्तव तुह्मी धरा तीच, हो, अतां नीट. ३०

**विद्युज्जिव्ह—** (सरोमांच होऊन मनांत ह्मणतो) अरेरे, ह्या दृष्टांतावरून तर दिक्पालांना जसी **दमयंती** प्राप्त झाली नाहीं, तशीच महाराजांनीं याचना केली तरी त्यांनाही **जानकी** प्राप्त होणार नाहीं असें दिसतें ! असो. (मोठ्यानें **रावणा**स. ह्म०)

---

टीप.-१ सेवकांसुद्धां. २ मारीचास. ३ वीस. ४ जनक. ५ टाकितों (मी). ६ लाजेसुद्धां.

रघुशिशुपरतंत्रं मेदिनीकन्यकाया

स्त्वयिन्हृदयमुपायैः शक्यते नोपनेतुं;

तवच जनकराजे तादृशं प्रेम सख्यौ;

तदय मृजुरमुष्याः संग्रहे, पश्य, पंथाः. २७

**दशाननः.**—भवत्वेवं तावत्, अनतिलंघनीयं मया वोवचनं. सारण, तदेहि, पुष्पकमुपनय नःप्रस्थानाय.

**सारणः.**— यदाज्ञापयतिदेवः ( इति निष्क्रम्य पुष्पकेणसहप्रविश्य ) महाराज, विमानमिदमुपनीतं.

**विद्युज्जिव्हः.**—

एतद्दिग्विजयैकसाक्षि भवतस्त्रैलोक्यबंदीगुरु-

श्वासोद्भेदविभिन्नवर्णवलभीपर्यंतमुक्तासरं,

अस्पृष्टं निजपुष्पगंधमिलनत्रासान्नभोवायुना,

मायामेघनिगूढमंबरतलादभ्येति यानं पुरः. २८

**दशाननः.**— ( दृष्ट्वासामर्षं विहस्य ) अयि, मन्ये दुर्बलइवचोरवृत्तिमनुरुंधन्नधुना दशकंधरोयमपूर्वइति मयिविश्रंभादिवस्वयं अपूर्वतामवलंबते विमानमिदं.

अक्रूरविनिवर्तितग्रहविमानमप्रांजलि-

प्रणम्रसुरमस्तुतिप्रवणसिद्धविद्याधरं,

अदृप्तरजनीचरस्तनितमिश्रदिव्यांगना

करप्रहतडिंडिमध्वनि, यदेवमास्तेपुरः. २९

सीतेचें मन राघवींच, जडलें, तेसेंचि तुह्मावरी
अन्योपायवशें जडेल, नघडे ही गोष्ट कल्पांतरीं.
तत्तातीं[1] दृढ सख्य आणि तुमची प्रीती असे फार हो,
तेणें तीस वरावयास्तव धरा ह्या मार्ग, देवा, अहो. ३१

**रावण.**— बरें आहे, तसें होऊं द्या १ तुह्मां उभयतांचें वचन मला मोडवत नाहीं. **सारणा**, चल तर आतां आपणास जाण्याकरितां पुष्पकविमान घेऊन ये.

**सारण.**—आज्ञा महाराज, (असें ह्मणून बाहेर जाऊन पुष्पकविमान घेऊन येतो आणि ह्मणतो ) महाराज, हें पुष्पकविमान आणिलें.

**विद्युज्जिव्ह.**—

### श्लोक.

हें तें दिग्विजयैकसाक्षि[2] तुमचें, बंदीजनाचे कसें
श्वासें मौक्तिकझालरी विटुनि ह्यां[3] वैवर्ण्य आलें असे;
लागेना निजगंध यास ह्मणुनी वायू शिवेना अहा !
मेघाच्छादित हें विमान गगनाथासूनि येतें पहा. ३२

**रावण.**- ( त्याकडे पाहून व रोषानें हास्यकरून ह्मणतो ) हरहर ! दुर्बलाप्रमाणें चोरवृत्तीचें अवलंबन करून हा **दशकंधर** अपूर्वच झाला, पूर्वीचा राहिला नाहीं ! आणि मला विश्वास वाटावा यास्तवच जसें काय हें विमानही अपूर्वताच धारण करितें, तें असें कीं.

### श्लोक.

यानें ग्रहांचीं[4] हि न दूर होती, जोडोनि पाणी न सुर स्तवीती;
तसाचि विद्याधरसंघ हाही, ज्याला[5] प्रणामास करीत नाहीं. ३३
उन्मत्त जे कां गण राक्षसांचे, चंड ध्वनी ह्माजपुढें नत्यांचे,
तशाच त्या किन्नरवाद्यकाही, न डिंडिमा[6] ताडिति आजि कांहीं.३४

---

टीप.–१ सीतेचा बापाशीं. २ दिग्विजयाचे साक्षी. ३ विमानाला. ४ ग्रहांचीं विमानें. ५ ज्या विमानाला. ६ वाद्यविशेष.

**विद्यु०—** महाराज, मामैवं. अभिमतरूप परिग्रहवशीकृतायाः सीतायाः निवृत्ते करग्रहणमंगलोत्सवे, नंदितेच जगदीश्वरवरलाभेन जनकराजे, विदितमवत्प्रतापपरितोषितया कन्ययासहैव प्रतिनिवृत्तेच महाराजे भविष्यति पुनस्तादृशमेव विमानमिदं पुष्पकं. तदारुह्यतांदेवेन. ( दशमुखःविद्युज्जिव्हेन सारणेनचसह विमानारोहणं नाटयति )

**सारणः—** पश्य महाराज,

> अंतःप्रापितकूर्मनक्रमकरोनांभोनिधिः स्पंदते,
> धत्ते मंडलमेषरत्नमुकुरच्छायं रुचीनां पतिः,
> वातश्चंदनवल्लरीकिसलयस्पंदावधि दृश्यते,
> लंकायाश्चलिते बहिः पदमपि स्वामिन्विमानेतव. ३०

**विद्यु०—** किमिदमाश्चर्यस्थानमेतस्य, कैलासशैलसमुत्क्षेपव्यपोहितकंदुकक्रीडाविनोदस्य, कारागृहकुटुंबीकृतजंभद्विषः, निरवधिकमायाधुरंधरस्य दशकंधरराजस्य ?

**दशान०** ( सविमर्शं. )

> कैलासाद्रेर्भुजबलमपि व्यक्तमासीत्पुरस्ता,
> द्दिक्पालानामपिचपुरतो दर्शितः शस्त्रधारः,
> युक्तोस्माभिस्तदयमधुना व्यक्तमव्यक्तपूर्वो
> मायावेषग्रहणपटिमा मैथिलस्याग्रएवं. ३१

सारण, त्वरयतदिमं विमानराजं.

**विद्युज्जिव्ह.**- महाराज, हें काय मनांत आणितां? कांहीं चिंता नाहीं, **सीते**ला प्रिय जें **राम**स्वरूप तें आपण घेतल्यानें ती वश होईल; मग विवाहमंगलोत्सव होईल; नंतर, वाहवा! साक्षात् त्रैलोक्याधीशच आपणाला जांवई मिळाला, खासी गोष्ट झाली! असा **जनका**स फार आनंद होईल; नंतर महाराजांचा पराक्रम श्रवण करून **सीता**ही संतुष्ट होईल; नंतर, शेवटीं **सीते**ला घेऊन महाराजांची स्वारी **लंकापुरीस** परत जाऊं लागेल, तेव्हां पुनश्च हें विमान पूर्वीप्रमाणें समारंभानें युक्त होईल. तर आतां बसावें यांत महाराजांनीं.

( नंतर **विद्युज्जिव्ह** आणि **सारण** यांसह **रावण** विमानांत बसल्या सारिखें करितो ).

**सारण.**— पहावें महाराज;

**श्लोक.**

हालेना तळिं घालुनी जळचरां अंभोनिधी हा पहा,
रत्नादर्श जसा तसा मृदुरुची झाला असे सूर्य हा,
वारा, चंदनपालवी हळु हले ऐसाचि वाहे खरा,
बाहेरी निघतां विमान तुमचें सोडूनि **लंकापुरा**. ३६

**विद्युज्जिव्ह.**- अहो! ज्यांनीं चेंडूप्रमाणें **कैलास**पर्वत सहज झेलून क्रीडा केली; इंद्रालाही ज्यांनीं बंदीखान्यांत घातलें; आणि जे निःसीम मायावीपुरुषांमध्यें धुरंधर; असे हे **दशकंधर** महाराज त्यांना ही गोष्ट आश्चर्यकारक आहे काय?

**रावण.**— ( विचार करून म्हणतो ).

**साक्या.**

**कैलासाही** पुढें दाविलें पूर्वी निज भुजसार[1];
दिक्पालांच्या पुढेंहि तैसी गाजविली तलवार; ३६
मायावेषग्रहणकुशलता गुप्त आजवरि होती;
दाउनि **जनका** पुढें अतां ती[2] विषयींहि मिळवूं ख्याती. २

तर आतां, **सारणा**, ह्या विमानराजस लौकर लौकर चालीव बरें.

टीप.—१ भुजबळ. २ मायावेषग्रहणकुशलतेविषयीं.

**सारणः—** राजन्नजानासि भवानुत्पतनवेगमेतस्य ?

पश्योपर्यवरोहतीव शिखरिस्थूलोडुचक्रं नभो

रेखीभूतसमुद्रवेष्टितमधो विभ्रश्यतीव क्षितिः

पाषाणद्रुमवल्लरीवलयितौ पूर्वापराद्री पुन

र्गृह्णीतः समरेखतामिव जवादस्मिन्नसमुज्जृंभिते ३२

**विद्यु०—** अये कथमवतीर्णाएव वयं एकोत्पतनेन प्रज्ञविनो विमानराजस्य पचेलिमफलभरपरिणद्धमुग्धबहुलतरतरुणतरुखंडमंडितपर्यंतमहीतलं, प्रशांतमृगपक्षिगणाकीर्णपरिसरारण्यं, पुण्यमिदमाश्रमपदं कुशिकनंदनस्य ! यदिदानीं

गिरिकटककठोरग्रावसंघट्टशीर्य

न्निविडचटुलनीरालीढवानीरकुंजा,

वनकरिकरकेलीकृष्टनालीकनाला,

मदमुदितशकुंता, दृश्यते कौशिकीयं ! ३३

**दशान०—** ( सारणं प्रतिसोत्कंठं )

आकंठांबुनिमग्नतापसशिरश्चंचज्जटामंडल

त्रासोद्भ्रांतरथांगनाममिथुनक्रेंकारनीरंध्रया,

आकाशादनया, दिशावतरतु क्षोणीमिदंपुष्पकं,

यत्रावातिधुतांबुजो जनकजानिःश्वासरम्योनिलः. ३४

**सारण.—** महाराज, ह्याच्या उड्डाणाचा वेग किती जलद आहे तो आपण जाणला नाहीं. पहापहा !

### श्लोक.

शैलस्थूलभमंडलासहित[1] हें आकाश ये खालतीं,
रेखीभूत समुद्रवेष्टित असी खालीं पडे कीं क्षिती,
पाषाणद्रुमवल्लरीसहित हे पूर्वापराद्री कसे
येती हो समरेखतेस ! दिसतें वेगें जयाच्या असें. ३८

**विद्युज्जिव्ह.—** अहो काय आश्चर्य हें ! ह्या विमानराजाचा केवढा वेग हा ! ह्याच्याएक्याच उड्डाणानें आपण **कौशिका**च्याआश्रम-प्रदेशाजवळ येऊन ठेपलों ! अहाहा ! हा आश्रमप्रदेश किती पवित्र दिसतो ! ह्याच्या समोंवतीं तरुण तरुण वृक्षांची बनेचीं बनें कशीं लागून गेलीं आहेत ! ते वृक्षही परिपक्व झालेल्या फळांनीं कसे लडून निघाले आहेत ! आणि त्या फळांच्या भारानें लवल्यामुळें ते किती रमणीय दिसताहेत बरें ! तसेंच येथील अरण्यामध्यें पशुपक्षीहि किती तन्हेतन्हेचे आहेत व ते क्रूर नसून किती शांत आहेत ! आणखी पहा येथें,

### साक्या.

गिरिकटकाच्या[2] घट्ट शिलांवरि अदळुनि झुळ झुळ वाहे,
तें हें जल वेतसकुंजांतें[3] वेढुनि कैसें राहे. ३९
वन्यगजांनीं कीडेनें कमलाचीं नालें जीचीं,
आकर्षुनि घेतलीं; पाखरें खेळति जयेंत साचीं. ४०
असी **कौशिकी** नदी; दिसे हें रम्यहि वाळूवंट;
फलपुष्पाकुलतरुखंडानें युक्त जिचे हे कांठ. ४१

**रावण,—** ( उत्कंठित होऊन **सारणा**प्रत म्हणतो ).

### श्लोक.

आकंठांबुनिमग्नतापसजटा पाहोनियां साध्वसें,
केंकारा[4] करिती रथांगमिथुनें[5] ज्यादिग्विभागीं असे,
त्या मार्गें उतरो विमान तिकडे, ज्या भूप्रदेशीं खरा
सीताश्वास विमिश्र शीतल मरुत्[6] सद्गंधि वाहे बरा. ४१

---

टीप.—१ पर्वता एवढाले मोठाले नक्षत्रमंडलासहित. २ पर्वताच्या कड्याच्या. ३ वेतांच्या जाळीला. ४ केंकारशब्द. ५ चक्रवाक पक्ष्यांचेजोडे. ६ वारा.

**सारण०—** महाराज, यथाभिमतमवतीर्णमिदं पुष्पकं. ततोयावद
वतरामो वयमस्मादस्मिन्नेव विविक्तरमणीये कौशिकीतीरे. ( सर्वे
विमानावरोहणं नाटयंति )

**दशा०—** यावदस्मदागमनमिदमदृश्यमत्रैव तिष्ठतु.

**सारण०—** अतः परमस्माभिस्तिरस्करिणी प्रभावादनालक्षितकैतवै
राक्रांतव्या भूमिभागाः. यतः

नीरंध्रपर्णनिवहः परितस्तरूणां,

शार्दूलचर्मकुशविष्टरसांद्रमूलः,

तस्याश्रमं कथयतीवमुनेः प्रकृष्टं

शाखाभिरुज्वलमृगाजिनवल्कलाभिः. ३५

**दशा०—** युक्तमभिहितं सारणेन, यदस्माभिर्निभृतमुपलब्धव्या
किंवदंती.

**विद्यु०—** ( चक्षुषी निमील्य तिरस्करिणीं विद्यामभिध्यायते )

**दशा०—** ( पर्यंतेदत्तदृष्टिः ) कावेतौ समित्कुशपाणी, वर्णिनाविव
एवाभिवर्तेते. ?

**सार०—** भवितव्यमेताभ्यां गाधिसूनोरंतेवासिभ्यां.

( ततः प्रविशतोद्वौवर्णिनौ. )

**सारण.**— महाराज, आपल्या मर्जी प्रमाणें हें विमान खालीं उत-रलें. आतां हें **कौशिकी**नदीचें तीर रमणीय आहे., व येथें कोणाचा संचारही नाहीं; म्हणून ह्या ठिकाणींच ह्याला उभें क-रूं, आणि यांतून आपण जमिनीवर उतरूं.

( असें बोलून तिघेही विमानांतून उतरल्याचा भाव करितात. )

**रावण.**— आपण परत येऊं तोंपर्यंत ह्या विमानानें येथेंच अदृश्य रूपानें असावें.

**सारण.**— आतां ह्या उपर असें उघड फिरणें उपयोगीं नाहीं, तर तिरस्करिणीविद्येच्या बलानें अदृश्य होऊन आपलें कपट को-णाच्या दृष्टीस येणार नाहीं असें करून मग येथें इतस्ततः संचार करायास लागावें. कारण, ऋषींचें वसतिस्थान जवळ आलें अ-सें वाटतें. कशावरून म्हणाल तर,

### साक्या.

समीपवर्ती अति निबिड वृक्ष हे, तळीं तयाच्या थोर
व्याघ्रचर्मकुशनिर्मित पडलीं आस्तरणें हीं फार ; ४३
शाखांवरि मृगचर्म उज्वल लोंबत वल्कलभार;
ऋष्याश्रम अतिनिकट असे हा कथितो जणूं प्रकार. ४४

**रावण.**—याउपर अदृश्य रूपानेंच संचार करावा असें **सारणा**चें म्हणणें आहे तें बरोबर आहे. कारण एथील लोक काय बोलतात काय नाहीं, याचा शोध आपणाला पक्का काढावयाचा आहे.

**विद्युज्जि**०-(डोळे मिटून तिरस्करिणी विद्येच्या मंत्राचा जप करितो).

**रावण.**—( दूर नजर लावून पाहिल्याचा भाव करून म्हणतो) हातां-त दर्भसमिधा घेऊन हे दोघे बटू कोण येत आहेत बरें ?

**सारण.**— ते **कौशिका**चे शिष्य असतील असें वाटतें.

( नंतर **सत्यव्रत** व **देवव्रत** अशा नांवांचे दोघे बटू पडद्या-च्या बाहेर येतात ).

**एकः**— अहं खलु साकेतंप्रतिप्रतिष्ठमानेन कुलपतिकुशिकनंदनेन तावदग्निपरिचरणार्थमग्निशरणे नियुक्तोस्मि अतः खलुकौशिकीतीरसमित्कुशमाहृत्य गच्छामीति ( निष्क्रामति)

**द्वितीयः**— मयापिपुनरिदानीं जनकपुरोश्वसो गौतमनंदनस्यमहर्षेरनुज्ञया समित्कुशमाहृतवता वसतिरुपगंतव्या महाराजजनकस्य ( इति परिकामति.) सखे सत्यव्रत, कथय कियंति दिवसानि महाराजजनकः कौशिकाश्रमेवेत्स्यति ?

**प्रथमः**. यावदस्मत्कुलगुरोर्यक्ष्यमाणस्य परिसमाप्यते अवभृथमहोत्सवः.

**दशा०**— सारण, विश्वामित्रशतानंदशिष्याविमौ. तदनयोः शृणुमो निलीनाएव विश्रब्धजल्पितानि.

**सारणः**. किंनपश्यति महाराजस्तिरस्करिणीविद्याप्रयोगंविद्युज्जिव्हस्य? तत्रकुतो निलयनं ?

**दशा०**— ( सहर्षं ) अहो विद्याप्रभावः ! नकेवलमस्मान्जनो नपश्यतीति, नशृणोति वचनानिच !

**विद्यु०**— महाराज, विश्रब्धमिह संचरिष्यामः.

**द्वितीयः** सत्यव्रत, कथमध्वरध्वंसिपुरजनीचरेषु ममसमारप्स्यते भगवान्कुशिकनंदनः ?

**सत्य०** सखे देवव्रत, शृणुतावत्.

**सत्यव्रत**— **कौशिक** गुरुजी **अयोध्येस** गेले, त्यांनीं अग्निशाळेंतील होम इत्यादिक अग्निसेवेचें काम मजकडे सोंपिलें आहे. त्यासाठीं मी **कौशिकी** नदीच्या तीरीं येऊन दर्भसमिधा घेतल्या. आतां घरास जातों. ( असें म्हणून चालता होतो ).

**देवव्रत**.— मी तर, **जनकराजा**चे उपाध्याय **शतानंद** गुरुजी, यांच्या आज्ञेप्रमाणें दर्भसमिधा घेऊन राजांची स्वारी जेथें उत्तरली आहे तेथें जातों. ( असें बोलून चालता होतो व म्हणतो ) गड्या **सत्यव्रता**, सांगबरें महाराज **जनकराजे कौशिकां**च्या आश्रमीं किती दिवस राहणार तें ?

**सत्यव्रत**.— आमचे **कौशिक** गुरुजी यज्ञ करणार, त्या यज्ञाचा अवभृथमहोत्सव होई तोंपर्यंत ते येथें राहतील.

**रावण**.—**सारण**, यां दोघांतून एकजण **कौशिकाचा** शिष्य आणि दुसरा **शतानंदाचा** शिष्य होय। तर आतां आपण लपून राहूं आणि हे मनांत कांहीं कल्पना न आणितां खुशाल निःशंकपणें गोष्टी बोलत आहेत त्या ऐकूं.

**सारण**— हें काय महाराज? आपण **विद्युज्जिव्हा**च्या तिरस्करिणी विद्येचा प्रयोग पहात नाहीं असें वाटतें। अहो ही विद्या असल्यावर मग लपून राहणें कशाला पाहिजे ?

**रावण**.— ( हर्ष पावून म्हणतो ) अहाहा ! केवढा हा विद्येचा प्रभाव ! हिच्या योगानें आपण लोकांना दिसत नाहीं इतकेंच नव्हे तर आपलें बोलणेंही त्यांना ऐकूं येत नाहीं.

**विद्युज्जिव्ह**.— महाराज, आतां आपण येथें खुशाल संचार करूं.

**देवव्रत**.— यज्ञ करूं लागलें असतां राक्षस त्याचा विध्वंस करून टाकितात, असें असतां भगवान् **कौशिकऋषि** हे यज्ञास आरंभ कसा करणार ?

**सत्यव्रत**.— सख्या **देवव्रता**, सांगतों ऐक.

प्रतित्रिदिवनिर्मितित्रसदशेषबर्हिर्मुख

प्रसक्तगुणवर्णनध्वनितपूर्णकर्णाध्वनः,

अमुष्य, किलहृष्यतः स्वयमुपेत्यसत्यात्क्षितिं

करेण करमामृजन्कमलभूरुरोध क्रुधः . ३६

तस्यैतस्य महातपोनिधेर्गाधिसूनोः कियती पुनरियं रजनीचराङ्गतिबिभीषिका ?

**विद्यु०—** शृणु विप्रैर्वचनं !

**सारणः.** अतएवहि महाराजेन कौशिकस्य विविधमायाविहारी मारीचः प्रतिबलीकृतः.

**विद्यु०—** उपपन्नमिदंयतः

सकृत्पौढध्वांतं, सकृदलघुमेघव्यतिकरं,

सकृत्धूमोन्नद्धं, सकृदपिरजोवृष्टिकलुषं,

अभिव्यंजन्व्योमस्यलमतुलमायाबलमदः,

पुरामारीचोयं युधिभयमनैषीद्विविषदः . ३७

**दशा०—** ( सस्नेह बहुमानं विद्युजिव्हं प्रति. )

मारीचस्य भवानेव मायाबल मिहात्मनः

विद्युज्जिव्हो विजानाति; त्वहिरेवाह्यहेः पदान्. ३८

**देव०—** सखे, महातपोनिधि रिति युक्तमाह महा भवान्; यदेतस्यकुलपतेराश्रमपदे.

### श्लोक.

त्रिविष्टपदुजें[1] करी ह्मणुनि, भीतिनें देव ज्या
स्तवूनि बहु जोडिती करसरोरुहातें निजा,
असा कुपित जाहला, तंव पितामहें[2] येउनी
करें कर धरूनि जो शमविला प्रयत्नें मुनी. ४५.

अशा त्या तपोनिधी **कौशिक** गुरुजींना बिच्याऱ्या राक्षसांचें भय तें किती असणार ?

**विद्युज्जिव्ह.**— ऐका, ब्राम्हणाचा पोरगा केवढ्या दिमाखाच्या गोष्टी सांगतो त्या ?

**सारण.**— ह्मणूनच महाराजांनीं नानाप्रकारच्या माया करणारा जो **मारीच** यालाच **कौशिका**वर योजिलें आहे.

**विद्युज्जिव्ह.**— हें ठीक केलें. त्याचा पराक्रमच तसा आहे ?

### श्लोक.

व्योमीं मेघसमूह आणित असे काळे कधीं सांवळे,
धूमाचीं पटलें कधीं उठवितो आत्मीयमायाबळें,
धूळीची करितो कधीं प्रबळ ही वृष्टी, अंधेरी अणी,
ऐसा निर्जर मंडळीस भिवबी **मारीच** पूर्वीं रणीं. ४६

**रावण.**— ( स्नेहानें व बहुमानानें **विद्युज्जिव्हा**प्रत म्हणतो ).

### श्लोक.

ज्ञान **मारीचमायेचें, विद्युज्जिव्हा,** तुला भलें,
हें युक्त, कांकीं सर्पाचीं जाणतो सर्प पाउलें. ४७

**देवव्रत.**—सख्या **सत्यव्रता, कौशिक**ऋषी हे महातपोनिधी होत, असें तूं बोलिलास तें बरोबर आहे, कांकीं त्यांच्या ह्या आश्रमीं,

टीप.—१ स्वर्ग २ ब्रह्मदेवानें..

शुंडाग्रेण सलीलमेषकलभो वक्त्रान्मृणालोज्ज्वलं

जृंभारंभविकस्वरान्मृगपतेर्दंष्ट्रांकुरंकर्षति,

एषावत्सतरीच मातरि तृणान्यत्तुं गतायां क्वचित्

द्वीपिन्यावनकंदरस्थितिजुषः स्तन्यं पयश्चूषति ! ३९

किंच-

पितृभ्यां विक्रीतं पशुमिव, परित्रातुमलसं,

स्वमात्मानं, दीनं, दृशमवकिरंतं दिशिदिशि,

शुनःशेपं, यूपग्रथितमयुमान्मोचितवतो,

मुनेरस्य ज्ञातुंभवति महिमानं जगतिकः ? ४०

विधु०— नजानाति विमवटुर्मारीचस्य मायाबलं; ततएवमाह.

सारण०— भवतु कोदोषः ? सर्वेपिस्वजनं प्रशंसंति.

विधु० — अस्त्येवं; न पुनरेवं मारीचे. पश्य,

वैतानागारमलक्षितः प्रविशति, व्यापादयत्यृत्विजं,

सुग्भांडानि भिनत्ति, खादति पशून्गृण्हात्यशेषंहविः,

भीमभ्रुकुटिदर्शयन्मुखमृषिस्त्रीणां विधत्ते भयं,

मारीचोयमशक्यशासन इति ज्ञानंनकेषामिदं ? ४१

सार०— अतएवनिःशंकमारभ्यमाणमखःप्रियसखमिक्ष्वाकुनाथं

[illegible]मनुवर्तेनुमयोध्यांप्रतिगतः कुलपतिः.

सारण०— ( सामर्षस्मितं )

## श्लोक.

ओढी ती[1] जवड्यांतुनी कलभ हा जृंभेस देतां हरी[2],
शुंडेनें बिससी सुचारु विलसे जी दाढ हो पांढरी ;
जातां धेनु चरावयास्तव तिची ही वांसरी निर्भया ,
व्याघ्री जी गिरिकंदरींत वसते, स्तन्या पिते तीचिया[3] ४८

## ओव्या.

पितरांनीं पशुवत् विकिला ॥ रायें यज्ञस्तंभीं जो बांधिला ॥ देवही सिद्ध भक्षावयाला ॥ बळी आपला ह्मणवोनियां ॥ ४९ ॥ मग कोणी सोडवील काय मातें ॥ म्हणोनि भिरभिर पाहे भंवतें ॥ तयादीना शुनःशेपातें ॥ निजसामर्थ्यें सोडवी जो ॥ ५० ॥ तो हा प्रतापी मुनीश्वरु ॥ जयाचा महिमा अतिथोरु ॥ नेणें प्रत्यक्ष सुरगुरु॥मग इतर नरु काय जाणे.५१

**विद्युज्जिव्ह.**— ह्या ब्राम्हणाचे पोराला **मारीचाचें** मायाबळ केवढें आहे हें माहीत नाहीं म्हणून तो असें म्हणतो.

**सारण.**— म्हणूं दे, त्यांत काय आहे ! स्वजनाची प्रशंसा करावी असी सर्वांचीच रीति आहे.

**विद्युज्जिव्ह.**-असें आहे खरें, परंतु **मारीचा** विषयीं तसें नाहीं. पहा,

## साक्या.

त्रेतागारीं[4] गुप्त शिरुनियां तेथिल ऋत्विज मारी;
खाई पशु, हवि; फोडुनि टाकी मखपात्रेंही सारीं. ५८
चढवुनि भिवया, वासुनि तोंडा ऋषिपत्न्यां भिववी तो,
हा सर्वांना अजिंक्य ऐसें नर कोण न मावीतो १५२

**सत्यव्रत.**— म्हणूनच तर **कौशिकगुरुजी** निःशंकपणें यज्ञाची सिद्धता करून आपला प्रियसखा असा **इक्ष्वाकुनाथ** जो **दशरथ**, त्याला निमंत्रण करण्याकरितां **अयोध्येस** गेले आहेत.

**सारण.**— (क्रोधानें हांसून ).

---

टीप.— १ ती दाढ. २ सिंह. ३ व्याघ्रीचा. ४ अग्निशाळेंत.

जामदग्न्यमुखाद्देवं सवनायान्वयाचियत्
सर्वंतद्विस्मृतं, हंत ! लक्ष्यते निर्मयो मुनिः ! ४२

**विद्यु०** सारण, कियान्वटो मूढस्य वचस्यमर्षः ? गुप्तमंत्रः खलुकुशिकनंदनः.

**सारणः.**—किमनेन गोपनेन कुशिकनंदनस्य यद्भार्गवमुखेनदेवं प्रतिप्रार्थनां शिष्योपि स्वस्य न जानाति. ?

**विद्यु०**— जनकस्य स्वस्मिन्नमीष्टघटनक्षमइति विश्रंभाय. यदुक्तं भवता, जनकस्तमृषिवरोपसंग्रहणे प्रतिभुवंकृतवानिति.

**सारणः.** ( विहस्य ) बलवानितितेन जाल्मेन जनकेन प्रतिभूः कृतो गाधिसूनुः ! पश्यति भवानपि यस्यविक्रमविजृंभितं.

निर्वाप्य ध्वजिनीं, निहत्य तुरग, न्निर्भिद्यच स्यंदनं,
द्वेधाकृत्यच कार्मुकं, रणभुवो, दूरेण विद्रावितः
वासिष्ठ्याजनितैर्गवा, खलुशकम्लेछादिभिः, सैनिकै
र्दीनोयः प्रययौपुरा तपसितुं—

**दशा०** सोयं बली कौशिकः ! ४३

**वेदव्रतः—**

श्रूयते तस्यराजर्षे र्ब्रह्मचर्यव्रतेस्थिताः,
ऋष्यशृंगचरोर्मागा, भ्वन्नारस्तनयाइति. ४४

## आर्या.

**जामदग्न्यवदनें**[1] जो प्रार्थी देवासे आर्जवें नमुनी;
तें सर्व विस्मरोनी, हरहर ! निर्भय असेंचि म्हणवि मुनी.५४

**विद्युज्जिव्ह.— सारणा**, अरे या वेड्या मूर्ख पोराच्या बोलण्यावर इतका क्रोध करणें म्हणजे काय ? त्याला काय कळतें? **कौशिक** बरीक गुप्तमसलती खरा, यांत संशय नाहीं.

**सारण.—परशुरामाच्या** द्वारें आपल्या महाराजांची प्रार्थना केली, ती ज्याच्या प्रत्यक्ष शिष्यास देखील ठाऊक नाहीं, इतका गुप्त मसलतीपणा तो कशाकरितां ?

**विद्युज्जिव्ह.**— एवढ्याकरितां कीं आपलें कार्य साधून देण्यास हा समर्थ खरा असा **जनकास** विश्वास वाटावा. कारण **रामचंद्राशीं** आपले कन्येचें लग्न करून देण्याचे कामांत त्यानें **कौशिकाला** प्रतिभु केलें आहे, असें तूंच सांगितलें.

**सारण.**—(हांसून) वाः ! **कौशिक** मोठा बलाढ्य असें समजूनच विचारशून्य **जनकानें** त्याला प्रतिभु केलें आहे. **कौशिकाचा** बलाढ्यपणा म्हणजे केवढा आहे तो तुलाही ठाऊक आहे.

## श्लोक.

सेना जिंकुनि, मारुनी हयवरां, भेदूनियां स्यंदना[3],
चापा मोडुनि, घालवूनि दिधला युद्धांतुनीयां वना[4];
ऐसा कामगवीचिया तनुभवीं[5] म्लेंछादिकीं दारुणीं
केला दीन, तपासि जाय मग जो,

**रावण.**— ( बाकी राहिलेला श्लोक म्हणतो ).
तो हा बळीया मुनी ! ५५

**देवव्रत.**—

## आर्या.

**ऋष्यशृंग** चरुयोगें म्हणती झाले सुदिव्य सुत चार.
**दशरथ** राजऋषीला, असती वर्णी[6] हिजे सदाचार. ५६

---

टीप.—१ परशुराममुखें. २रावणास. ३रथातें. ४वनाप्रत. ५कामधेनूच्या शरीरापासून झालेले. ६ ब्रह्मचारी.

**सत्यव्रतः**—

तेषामपि महातेजा, रामो, रतिकरः पितुः,

स्वयंभूरिव भूतानां श्रूयते गुणवत्तरः. ४५

**दशा॰**— ( साभ्यसूयं ) किमाह विप्रवटुः ?

**विद्यु॰**— महाराज, जनश्रुतिस्तादृशी.

**सारणः**. — अतएव जानक्याएतस्मिन् प्रेमाभिनिवेशः.

**विद्यु॰**— अतएव महाराजेन जिघृक्षितं जानकीपरिणयाय तादूप्यं.

**देव॰**— ( सशिरःकंपं ) जानामि, महाराजजनकस्य परिसरे रामइति नामानुगुणं समाम्रेडितगुणग्रामो गुरुणा गौतमनंदनेन. तथाहि.

वीरो, विश्वजनप्रियः, शमधनः, शौर्येप्यनुत्सेकवान्,

क्षात्रंधर्ममुत्र भूरिफलदं संभावयन्नात्मनः,

धर्मज्ञः, शुचि, रुज्झितानृतकथो, दीनानुकंपी, बटु,

धीमानर्थ विशारदो विजयतेरामो जगन्नायकः ४६

**दशा॰**— ( सरोमांचं, स्वगतं ) किमेतद्वर्णनं परमार्थतः स्यात् ? ( प्रकाशं ) यत्किंचित्प्रलपितं जनकसन्निधौ राजपिंडोपजीविनो गौतमडुरपत्यस्य विप्रवटु रनुवदति ।

**विद्यु॰**— ( ससंरंभम् ) सारण, पश्य.

स्वस्या मातुरुपेत्य नक्तमकरोद्यः शीलभंगंशठो

दुर्दांतः सचिराययेन मघवा काराकुटुंबीकृतः

एतस्मिन्नुपकुर्वतिप्रथमतः स्तुत्येपि लंकेश्वरे,

राममैथिलसन्निधौ, बत, किमित्यस्तौ दहत्यात्मनः । ४७

सत्यव्रत.—

**आर्या.**

चौघांत भव्य तेजा ताताला प्रियहि **राम** हा ऐसा.
म्हणति गुणें सर्वोत्तम भूतांमाजी [१] स्वयंभु [२] कां जैसा. ५७

**रावण.**— ( ईर्ष्येनें ) ब्राह्मणाचें पोरटें काय म्हणतें हें ?

**विद्युज्जिव्ह.**— महाराज, लोकवदंता तशी आहे खरी.

**सारण.**— म्हणून तर **जानकी**ची इतकी प्रीति त्याच्यावर बसली.

**विद्यु०.**— आणि याचहेतूस्तव **जानकी**ला वरण्याकरितां **रामा**चें रूप घेण्याची महाराजांनीं योजना केली आहे.

**देवव्रत.**—(डोकें हालवून) होय गड्या खरेंच. **जनक** महाराजाशीं आमच्या **शतानंद** गुरुजींस, **राम** या नांवाच्या मुलाची बारंवार स्तुति करतांना म्यां ऐकलें आहे. ते जेव्हां तेव्हां म्हणतात.

**श्लोक.**

वीर श्रेष्ठ, जनप्रिय, प्रकट जो क्षात्रा स्वधर्मा हिता [३],
मानी, शांतहि, नम्र शूर, अस्तुनी चित्तीं स्वधर्मज्ञता,
शौचें युक्त, तसाचि सत्यवचनी, दीनानुकंपी, बटू.
ऐसा **राम** जगत्प्रभू विलसतो, धीमान् विचारी, पटू. ५८

**रावण.**—( सरोमांच होऊन मनांत ह्मणतो ) ह्या वर्णनाप्रमाणें तो खराच असेल काय ? ( मोठ्यानें ह्म० ) **गौतमा**चें नीच अपत्य जो **शतानंद** तो **जनका**चे घरचाच तुकडेमोड्या होय. तेव्हां तो त्या **राजा**पाशीं जी वटवट करीत असेल, ती ऐकून हें पोरटेंही तसेंच बोलत आहे.

**विद्युज्जिव्ह.**— ( डोळानें ) **सारणा**, पहा.

**ओव्या.**

इंद्र परम दुष्ट आणि जार ॥ अहल्ये [४] वरी करी बलात्कार ॥
तया बंदी घालूनि साचार ॥ चिरकाळ ठेविलें असे ॥ ५९ ॥

---

टीप.—१जीवांत. २ब्रह्मदेव. ३हितकारक (क्षात्रधर्माचें विशेषण ).
४अहल्या शतानंदाची आई होय.

सत्यव्र०— अतएव गुणनिधावस्मिन्ननुरागो जानक्याः.

दशा०—

रामानुरक्ता सीतेति वचो मर्मभिदेकतः,

अन्यतः स्मरनाराचाः शृण्वतस्तद्गुणान्मर्म. ४८

विद्यु०— ( सकोपनिःश्वासं ) अहल्यातनयएव घातयितव्यः प्रथमं ताटकेयेन; पश्चादन्ये.

स्तोता स्तुवतु निःशंकंयंकंचिद्गौतमात्मजः;

शृण्वता स्वामिनः सख्या जनकेन कथंस्थितं । ४९

देवव्र०— एवंमेतत्, परंतु रामप्रशंसापरं अस्मत्गुरुं प्रतिवदत्येव महाराजः—

सत्य०— कथमिव ( अन्येसादरमाकर्णयंति. )

देवव्रत०-

अस्तुरामोत्सुकावत्सा, प्रशंसतुच तंभवान्,

अर्केंदुकुलसंबंधो युक्तो व्येषतुर्दुर्घटइति. ५०

विद्यु०— साधुजनकसाधु, सम्यग्दृष्टं भवता ।

दशा०— अभिज्ञः खल्वयं. ।

ऐसा शत्रु शासनें उपकार ॥ लंकेश्वरें केला असे थोर ॥ परीं
शतानंद कृतघ्न फार ॥ जनका जवळी स्तवी रामा ॥ ६० ॥

सत्यव्रत—ह्मणूनच अशा गुणांचा निधी जो राम, त्याच्या ठि-
काणीं जानकीची प्रीति आहे.

रावण.—

### आर्या.

रामानुरक्त सीता हें मम मर्मास टोंचितें वचन;
तीचे गुण ऐकें तंव टोंची बाणें करोनि मज मदन. ६१

विद्युज्जिव्ह.-( रोषानें उसासा टाकून ) मारीचानें अहल्यापुत्रा-
सच पहिल्याप्रथम मारून टाकावें, मग दुसऱ्यांस !

### श्लोक.

भलत्याचीहि निःशंक शतानंद करो स्तुती;
परी ती रुचते कैसी स्वामींच्या सखया[१] प्रती. ६५

देवव्रत.— असें खरें, परंतु आमचे गुरूजी रामचंद्राची स्तुती
करूं लागले ह्मणजे महाराज जनकराजे त्यांचें प्रत्याख्यानच करितात.

सत्यव्रत.— तें कसें बरें ?

( रावणादिक तिघे राक्षस कान देऊन सादर ऐकतात )

देवव्रत.— राजा असें ह्मणतो कीं,

### श्लोक.

सीता असो रामगुणानुरक्ता, वर्णा तुम्ही दाशरथीस आतां;
संबंध अकेंदुवंशस्[२]कुलांचा आहे जरी श्लाघ्य, घडे न साचा. ६६

विद्युज्जिव्ह— शाबास जनका शाबास, तुझें पहाणें बरोबर आहे !

रावण— तो अभिज्ञच आहे !

टीप.—१ जनकाप्रत. २ सूर्यचंद्र वंशांचा.

सार०— कथमेष संघटते कन्याभिलाषिणि महाराजे ?

देव०— शेषमपि महाराजवचनं शृणोतु भवान् यत्किल.

काक्षत्यर्थयितुंस्नेहा त्कन्यारत्नमिदंमम

केकसीसूनुरित्येवं कर्णाकर्णिकयाश्रुतं. ५१

ततश्च.

कन्यामर्थयतेयदि त्रिभुवनप्रोद्यंडदोर्विक्रमो,

नप्ताविश्वसृजः, सखामम, दशग्रीवः, स, शैवाग्रणीः,

तामस्मैरघुनंदनैकत्दद्यां दातुं कथंशक्नुयां ?

दद्यांनेतिकथंवदेयमितिचक्लिश्येधुना केवलं. ५२

विद्यु०- युक्त मुपन्यस्तं जनकेन शतानंदाय.

दशा०- ( सबाष्पगद्गदं ) सखे सीरध्वज, मास्तुतेक्लेशः. कितवैतत्क्लेशायभवेयं. ?

सार०— नहि भवान्निजरूपेण कन्यांयाचते अपितुरघुकुमारवेषेणतां परिणिनीषति.

सत्य०— ( विहस्य ) किमिदमुक्तंजनकमहाराजेन ? शृणुतावत्

कपिप्रवरकक्षगो दुरपकर्षदोर्विंशतिः

शिरोदशकमग्रतः पदचतुष्टयंचान्यतः

अभीक्ष्णमधुनीतयः स्वतनुमोचनार्थंपुरा,

कथंसदशकंधरो भुवनभीमदोर्विक्रमः ? ५३

**सारण.— रावण** महाराज हे कन्येला मागूं लागल्यास मग तो संबंध कसा घडूं शकेल ?

**देवव्रत.— जनक**राजांचें आणखी म्हणणें सांगायाचें राहिलें आहे, तेंही सांगतों ऐक.

### आर्या.

**सीते**ला मागावें स्नेहें **रावण** मनांत हें वाहे,
ऐसी जनांत वार्ता उठली ती म्यांहि ऐकिली आहे, ६७

### श्लोक.

मग,

शैवीं मुख्य, मदीय मित्र, परमें शौर्येंहि भारी जगा,
नातू तो परमेष्ठिचा[1], जरि निजे कन्येस मागे, अगा,
नाहीं देत असें कसें ह्मणुं ? जरी द्यावी तरी ती, पहा,
**रामासक्तमना** ह्मणूनि मजला तोंची सदा खेद हा. ६८

**विद्यु०— जनकानें शतानंदाला** जें सांगितलें तें ठीक सांगितलें.

**रावण**— (गहिंवरून अश्रू, ढाळितो आणि ह्मणतो) सख्या **सीरध्वजा**, तूं कांहीं खेद करूंनको! अरे म्यां तुला क्लेशदायक व्हावें काय ? शिवशिव !

**सारण**— आपण आपल्या रूपानें कन्या मागतों असा कांहीं अर्थ नाहीं तर रघुकुमारकाचे वेषानें तिला वरण्याचा आपला बेत आहे.

**सत्यव्रत**— (हांसून ह्म०) अँः, **जनक**राजांनीं असें हें काय म्हटलें ? ऐक,

### श्लोक.

कारवे घालुनि मार्कंडें[2] दडपिलें हस्तां विसां जेधवां,
मागें चान्हिपदें, शिरें दश पुढें, ह्मालीं असीं तेधवां,
सोडावें अपणा म्हणोनि असकृत् झाली तयांतें असा
तो हा **रावण** शौर्यविक्रमबळें भारी जगातें कसा ? ६९

---

टीप- १ ब्रह्मदेवाचा २ वालीनें.

दशा०- दुरात्मनोस्य विप्रवटोः कंठमरुजेयं (इति उत्थाय द्वाभ्यां नि-
वारितस्तिष्ठति )

विद्यु०— धिङ्मूर्खोनैतज्जानाति.

निष्पर्यायनिवेशितांगुलिशतप्रक्षुण्णपर्यंतभू
बंधोदंचितशंकराचलधुरादीव्यद्भुजाविंशतेः,
अस्य, त्रस्यदुमास्वयंकृतपरिष्वंगप्रहृष्यन्मृड
प्रक्रांतस्तुति साक्षि, राक्षसपते, रास्तेगुणानांकुलं. ५४

दशा०- (सविनयं) विद्युज्जिव्ह, मामैवं. केयंस्तुत्यस्य भगवतः
स्तावकतानाम? कथयामितावत्. पुरा किल घोरे तपसि वर्तमानस्य,

करकमलतलेन शैलकन्याकुचतटसंगतकुंकुमारुणेन,
सकरुणममृशन्ममापरांगं त्वमसिकृशस्तपसेतिचंद्रमौलिः. ५५

देव०— सत्यव्रत, किमुच्यते क्वचित्कस्यचित्प्रतापस्खलनं नदोषाय.

दशा०— (सामर्षविहस्य) कथंनाम प्रतापस्खलनं?

वालीनामकपिः, सकश्चनमया योद्धुंबलीति भ्रमा
दाहूतो मम बाहुसार मविदन्कक्षे स मा मग्रहीत्,
मुष्ट्याघातविघूर्णितस्तदनुमामुन्मुच्य सख्यंव्यधात्,
त्रीवेद्मिस्खलितः प्रतापइति, तत्कोयं कलंको मम? ५६

**रावण—** अरे ह्या दुरात्म्या ब्राह्मणाचे कारट्याच्या नरडीचा घोट घे-
तों आतां ! ( असें ह्मणून उठतो, **सारण** आणि **विद्युज्जिव्ह**
हे दोघे त्याचें निवारण करून थांबवितात ).

**विद्युज्जिव्ह —** ह्या बेट्या मूर्खाकारट्याला काय ठाऊक आहे !

**श्लोक.**

रोवोनी शतअंगुळी उपटिला कैलास, त्या[1] झेलितां
झाल्या चूण शिलाहि शोभति विशी दीर्घा तई दोर्लता,
भीतीनें कवळी **शिवास गिरजा**, येणेंचि[2] तो[3] तोषला,
स्वामीतें[4] स्तवि, त्यास साक्षिगणहा त्यांच्या गुणांचा मला.७०

**रावण.—** ( नम्रतेनें ह्म० **विद्युज्जिव्हा**, हरहर ! हें काय भलतेंच
ह्मणतोस ? स्वतः सर्वांसही स्तवन करण्यास योग्य जो भगवान
**शं**कर त्याच्याकडेस स्तावकता आणणें हें काय ?आतां येवढी गोष्ट
बरीक झाली खरी, कीं जेव्हां मीं उग्रतप करीत बसलों होतों तेव्हां.

**श्लोक.**

अति अरुण कुचाचे कुंकुमें **पार्वती**चे करकमल सदारे शोभतें
**शंकरा**चें, मज बहु कुरवाळी धूर्जटी त्या हतानें, म्हणून कृश
बहूवा जाहलासी तपानें. ७१

**देवव्रत—** सख्या **सत्यव्रता**, शूर असला तरी एखाद्यावेळीं कचतो
ह्मणून तो कांहीं दोष आहे असें नाहीं.

**रावण—** ( क्रोधानें हास्यकरून म्हणतो ) एकूण मी कचलों असें
हा म्हणतो काय ? कसारे कचलों ?

**श्लोक.**

**वाली** हा बळिया असेल म्हणुनी युद्धार्थ बोलाविला,
त्यानें नेणुनि मत्प्रभाव धरिलें काखेंत तेंव्हां मला,
जेव्हां म्या मुठिनीं तयास कुटिलें, सोडोनि त्यानें मला
केलें सख्य; कलंक मद्गुणगणा येणें कसा लागला ? ७२

टीप.–१ कैलासाला. २ गिरिजेच्या कवळण्यानें. ३ शिव. ४ रावण.

सारणः मूढाः भक्तनयोर्लंकेश्वरस्यप्रतापं नजानंति.

क्षिपतिगगनेकैलासं योजवाद्दशभिः करैः,
दशभिरपरैस्तंभ्रश्यंतं प्रतीछतिलीलया,
भुवनजयिनो, रक्षोनेतुः, किमस्यपुरः क्षमः
परिगणयितुंवालीनाम प्लवंगकुलाधमः १ ५७

सत्य० देवव्रत, तवालमिदानीं लंकेश्वरस्य कलंकसंवरणेन.

रेवायां खलुपंचभिर्भुजशतैरुध्वा प्रवाहंबला
दन्यैरंबरवेणिकर्षणपयोविक्षेपकेलीपरैः
स्वच्छंदं वनिताजनैरमयता प्रागर्जुनेनागतो
मध्येयुद्धमनेनकिंदशमुखो नीतोनकारागृहं १ ५८

दशा०— अहो दुरात्मा त्रिशंकुयाजिनो मुनिपाशस्य शिष्यस्तदनुकूलं प्रलपति. तदयंभक्षयितव्योराक्षसानां.

देव०- तत्तिष्ठतु. श्रूयता मिदं.

यस्मिन्विस्मितदेवदानवकुलप्रकांतसंदर्शन
क्षिप्रोन्मोचितघोरनारकगतप्राणिप्रणीतस्तवे
मुंचत्यद्भुतमट्टहासमभितो विद्राविताल्कासरा
त्सभ्रष्टंजहसुर्यमं निशिचरावर्ण्योन किं रावणः १ ५९

विद्यु०- साधुदेवव्रत साधु. नंदनीयोसि वचनेन.

सारणः- नकेवलमयं अपितुपस्यायं शिष्यः.

**सारण**.— लोक मूर्ख पडले, ते **लंके**श्वराचा प्रताप जाणत नाहींत !

**श्लोक.**

फेंकी जो दश बाहुनीं निजबळें **कैलास** नामा गिरी
आकाशीं, पडतीं तयास[2] इतरीं दाहीं भुजांनीं धरी,
ऐसा जो अतिविक्रमी, त्रिभुवना जेताहि **लंका**पती,
**वाली** माकड, त्याचि, सांग, गणना त्याच्या पुढें ती किती ?

**सत्यव्रत**.— **देवव्रता**, पुरे आतां **रावणा**चे दोष किती तरी झांकशील रे ?

**श्लोक.**

रेवाप्रवाह धरि पंचशतीं करांनीं रोधूनी खेळत असे इतरां करांनीं
नारींसवें, तंव लढूं **दशकंठ** आला, तों अर्जुनें धरुनि बंदिस टाकिजे-
ला. ७४

**रावण**.— कायरे ! दुरात्मा **त्रिशंकु** याजक अधममुनि जो **कौ**शिक. त्याचा शिष्य हा त्याच्या प्रमाणेंच वटवट करितो ! तर याला राक्षसांनीं खाऊन टाकावें !

**देवव्रत**.— तें असूंदे पण आतां माझें ऐकून घे.

**श्लोक.**

ज्याचा विक्रम देवदानव रणीं पाहून भांबावले
जेणें प्राणिगण प्रचंड नरकां पांसोनियां सोडिले,
ऐकोनी स्तुति तत्कृतां[3] हंसतसे गर्जोनि जो फारसा,
रेडा भीऊनि धांवतां यम पडे आलें हंसें राक्षसां. ७५

**विद्यु**०— शाबास, **देवव्रता** शाबास ! शाबासकी देण्यास तूं योग्य आहेस.

**सारण**. — हाच योग्य असें केवळ नव्हे, तर ज्याचा हा शिष्य तो देखील योग्य आहे.

---

टीप.—१ खालीं पडतां. २ कैलासाला. ३ प्राणिकृत.

**दृशा०—**

मन्येजनकसंबंधी यः कश्चिदपिमेप्रियः

चंपकस्यानुषंगेण संपुटोप्यधिवास्यते. ६०

**सत्य०—** किमनेनावयोर्वृथा वाक्कलहेनातिक्रामति समयः.

गुरुकुलमेव गच्छावः ( इतिनिष्क्रांतौ )

**दृशा०—** वयमपि कौशिकीतीरपरिसरारण्यभूषणेनानेन सहकार

वनेन प्रचरंत स्तत्र तत्र प्रवृत्ति मुपलंभमाना जानकी जन्मसूचित

सुकृतभाजं जनकराजं उपसर्पामः.

**इतरौ.** यथारोचते महाराजाय.

( निष्क्रांताः सर्वे )

**प्रथमोंकः १**

रावण.—

आर्या.

जनकाचा कोणीही संबंधी मज तसाची[1] आवडतो;
चंपक सुम[2] योगानें संपुट ही सुरभि[3] जेविं कीं होतो. ७६

सत्य०— आतां हा आपला वृथा वादविवाद पुरे करावा. येणेंकरून उगाच वेळ मात्र व्यर्थ जातो. याजकरितां आपआपले ठिकाणीं जाऊं चला. ( असें बोलून दोघे निघून जातात ).

रावण.— चला आतां आपणही कौशिकीतीरचे अरण्यास भूषणरूप जें हें आम्रवन, ह्या वनांतून संचार करीत करीत आणि त्यात्याठिकाणीं काय काय वर्तमान आहे त्या वर्तमानाचा शोध काढीत काढीत जनकराजाकडे जाऊं. हा जनकराजा जानकीसारखी कन्या झाल्यावरून मोठाच पुण्यशाली समजला पाहिजे.

विद्यु०—आणि सारण. - उत्तम आहे. महाराजांची जसी मर्जी असेल तसें.

( असें बोलून सारे निघून जातात. )

( प्रथम अंक समाप्त ).

---

टीप- १ जनकासारिखा. २ पुष्पें. ३ सुवासत.

( ततः प्रविशत्यत्रिरनुसूयाच )

**अत्रि**— अनुसूये, आहूतोहं यक्ष्यमाणेन महर्षिणा कुशिकनंदनेन; संमामश्च मवत्या सहैव तदीयमाश्रमपदं; किंतु जनकेनसमभिहा मनायावत्सायाः किमुपहरिष्यामः सीतायाः ?

# जानकीपरिणय नाटक.

## अंक २.

### पात्रें.

| | |
|---|---|
| अत्रि | कोणीएक ऋषी. |
| अनुसूया | त्याची स्त्री. |
| रावण | लंकेचा राजा. |
| विद्युज्जिव्ह. सारण. | रावणाचे मंत्री. |
| सीता | जनकराजाची. कन्या |
| सुचरिता. शीलवती. | सीतेच्या. सख्या |

( तदनंतर **अत्रि** आणि **अनुसूया** दोघे प्रवेश करितात.)

**अत्रि.— विश्वामित्र** महर्षि हे यज्ञ करणार आहेत ह्मणून त्यांनीं मला निमंत्रण केलें. त्याप्रमाणें तुजसहवर्तमान मी तेथें त्यांचे आश्रमप्रदेशाप्रत येऊन पोंचलों. परंतु आतां **जनकराजा** बरोबर त्याची कन्या **जानकी** ही येथें आली आहे. तिला कांहीं देणगी द्यावयाची, ती काय बरें द्यावी ?

**अनु॰**— नन्वस्तिखलु ममवशे देवैर्दत्तं दिव्यचीनांशुकमंगरागश्च, ययोःकिलधारणे यक्षराक्षसाद्यैस्तर्जितोपिकुलबालिकाजनो नलमते कातर्यं, नमुंचतिच नैसर्गिकं शीलंच.

**अत्रिः**— उपपन्नमेतत्. शृणुमः किलजानकीं दशाननः प्रार्थयितुमुद्युक्तइति ( पुरतोवलोक्य ) केयं कराभ्यामुपनयति सरसानि कमलिनीदलानि मृणालानिच ?

**अनु॰**- भवितव्यमनया सुचरितयानाम सख्या विदेहकन्यायाः अतो मन्ये मदनानलेनवा प्रौढातपलंघनेनवा बलवदस्वस्था जानकीति.

**अत्रिः** (स्मृतिमभिनीय) मदनानलेनैव यतः दृष्टं मया समाधिस्थितेन.

जनकनृपतिकन्या जातुनिद्रां भजंती
स्मरमिव रुचिरांगंवीरमालोक्यरामं,
अरतिरखिलकृत्येचेतसातद्गतेन,
श्रयतिसहचरीभिः पालितापुष्पशय्यां. १

भवतुजनकसमीपमेव तावदवगच्छावः (इतिनिष्क्रांतौ.)

( शुद्धविष्कंभकः )

अनु०—देवांनीं दिलेलें चीनांशुक ह्मणून एक वस्त्र, व अंगास लावण्याचा अंगराग, असे दोन पदार्थ मजपाशीं आहेत, तेच तिला द्यावे. त्यांमध्यें असा गुण आहे कीं, कुलीन स्त्रियांनीं त्यांचें धारण केलें असतां राक्षसादिकांनीं त्यांनां भिवविलें तरी त्यांस भय वाटूं नये. आणि त्यांचें स्वाभाविक जें सत्शील तें त्यांनीं मोडूं नये,

अत्रि.—हेच पदार्थ सांप्रत तिला देणें योग्य आहेत खरे. कारण **रावण** हा तिला मागण्याविषयीं उद्युक्त झाला आहे असें वर्तमान ऐकतों. (पुढें पाहून) हातांमध्यें ओलीं ओलीं व रसभरित अशीं कमलिनीचीं पत्रें आणि मृणालें घेऊन ही कोण येत आहे बरें ?

अनु०—ही **सुचरिता** नांवाची **जानकीची** सखी दिसते. ती हे शीतोपचाराचे पदार्थ घेऊन चालली आहे. यावरून कामज्वर झाल्यानें ह्मणा, किंवा मोठें ऊन लागल्यानें ह्मणा, कशानें तरी **जानकीचे** शरीराचा संताप होऊन तिची प्रकृति फार अस्वस्थ झाली असावी असा तर्क वाटतो.

अत्रि.—(स्मरण झालेंसें दाखवून) होय होय, कामज्वरानेंच तिची प्रकृति बिघडली आहे, उन्हानें नव्हे. कांहीं मी समाधी लावून बसलों होतों, तेव्हांच मला ही गोष्ट विदित झाली आहे कीं,

### साक्या.

एके वेळीं निद्रित **सीता** स्वप्नीं **राघव** पाहे;
मूर्ति जयाची मदनसुंदरा[१], शूरहि जो बहु आहे; १
तेव्हांपासुनि विरह पीडिता रामासचि मनिं चिंती,
पडुनि असे पुष्पाचे शयनीं सखया तिसे[२] रक्षीती. २

असो, आतां **जनक**राजाकडे जाऊं म्हणजे तेथें काय असेल तें समजेल. ( असें म्हणून तीं दोघें निघून जातात ).

( ही पूर्वोत्तर कथेची संगति ).

टीप.—१ मदनासारिखी सुंदर. २ सीतेस.

( ततः प्रविशति विद्युज्जिव्हेन सारणेनच सह दशाननः )

**दशाननः—**

यदीयंसौंदर्यं जनयति रतेरप्यवमतिं,
यथाचाविर्भूतं जनकनृपते र्देवयजनात्,
ममद्रष्टुंशक्या युवति रियमद्येति, मनसः
परीणामः कोपिस्फुरति ननुहर्षाद्भुतमयः । २

तदिह, सारण, कथयकतमेन पथाकौशिकाश्रमवाटमुपगच्छामः?

**सारणः.—** नन्वनेन दक्षिणतो विकंकताटवेरुत्तरतः किंशुकारण्यस्या

**वि०—** महाराज, इतइतोभवान् ( सर्वेपरिकामंति )

**दशाननः.—** सारण, किमस्ति कौशिकीतीरेपिनंदनवनं. ?

**सारणः.—** नहिनहि.

रसालानामंतर्मदकलरणत्कोकिलकुलं,
समंताद्दुन्मीलद्बकुलमुकुलामोदभरितं ,
घनस्निग्धच्छायं क्रमुककदलीशीतलतलं,
ननुप्रीतिंधत्ते नवमिदमृषेराश्रमपदं. ३

( तदनंतर **विद्युज्जिव्ह** आणि **सारण** यांसहवर्तमान
**रावण** पडद्याबाहेर येतो. )

**सारण.—** **श्लोक.**

रूपानें **रति**हूनि जी समधिका, उत्पन्न झाली खरी
**वैदेही**[1] सुकुमार देवयजनापासूनि[2] ती सुंदरी.
कीं देखीन तयेस आजि भरुनी डोळे असा हा महा
मच्चित्तीं बहु हर्ष, विस्मय, तसा उद्दीप्त होतो अहा ! ३

तर **सारणा**, **विश्वा**मित्राच्या आश्रमांत जाण्याचा मार्ग कोणता तो दाखीव बरें, म्हणजे तसे जाऊं.

**सारण.—** हें विकंकतवृक्षांचें[3] डाव्या हाताकडे टाकून व हें पालाशवृक्षांचें[4] वन उजव्या हाताकडे टाकून मधूनच जो मार्ग जातो तोच आश्रमाला जातो.

**वि०—** असें असें इकडून चलावें महाराज. ( असें म्हणून तिघे इकडे तिकडे फिरतात ).

**रावण.—** अरे **सारणा**, ह्या **कौशिकी**नदीचे तीरींही नंदनवनच आहे काय ?

**सारण.—** हें नंदनवन नव्हे महाराज. या ऋषीचे आश्रमप्रदेशाचीच शोभा नंदनवनाप्रमाणें अपूर्व आहे.

**साक्या.**

आम्रतरूंचें वन हें सुंदर कोकिल त्यांमधिं गाती;
बकुलवृक्ष मोंवते लागले, ते बहु शोभा देती. ४
पुष्पें विकास पावुनि त्यांचीं त्यांतुन परिमळ येती;
छाया तरुंची स्निग्धनिबिड आतप[5] श्रमातें नेती. ५
क्रमुक[6] तशा कर्दलीहि येथें लागुनि गेल्या दाट;
त्या योगें शीतल तल ऐसें शोभत आश्रमवाट[7]; ६

---

टीप.—१ विदेहाची कन्या. २ यज्ञभूमीपासून. ३ वृक्षविशेष. ४ पळसांचें. ५ उन्ह. ६ सुपारीचीं झाडें. ७ आश्रमप्रदेश.

वि०— अहोरामणिकमृषेराश्रमस्य ! इहहि.

पक्वानि प्रच्यवंतेक्रमुक विटपिनामुच्छ्रितानांफलानि,

स्पंदंतेराजरंभाः फलभरनमिता, वातिमंदानिलेपि,

संदृश्यंते विपाकच्युतमधुरफलव्याप्तमूलारसाला ,

भारेणामीफलानांयुवतिकुचभरस्पर्धिनो नालिकेराः. ४

( नेपथ्ये )

जाव चित्तलेहणिमित्तं पिअसही सीलवदीचित्तसंभारं आणेदुंगदा,

सुअरिदावि सिसिरोपआरणिमित्तं णलिणीपत्ताइं, तदोआरंभिअवि

अणंत्ति करिअवलअंखुमंमहोवाहेई. कागई. !

दशा०— ( आकर्ण्य )

निनदःपिकांगनायाः कवलितमाकंदकंदलकषायः

आकर्ण्यतेरतिपतेः कृतइवभोगावलीपाठः . ५

सारणः — महाराज, नायमभिव्यक्तरमणीयः पिकशब्दः, अपितु

मन्ये सारिकाव्याहरतीति. ( पुनर्नेपथ्ये ) भअवं कुसुमाउह, एक्क-

वारंविआलेहलिहिदं पिअजणं दठ्ठूण

वि०— अहाहा ! ऋषीचा आश्रम किती तरी रमणीय आहे हा ! येथें पहा !

### अभंग.

उंच उंच येथें सुपारीचीं झाडें; त्यांच्या खालीं सडे फळांचे पै. ७
रायकेळी फळभारें डोलताती; वारेही वाहाती मंदमंद. ८
पक्कआम्रफळें वृक्षांचे मूळाशीं पडलीं तीं कैशीं शोभताती ! ९
माडावरी तैसे दिसती नारळ, कठीण वर्तूळ बहूसाल. १०
तरूणीचे कुचांटाकिती हे मागें, ऐसें मनीं वागे माझीया हो. ११
ऐसा हा ऋषीचा आश्रम सुंदर, त्याची शोभा फार वर्णवेना. १२

( इतक्यांत पडद्यापलीकडे शब्द होतो. )

'अगे ! चित्र काढण्याचें आहे म्हणून त्याचें साहित्य आणण्याकरितां सखी **शीलवती** गेली; तशीच शीतळ उपचार करायाचे आहेत त्यांसाठीं मृणालें व नलिनीचीं पत्रें आणायाकरितां सखी **सुच**रिताही गेली; अशा दोघीजणी गेल्या, तेव्हांपासून मी एथें एकटीच आहें, असें पाहून हा मन्मथ मजला फारच पीडा करितो ! अगे बाई, कसें करूं ! आतां माझी कशी गति होईल ! ,

**रावण.**— ( ऐकून )

### श्लोक.

भक्षूनि आम्रनवपल्लव[1] कोकिला हे शब्दा करीत मधुरामधुराचि[2] पाहे;
नाहींच शब्द, तरि मन्मथमोगपाठें[3] गातो वनांतगमतें पिकरूप भाट.[4] १३

**सारण**— महाराज, कोकिळेचा शब्द रमणीय खरा, पण इतका स्पष्ट असत नाहीं. वास्तव ही कोणी सारिका बोलत आहे असें वाटतें. ( पुनः पडद्यापलीकडे शब्द होतो ) हे भगवंता कुसुमायुधा, एक क्षणभर तरी धीर धररे ! पाटीवर प्राणनाथाचें चित्र काढून त्याचें

---

टीप.—१ आंब्यांचीं कोंवळीं पानें. २ अतिमधुर. ३ मदनाची स्तुती. ४ कोकील हाच कोणीएक भाट.

तदो मए तुहकिदेपाणाविसज्जिअंति. तावणमेत्तं मरिसेहि.

दशा०- ( आकर्ण्य ) काचिदिय मविसोढप्रियतमविरहपरवशा, वि-

लपति तपस्विनी. तत्परितोपिदृश्यतांकेयमिति.

नविशिष्यते यदुक्तिर्मदकलपिकसारिकानिनदात्,

रूपेणचभवितव्यं तस्यास्त्रैलोक्यरुचिरेण ६

सारणः- यदाज्ञापयतिदेवः ( इति निष्क्रम्यपुनः प्रविशति. सविस्मयं )

महाराज, नकापिकिंचिदस्तियेनेदंव्यात्हृतं.

दशान०-( साश्चर्य मुत्थायविलोक्य) हंत, नकिंचिदत्र ! कथमेतत् ?

वि०— महदिदमाश्चर्यस्थानं !

( पुनर्नेपथ्ये )

णिक्करुणो मअणोमं साणुणअंपत्थिदोविबाधेइ.

सारण.— अहो पुनर्निरालंबावाणी !

दशा०— हंत कथमनभ्रासुधावृष्टिः !

वि०— अचिन्त्यमहिमा हितपस्विनामाश्रमव्यापारः !

( पुनर्नेपथ्ये )

एकदां दर्शन करितें. आणि मग तुजकारणें प्राणाचें अर्पण करीन. म्हणून एक क्षणमात्र थांब, अधिक नको !

**रावण.**— ही कोणीतरि स्त्री आपल्या प्रियतमाचे असह्य विरहामुळें व्याकुळ होऊन बिचारी विलाप करीत आहे. तर **सारणा,** ती कोणाची कोण आहे याचा आसपास जाऊन शोध कर बरें.

## अभंग.

वाणी जीची पीकसारीकेच्या परी
अंतर मोहोरी, मात्र नसे. १४
रूपहि तयेचें सुंदर त्रिलोकीं,
असेल हें तर्कीं माझ्या येतें. १५

**सारण.**— आज्ञा महाराज. ( असें म्हणून बाहेर जातो व पुनः परत येऊन विस्मयानें म्हणतो ) महाराज, शब्द झाला खरा, परंतु येथें आसपास कोणी दिसत नाहीं.

**रावण.**— ( आश्चर्य पावून स्वतां उठून पाहतो व म्हणतो ) अरे, खरेंच येथें कोणीही दिसत नाहीं. हें काय हो !

**वि०**— ही तर मोठी आश्चर्याची गोष्ट आहे !

( पुनः पडद्यापलीकडे शब्द होतो. )

## श्लोक.

प्रार्थिले बहु जरी मदनातें, बाधितोचि अति निर्दय मातें,

**सारण.**— अहो ही ऐका पुनः निरालंबा वाणी !

**रावण.**— यास काय म्हणावें ! ही तर मेघावांचून सुधावृष्टीच होते !

**विद्यु०**—तपस्व्यांच्या आश्रमांत ज्या कांहीं विलक्षण गोष्टी घडतात ! त्यांचा अंतच कळत नाहीं, असा त्यांचा महिमाच अचिंत्य होय !

( पुनश्च पडद्यापलीकडे शब्द होतो. )

सँरणं अज्जविसंवा.

सर्वे ( आकर्ण्य ) निश्चितंइयमस्मद्दशामदृश्याकाचिदुत्कंठिता-

विलपति. ( प्रविश्य पटाक्षेपेण मृणालनलिनीपत्रहस्तासुचरिता.)

सुच०— हँला माएव्वं २ असोहणंभण.

( ततः प्रविशति किसलयशयनोपविष्टा सीता.)

सीता.— पिँअमुहचंददंसणसुहंवा. ७

( इतिमूर्च्छति )

सुच०— हँला समस्ससिहि २ ( इतिनलिनीदलेनवीजयति. )

दशा०— सानूनं नलिनेक्षणा प्रियजनं व्याप्तृत्यमोहंगता,

येनाली नलिनीदलेन सहसा तांवीजयत्यंतिके,

एनांद्रष्टुमनंगतापविधुरां भाग्यंनमेवर्तते,

यद्वाकिं व्यसनेन वज्रमणिरप्यस्याः स्फुटेदीक्षणे. ८

सारण. — सानदृश्यते, सहचरीतुदृश्यते, इतिमहदाश्चर्यं !

श्लोक. ( तृतीय चरण ).

त्यास एकचि उपाय विषाचा.

( तिथे कान देऊन ऐकतात व ऐकून म्हणतात. ) आपल्या सारिख्या राक्षसांना अदृश्य अशी कोणी स्त्री मदनाचे योगानें अधीर होऊन विलाप करीत आहे, हीच गोष्ट खरी, यांत कांहीं संशय राहिला नाहीं. (इतक्यांत पडदा एकीकडे सारून मृणालें आणि कमलिनीचीं पत्रें हातांत घेऊन सुचरिता पडद्याबाहेर येते ).

**सुचरिता०**- सखे, असें अमद्र काय बोलतेस !

(नंतर कोमल पल्लवाच्या बिछान्यावर निजलेली असी सीता पडद्या बाहेर येते ).

**सीता.—**

श्लोक.

( चतुर्थ चरण म्हणते ).

कीं दुजा दयितदर्शन[1] साचा. १६

( असें म्हणन मूर्छित होते ).

**सुच०—** सखे, सावध हो, सावध हो. ( असें म्हणून नलिनीपत्रानें तिजवर वारा घालिते ).

**रावण.—**

श्लोक.

बोलोनी प्रिय नायकास अबला झाली असे मूर्छिता,
वारा घालित तीसही सहचरी[2] पद्मच्छदानें[3] अतां.
देखाया हिजला न पुण्य पदरीं माझ्या बरें, बा असो.
पाहूनी तिजला उलेलीच हिरा, तें दुःख मातें नसो ! १७

**सारण.—** तिची सखी दिसते, पण ती दिसत नाहीं हें तर मोठें आश्चर्य आहे !

---

टीप.—१ प्रियदर्शन ( हा दुसरा उपाय ), २ सखी ३ कमलपत्रानें

**वि०**— तदपि क्रमेण ज्ञास्यामः,

**सुच०**— ईद्धी२ अदिभूमिगदोसे संदावो, ता दाणी चंदणपल्लव रसेहिं सिंचेमिणं. ( इति कराभ्यां चंदनपल्लवानि निष्पीडयति. )

**दशा०**—

चंदनपल्लवनिकरः सख्याः करयंत्रपीडितो नूनं
वपुषो मृगशावाक्ष्या मार्दवमपहृतमनेनेति. ९

**सुच०**— ( निषिच्य ) एदे सुहअंदिदे चंदणरसणिसेआ ?

**सीता**.— ( कथंचित्समाश्वस्य ) [10]सहि, केत्तिअंकालं एव्वंसहीणं आआसआरिणी होम्मि. ?

**सुच०**— [11]हला, दाणिं तुह वल्लहो आआमिदिणे आअमिस्सदित्ति सुणीअदि.

**सार०**- कः पुनरस्यावल्लभः ?

**दशा०**— यः कृतपुण्यः.

**सीता**— [12]अज्ज खुजीवतीए मएआअमिदिणं पेक्खणिज्जं.

**दशा०**-

येनायमुत्पलाक्ष्याः क्षणमप्यविषह्यवेदनोमदनः,
सतुधन्योपिनधन्यो यदेवमस्या मुदासीनः. १०

**सुच०**- [13]हला, माएव्वं २ आलेहलिहिदं वल्लहं दट्ठूणंएदं एक्कदिणं अदिवाहेउ.

**वि०—** बरें कांहीं चिंता नाहीं. ती कोण आहे व कां दिसत नाहीं हें सर्व हळूहळू समजेल.

**सुच०—**हायहाय ! हिचा संताप तर फारच विकोपास गेला बाई ! चंदनाचे पाल्याचा रस काढून तो तरी हिच्या अंगावर शिंपून पाहतें ! ( असें म्हणून दोन्हीं हातांनीं चंदनाचा पाला कुसकरिते).

**रावण—**

### आर्या.

या तरुणीचें मार्दव हरिती हीं, काय याच हेतूनें
सखिच्या करें निपीडित झालीं चंदनसमुद्भवें[1] पानें. १८

**सुच०—** ( चंदनरस शिंपून ह्मणते ) सखी, या चंदनरसाचे शिंपड-ण्यानें तुला कांहींसें सुखास पडतें काय ?

**सीता.—** (कांहींसी सावध होऊन) अगे सख्यांनो, मजकरितां असे कष्ट तुम्हाला किती काळपर्यंत भोगावे लागणार बरें ?

**सुच०—** सखे, तुझा वल्लभ उद्यांकडे येणार आहे, असें ऐकण्यांत आहे.

**सारण.—** कोण बरें हिचा वल्लभ असावा.

**रावण.—**ज्याच्या पदरीं पुण्य असेल, तोच; दुसरा कोण असणार ?

**सीता.—** आजचा दिवस जेव्हां वांचेन, तेव्हां उद्यांचा दिवस माझ्या दृष्टीस पडेल.

**रावण.—**

### आर्या.

ज्याच्या विरहें पीडा असह्य करितो असी हिला मदन,
तो नर धन्य, अधन्यहि, तीविषयीं जो असा उदासीन.१९

**सुच०—** सखे, असें काय म्हणतेस ? पाटीवर प्राणनाथाचें चित्र काढून त्याकडेस पाहून एवढा आजचा एक दिवस कसातरीं काढ म्हणजे झालें.

---

टीप.—१ चंदनाचीं.

( ततः प्रविशति चित्रसंभारहस्ता शीलवती. )

**शील०**- हलां, एदं चित्तफळअं, इमेचित्रसंभारा ( इत्यर्पयति ).

**सु०**- कहं विधीरत्तणंगेण्हिअ आलिहदुपिअसही.

**सीता**- ( नाट्येन चित्रफलकंगृहीत्वा गात्रस्तंभं नाटयति )

**सु०**- हला, किंचिंतेसी. ?

**शी०**- सुअरिदे, किं पुछिदव्वं ? माहाणुहवो सेसिविणिए दंसिदो मअणेन.

**सारणः**-- महाराज, दिष्ट्यावर्द्धसे. त्वामंतरेण भुवनेषुकोन्यो महानुभावः ?

**दशा०** -- अस्ति मेकौतूहलं. उपर्यपि पश्यामः ?

**सीता**--

मुंत्ता लज्जागरुई गहिअंधरित्तणं पआसेण

जडदेलहेहिदाणिं पुण्णंखणमत्त दाणेण ११

( इतिकथंचि लिखति )

**दशा०**-

ययारेखान्यासो विमलमधुरश्चित्रफलके

दृशोः प्रत्यासंगादविशदगृहीतः प्रतिपदं,

तथाकर्णग्राह्यः कमलदृशमेनांप्रियतमां

लिखंतीमालेख्येकथमतिमृदुः कंकणरवः. १२.

( इतक्यांत चित्र काढण्याचें साहित्य हातांत घेऊन
**शीलवती** पडद्याबाहेर येते ).

**शील०**— सखे, ही चित्र काढण्याची पाटी व हें त्याचेंच साहित्य
( असें म्हणून तें तिचे हवालीं करिते ).

**सुच०**— प्रियसखे, जसें तसें धैर्य धरून आतां प्राणनाथाचें चित्र
काढावें.

**सीता**.— ( पाटी घेऊन स्तब्ध होऊन बसते ).

**सुच०**— सखे, मनांत चिंतन कसलें करितेस ?

**शील०**— अगे **सुचरिते**, यांत पुसायाचें तें काय आहे ? मदनानें
जो महानुभाव हिला स्वप्नांत दाखविला त्याचें चिंतन करितें.

**सारण**.— महाराज, देवानें जिंकिलें कीं ! त्रैलोक्यांत तुम्हा वांचून
दुसरा कोण महानुभाव असणार आहे ?

**रावण०**— मला तर बाबा मोठी उत्कंठा लागली आहे ! बरें पुढें
काय होतें तें पाहूं.

**सीता०**— शरीर काय जड झालें आहे पहा !

### आर्या.

गुरुही[1] लज्जा त्यजिली, आयासेंकरुनि धीर धरिला, गे;
क्षण एक दान देशी, जडते[2] तरि थोर पुण्य तुजलागे. २०
( असें म्हणून मोठ्या आयासानें चित्र काढूं लागते. )

**रावण**.—

### श्लोक.

जशा रेखा पाटीवरि नयनरम्या[3] अनुपमा[4],
जनादावीती कीं सुतनु लिहिते ही प्रियतमा;
तसा कानांनींही परिसुनि मृदू कंकणरवा,
मना होई तर्क प्रबळ लिहिण्याचाचि बरवा. २१

---

टीप—१ मोठी. २ हे जडते. ३ नेत्रांस रम्य. ४ उपमारहित.

**सीता.** हला[१९] सुअरिदे, दुल्लहजणलेहण प्पआसेण किं पओअणंत्ति करिअ दुज्जई मे हिअअं ( इत्यश्रूणि मुंचति. )

**दशा॰**-- नूनमियं रोदिति; यतः

यदनुज्झितलोचनांजनो, विगलत्यात्तकपोलकुंकुमः,
अरविंदपरागरूषितभ्रमरश्रीरयमश्रुसीकरः. १३

**सुच॰**- हला, अलं रोअणेण. सुलहो एव्व सोजणो.

**सीता.**- ( मुखमुन्मृज्य पुनर्लिखति )

**शील॰**- ( अपवार्य ) हलाँ सुअरिदे, पिअसहीए बलवंतो एव्वतस्सिं-जणे. अहिणिवेसो, जं पुलइदकवोलमंडलं सुमरिअ सुमरिअ पकं-पिदंगुलिपल्लवं लिहिअ लिहिअ हरिसोफुल्लोअणेही णिज्झाएई.

**सुच॰**— हला[२१], जह सविणएदिट्ठो, तह लिहिदव्वोत्तिसे अहिलासो.

**दशा॰**- ( आकर्ण्य स्वगतं ) त्हृदय, किमस्थाने चपलमसि. पश्यपु-रस्तादपि.

**सीता.**- ( विलिख्य चित्रंदृष्ट्वा, स्वगतं. )

सीता.— सुचरिते, त्या दुर्लभ मनुष्याचें चित्र काढण्याचे श्रम घे-
ऊन काय उपयोग आहे ? असें मनांत येऊन वाईट वाटतें ( अ-
सें बोलून आसवें ढाळिते ).

रावण.— अरे, ही रडूं लागली यांत संशय नाहीं. कांकीं,

## अभंग.

नेत्रोदकासवें काजळ वाहातें, केशरही येतें गालाचें हो. २३
कमळपरागीं[1] भ्रमर घोळतो, तो कां जैसा होतो चित्रवर्ण, १२
तैसा ओघ हीचे अश्रूंचे बिंदूंचा, विचित्र वर्णाचा गळतसे. २४

सुच०— सखे, रुदन कशाला करितेस ? उगी रहा. तो पति तुला
सुलभ आहे. दुर्लभ कां म्हणतेस ?

सीता.— ( तोंड पुसून पुनः चित्र काढायास लागते ).

शील० ( एकीकडेस वळून सुचरितेस म्हणते. ) सुचरिते, प्रियस-
खीची प्रीति त्या पुरुषाचे ठिकाणीं कांहीं विलक्षणच आहे बाई !
चित्र काढतांना पहा तिची कशी अवस्था होते ती ! पुनः मनांत
आठवण करिते; पुनः पाटीवर लिहिते; पुनः मनांत आठवण क-
रिते; पुनः पाटीवर लिहिते; असें चाललें आहे. जेव्हां जेव्हां ती
त्याची मूर्ती मनांत आणिते, तेव्हां तेव्हां तिचे गालावर, पहा, क-
सा कांटा उभा राहातो तो ! व लिहावयास लागली म्हणजे बोटें
पहा कशीं कांपतात तीं ! लिहिणें झाल्यावर चित्राकडे निरखून
पाहते, तेव्हां तिचे डोळे हर्षानें कसे पहा प्रफुल्लित होतात ते !

सुचरिता.—अगे ठीकच आहे. जसा स्वप्नांत पाहिला, तसा हुबेहूब
पाटीवर लिहावा असा तिचा मनोदय आहे म्हणून तसें करिते।

रावण.— ( ऐकून मनांत म्हणतो ) हृदया बापा, एव्हांच इतका घा-
बरा होऊं नको. पुढें काय होतें तें पहा.

सीता.— ( चित्र काढून व त्या चित्राकडे पाहून मनांत म्हणते ).

---

टीप.—१ कमळांतील रज.

कंदोट्टसामलंगो, कण्णंतणिविठरत्तणअणंतो,

अइदीहपीवरभुओ, कहंविसो ज्जेव तारिसो लिहिदो. १४

( प्रकाशं, सहर्षं संस्कृतमाश्रित्य )

इदं इदानीं

पाणौ कार्मुकमाकलय्य, शरधी पाश्चात्ययोरंसयो,

र्भस्मस्तोकमुरःस्थले, कटितटे मौर्वीमयीं मेखलां,

किंचाहं वदनारविंदमधुपश्रेणीमनोहारिणी

मस्यश्मश्रुपरंपरामभिनवां कुर्यांकपोलस्थले. १५

( इतिपुनर्लिखति. )

दृशा०-- ( चित्रंदृष्ट्वा, निश्वस्य, स्वगतं ) कथमिदमन्यथावर्तते. त्दृदय वृथा ते मनोरथः.

सीता.-- ( विलिख्य, चित्रगतं नायकं प्रति अंजलिंबध्वा, संस्कृत माश्रित्य अयिकांत, संप्रतिहि.

मयिमलयसमीरोवर्षतीवस्फुलिंगा.

नहह हिमकरोमा म मना सिंचतीव,

किमितिमकरकेतोः किन्नुवक्ष्येकठोरं १

कथमपि तदहंते नाथनोपेक्षणीया. १६

अपिच ( मानदइत्यर्द्धोक्तिस्वगतं. ) कहंअलेखगअं पिअजणंपर मत्थोत्ति गेण्हिअ मए विमुद्धाए उवालद्धुं पउत्तं, ( इतिसंवरण नाटयति )

---

१ नीलोत्पलंतुकंदोत्थमितिकोशः

श्लोक.

नीलोत्पलाचे परि नील वर्ण, आकर्ण[1] नेत्रांतहि रक्त पूर्ण,
भुजा जयाच्या अतिदीर्घ पीन[2] तसाचि कष्टे लिहिला अनून[3] २३

श्लोक.

हातीं कार्मुक[4], पाठिशीं सुशरधी[5], भस्मप्रलेपा उरीं,
काढुनी तसि मेखलाहि कमरे मौर्वीमयो[6] साजिरी;
आतां आस्यसरोरुहीं[7] अलिपरी[8] चित्ताभिरामा असी
इषत् श्मश्रुपरंपरा[9] अभिनवा ही काढिते मी तसी. २६

( असें म्हणून पुनः पाटीवर लिहिते ).

**रावण**.—(चित्राकडे पाहून निश्वास टाकितो आणि मनांत म्हणतो)
अरे हें तर भलतेंच झालें! त्हदया, तुझा सर्व मनोरथ निष्फळ होय!

**सीता**.— ( पाटीवर लिहून आणि त्या लिहिलेल्या नायकाप्रत हात जोडून म्हणते ) अहो प्राणनाथ, पहा सांप्रत माझी कशी अवस्था झाली आहे ती!

साक्या.

स्फुलिंगवर्षणें[10] मजवरि करिजणु मलयसमीरण[11] काय!
शीत किरण[12] ही अग्निसेचनें भाजितसे हा काय[13]. २७
मदन दुःख जें तीव्र देतसे, न सांगवे तें माला;
कर जोडूनि विनवितें नुपेक्षा नाथा[14] दीनजनाला. २८

अणखी हे मानद, ( असें अर्धेच वाक्य बोलून मनांत म्हणते ) अगे, मी काय वेडी पहा! या पाटीवरील चित्रासच प्रत्यक्ष प्राणनाथ असें समजून त्याला शब्द ठेवायास लागलें. ( असें म्हणून आठ-पल्या सारिखें दाखविते ).

टीप.—१ कर्णपर्यंत;२पुष्ट.३हुबेहुब.४धनुष्य.५भाता.६धनुष्याचीदोरी ७मुखकमळीं. ८भ्रमरांसारिखी. ९मिशा. १०ठिणग्याची वृष्टी.११ मलयवायु. १२ चंद्र. १३ देह. १४ अहो नाथा.

शील०- ( विहस्य ) [२४] हला, सावसेसंवि अतुहवअणं.

सीता - ( सलज्जं ) [२५] णकिंवि अवसिस्सइ लिहिदो ज्जेव सोजणो.

सख्यौ.- ( चित्रंदृष्ट्वाअन्योन्यंप्रति ) [२६] सहीजइ चित्रगदस्सआकिदी,

तहमण्णेइदोपि असहिए मणोरहो अत्थि.

सार०.- ( साश्चर्यं चित्रंदृष्ट्वा )

एतत्पद्मदलेक्षणंमुख, मिमौबाहूयुगव्यायता,

वत्याभोगमिदंभुजांतर, मयंमध्यः प्रकामंतनुः,

साम्राज्योचितचिन्हमुदितमिदंद्वंद्वंपुनः पादयोः,

कोनामैषजगत्त्रयेपिनपुनर्दृष्टः पुमानीदृशः। १७

दशा०- ( स्वगतं )

नवकुवलयपत्रश्याममस्येदमंगं

घटयितुमलमक्ष्णोरुत्सवंविद्विषोपि.

प्रकृतिरियमुदारासाधुभिः श्लाघनीया

कथयतिचमहत्त्वं, दुर्लभंयत्परेण. १८

( प्रकाशं )विद्युज्जिव्ह, पश्यचित्रलिखितं.

विद्यु०- दृश्यतएव. पंकिल.

**शील०**— ( हांसून ) सखे, तुझें भाषण पुरतें झालें नाहीं, कांहीं उरल्यासारिखें वाटतें.

**सीता**.— ( लज्जित होऊन ) नाहीं नाहीं. चित्र सगळें काढिलें, आतां कांहीं उरलें नाहीं.

**दोघी सख्या**.— ( चित्राला पाहून एकमेकीस म्हणतात ) अगे, जशी ह्या चित्रांतल्या पुरुषाची आकृति, तसाच यावर आपल्या प्रियसखीचाही मनोरथ आहे.

**सारण**.— ( आश्चर्यानें चित्राकडे पाहून म्हणतो ).

### श्लोक.

हें पद्मच्छदनेत्र वक्त्र[1], अणि हे आजानु बाहू तसे,
हें वक्षस्थळ थोर, ही कटितटी बारीक भारी दिसे,
साम्राज्योचित[2] लक्षणें करुनियां हीं पाउलें शोभती,
त्रैलोक्यांत न देखिला नर दुजा ऐसा सुचिन्हाकृति[3]. २९

**रावण**.— ( मनांत )

### श्लोक.

याचें कोमलनीलपद्मरुचि[4] हें पाहोनियां अंग हो,
शत्रूच्याहि मनांत हर्ष उपजे; लावण्य हें काय हो !
याचें शील उदार फार सुजनश्लाघार्ह[5], जें कीं जनीं
सांगे, दुर्लभ हें महत्त्व इतरां जाणा असें हो मनीं. ३०

( मोठ्यानें विद्युज्जिव्हाप्रत ) विद्युज्जिव्हा, पाठीवर कोणाचें चित्र काढिलें आहे तें पहावें.

**विद्यु०** तें स्पष्ट दिसतच आहे.

---

टीप.—१ पद्मपत्राप्रमाणें आहेत नेत्रें ज्याला असें मुख. २ साम्राज्यास योग्य. ३ सुचिन्हयुक्त आकृति ज्याची असा नर. ४ निळ्या कमळापरी ज्याची कांति असें अंग. ५ सुजनांस स्तुत्य.

महात्मानं ब्रूते युगलमरुणांतंनयनयो,
रुरोमस्य स्तोकच्छुरितमपि वर्णी तिवदति,
युवानंन्याचष्टे विरलमधुरश्मश्रुवदनं,
करः कोदंडांकः कथयतिचराजन्यइतिनः. १९

शील०— सुंअरिदे, पेक्खदु होदी. ( इतिचित्रंदर्शयति )

सुच०- (विहस्य) हलॅ मए पेक्खंतीए किं पओअणं ? जईसोपिअ- जणो एव्वं पेक्खइ तदो तुहकरःकमलस्सपारितोसिअंरअणकड- अं आमुंचइ.

दशा०- सत्यमाह सुचरिता. यतः

नरेखाः सांकर्यं दधति, मचवर्णव्यतिकरों,
निवेशे रंगानामपि ससनाभावोन विवृतः,
किमन्य, चैतन्यं जनितमिव चित्रेशुचितया,
तदस्या वैदग्ध्यं जयति, जगदानंदयतिच. २०

शी०— सुंअरिदे, तुमं भणामि. पिअसहीए करकोसलं उप्पेक्खिदुं अ, ता पढमं जेव्व सेहत्थे कडःमजुअलं आमोचिदं, जं तादको सिएण रक्खसंधं करणमणि घडिअं जाणईए हत्थे आमुंचे हत्ति तुहहत्थे समप्पिदं आसि. जासि रक्खसंघकरणेणाम मणो

( दशाननः सारणश्च श्रुत्वा परस्परं मुखमवलोकयतः )

### श्लोक.

सांगे रक्त अपांग थोर नर हा ऐसें; उरीं भस्म तें
वर्णी,[1] श्मश्रुपरंपरा[2] नवयुवा[3] ऐसेंचि हे बोलते;
कोदंडांकित हस्त सांगत जया राजन्य[4] ऐसेंचि; हा
वर्णी क्षात्रयुवा उदारहि तसा चिन्हीं तुम्ही ह्या पहा. ३१

**शील०—** ( सुचरिते, हें चित्र तूं पहा असें म्हणून तिला तें चित्र दाखविते. )

**सुच०—** ( हांसून अगे तें मी पाहून उपयोग काय ? जर त्या प्रियजनानें हें पाहिलें तर तो रत्नखचित कांकण बक्षीस ह्मणून तुझ्या करकमलांत घालील.

**रावण—** सुचरिता बोलते हेंच खरें. यांत संदेह नाहीं. कारण,

### आर्या.

रेखासांकर्य[5] नसे, नाहीं वर्णांत हीनता कांहीं,
जें जेथें योग्य दिसे तें तें तेथेंचि काढिलें पाही. ३२
फार काय वर्णू मीं हें तों जीवंत चित्र दिसतें कीं !
ऐसें कौशल्य हिचें सर्वोत्तम तोष कां नदे लोकीं. ३३

**शील०—** सुचरिते, हें हिचें हस्तकौशल्य मनांत आणून पूर्वोक्त राक्षसांधकरणमणिघटितकटकयुगुल ह्मणून जो कांकणाचा जोड **विश्वामित्र** काकांनीं **जानकी**च्या हातांत घाल ह्मणून तुजपाशीं दिला होता, तो कांकणांचा जोड हिच्या हातांत आहेच. याप्रमाणें, अगाउच हिला बक्षीस मिळालें आहे. ह्या कांकणांस राक्षसांधकरण ह्मणजे राक्षसांस आंधळे करून टाकणारे असे मणी जडले आहेत. त्यायोगें जो कोणी यांचें धारण करितो, तो राक्षसांस दिसायाचा नाहीं. असा ह्या कांकणांत गुण आहे. ( हें ऐकून **रावण** आणि **सारण** एकमेकांच्या तोंडाकडे पाहतात )

---

टीप.–१ ब्रम्हचारी. २ मिशा. ३ नूतन तरुण. ४ क्षत्रिय. ५ रेघांची मिश्रता.

**विद्यु०**— ( विहस्य ) श्रुतंच श्रोतव्यं, विदितंच वेदितव्यं. इयंच सीता, अयंच रामः, यास्माभिर्नदृष्टा यश्चैतयालिखितः.

**दशा०**— किमयमेव वैदेहीप्रणयावतारदुर्ललितो रामहतकः ?

( सामर्षं चित्रंप्रति )

मागर्वंवह, रघुवंशपांसन, त्वं,
वैदेही प्रणयपदं वपुर्ममेति;
मारीचस्तव निधनाय मन्मुक्त
स्त्वद्बाताद्विरमति किंनुतावतैव ? २१

**सारण**:— महाराज, पश्यतु भवानविनयं कौशिकस्य. येनैवमस्यै राक्षसांधंकरणमणिघटितकटकयुगलमर्पितमासीत्. नूनमनेन दृष्टमात्रामेनामपहरिष्यति भवानितितर्कितं भवेत्.

**विद्यु०**— एवमेवैतत्. अभिज्ञः खल्वयंक्षत्रियब्राह्मणः.

**दशा०**— ( आकाशेलक्षंबध्वा, सक्रोधहासं ) अरेरेक्षत्रियापसद,
स्रष्टुंद्यांचतुरोसि, नाभिभवितुंमारीचमायोधने;
रंभांस्तंभयितुंक्षमोसि, नपुनर्जेतुंरणेताटकां
शक्तस्त्रातुमपित्रिशंकुमलसं, वध्यंनमेराघवं;
तन्मन्येमयिविप्रियाचरणतोमर्तुंपुनश्चेष्टसे. २२

**सार०**— किमुच्यते "मर्तुंपुनश्चेष्टसइति" ? मृतएवायं.

**विद्यु०**— ऐकावयाचें ऐकिलें, व जाणायाचें जाणलें. जी आपल्याला दिसत नाहीं, ती **सीता**, व ज्याचें तिनें चित्र काढिलें, तो **राम**.

**रावण**— **जानकी**चा ज्याविषयीं इतका स्नेहाचा अतिशय, तोच हा दुरात्मा राम्या ना ? ( क्रोधानें चित्रापत )

### श्लोक.

**सीते**ला अवडे स्वरूप मम हें ऐसें अणोनी मना,
गर्वाला न धरी कदापि रघुच्या वंशास दुर्लांछना[१] ;
माराया तुजला नियोजित असे **मारीच** माझा बळी,
तो नाहीं भुलणार पाहुनि तुझी मूर्ती अशी सांवळी. ३४

**सारण**.— महाराज, **विश्वामित्रा**नें हें केवढें दांडगेपणाचें कृत्य केलें तें आपणच पहावें. त्यानें " राक्षसांधंकरणमणिघटितकटक युगुल" हा कांकणाचा जोड **जानकी**ला घालायास दिला ! यावरून दृष्टीस पडतांक्षणींच आपण तिला मागतील असा त्यानें खचित तर्क केला असावा.

**विद्यु०**— होय असा त्यानें तर्क बांधिला असेल खराच. तो क्षत्रियब्राह्मण मीठा हरामी आहे; यांत संशय नाहीं.

**रावण**— ( आकाशाकडे पाहून व क्रोधानें हांसून अरेरे दुष्टा क्षत्रिया!

### श्लोक.

निर्माया जग दक्ष तूं, परि नरे मारीच मारावया;
रंभास्तंभनशक्तही, परि न तन्मातेस[२] जिंकावया;
पाळाया बलिया त्रिशंकुनृपती[३], रामा न रक्षावया;
माझें विप्रिय चिंतिशी खचित हें मृत्यूस पावावया.३५

**सारण**.— " मृत्यूस पावावया" असें कां ह्मणतां महाराज ? मेलाच असें ह्मणा.

---

टीप- १ रघूच्या वंशास दुर्लांछनरूपा. २ताटिकेस. ३त्रिशंकु नामें राजाला.

दृशा०- ( सोत्कंठं ) तत्तिष्ठतु. जानकींद्रष्टुमुपायश्चिंत्यतां.

सार०- दृष्टएव.

दृशा०- ( सोत्साहं ) कथमिव. १

सार०- ( कर्णे एवमेवमिति कथयति. )

दृशा०- ( विहस्य ) निपुणमुपक्रांतं भवता. भवितव्यं भवताऽ योध्यकमुनिवेषेण कटक ग्रहणाय.

सार०- ( तथेत्युत्थाय मुनिवेषेण प्रविशति. ) अयोध्यकोहमध्व परिश्रांत्या विव्हलोस्मि. संभावय मामेकच्छायादानेन, व्यजनप वनदानेनवा. ( मूर्छांनाटयति )

विद्यु०- देव, पश्य सारणस्य कौशलं.

बद्धश्लथपिंगजटः, स्वेदकणस्विन्नभस्मपुंड्रमुखः.

निश्वसिति दंडपाणि, र्व्याकुलकृष्णाजिनोयमृषिः.२३

सीता०- ( ससंभ्रमं ) अयोद्धओत्ति सुणीअदि, तासुअरिदे, संभावेहि बम्भणं.

सुच०- ( उपसृत्य ) बंभण, विस्समदाव ( इति नलिनीदलेन वी जयति. )

**रावण**.— ( उत्कंठित होऊन ) ह्या गोष्टी आतां एकीकडे राहूं दे. पण **सारणा** आधीं **जानकी** दृष्टीस पडेल असी कांहीं युक्ती शोधून काढ गड्या.

**सारण**— महाराज, या उपरांत शोधायाची आहे असें नाहीं, आधीं-च शोधून ठेविली आहे.

**रावण**— ( उत्साह पावून ) हांहां ! तर मग सांग कोणती ती !

**सारण**— ( असें असें करायाचें असें कानांत सांगतो ).

**रावण**— ( हांसून ) वाहवा ! खासी मसलत काढिली त्वां ! चल आतां **अयोध्ये**हून आलेल्या मुनीचा वेष घेऊन तेल्हवा कां-कर्णांचा जोड घेऊन ये तर.

**सारण**— आज्ञा महाराज. ( असें म्हणून मुनीचा वेष घेऊन येतो, आणि म्हणतो ) अहो मी ब्राम्हण **अयोध्ये**हून आलों आहें. मला मार्ग चालण्याचे फार श्रम झाले आहेत. तर कोणी तरी मला थंडशी छाया देऊन किंवा पंख्यानें वारा घालून माझा समाचार घ्याल तर बरें होईल ? अरेरे ! फार ग्लानी येते ! ( असें बोलून मूर्छित झाल्यासारखें दाखवतो ).

**विद्युज्जिव्ह**— महाराज, **सारणा**चें कौशल्य पहावें !

### साक्या.

शिरीं जटांचा भार बांधिला तोही शिथिलित[1] झाला;
भाळीं घर्म अला त्यायोगें भस्म पुंड्रही ओला;
श्वास टाकितो, थरथर कांपे, कृष्णाजिन[2] ही पाठीं;
कैसा मुनि हा पहा चालिला हातीं घेउनि काठी ! २६

**सीता**— ( घाबऱ्या घाबऱ्या ) अगे, हा ब्राम्हण **अयोध्ये**हून आं-ला म्हणतो, तर **सुचरिते**, तूं जाऊन त्याचा समाचार घे.

**सुचरिता**— ( त्याचे जवळ जाऊन ) महजीबावा, विसावा घ्या ! ( असें म्हणून नलिनीचे पत्रानें वारा घालिते ).

टीप.—१ ढिला. २ हरिणाचें कातडें.

मुनिः- ( चक्षुषी उन्मील्य ) उज्जीवितोस्म्यहमकारणवत्सलया भवत्या.

सुच०- ( स्वगतं ) दिट्ठिआ[32] लद्धसण्णोबम्भणो. ( प्रकाशं ) को भवं ? कुद आगमणं ?

मुनिः. अस्ति खलु दशरथस्य राजर्षेः प्रथमसूनुः

सीता— ( ससंभ्रमं ) किंतस्स[33].

दशा०— ( साभ्यसूयं ) ताटकया मारीचेनच निपातितः

सुच०— बम्भण[34], उवरि कहेहि.

मु०— शुष्यति मे जिव्हा.

दशा०— किंनदीर्यते विपक्षकथनेन ?

सी०— ( सवेगं ) एसो[35] अण्पिअंवत्तुकामोदिस्सइ. ( इतिविषादं नाटयति )

शील०— हला[36], बम्भणस्स जलपाणं निवेदुहि. सुणुमो सेसंवि व अणं.

सुच०— नलिनीपत्रपुटेन नदीजलमाहृत्य ददाति.

मुनिः— न पिबामि स्त्रीजनदत्तमुदकं व्रतग्रहणेन.

सी०— ( सास्रं )सच्चं[37] जलपाण विमुहो, विसण्णो, बम्भणो दुल्लहं पिअजणस्स जीविदंति तक्केमि.

मुनिः— ( स्वगतं ) नकेवलं तस्य, किंतु कौशिकस्यापि तदभिमानिनः ( प्रकाशं )

**मुनि.**—( डोळे उघडून ) मुली, तुला कांहीं गरज नसतांही तूं दयाळू-पणानें वारा घातला त्या योगानें मला आतां जीव आला बरें !

**सुचरिता**— ( मनांत ) बाई, ब्राह्मण सावध झाला. बरें झालें. नाहीं तर मलतेंच झालें असतें ! ( मोठ्यानें ) भटजीबावा, आपलें नांव काय व आपलें येणें कोठून झालें ?

**मुनि**— **दशरथ**नामक जो राजर्षी याचा वडील मुलगा-

**सीता**— ( घाबऱ्यां घाबऱ्यां ) त्याचें काय ? त्याचें काय ?

**रावण**— ( द्वेषबुद्धीनें ) **ताटिका** आणि **मारीच** ह्यांनीं त्याला लोळवलें; आणि दुसरें काय असावयाचें ?

**सुचरिता**— भटजीबावा, '**दशरथ** राजाचा वडील मुलगा' ह्याचें पुढें सांगा.

**मुनि**— काय करूं ! माझी जीभ कोरडी पडते गे !

**रावण**— कोरडी पडते हें काय ? शत्रूचें वर्तमान सांगण्यानें आणखी ती गळून नाहीं पडणार ?

**सीता**— ( घाबरी होऊन ) अगेबाई ! हा कांहीं तरी अनिष्ट सांगणार असें दिसतें ! हायहाय ! ( असें म्हणून खिन्न होते ).

**शीलवती**— सखे, आधीं ह्याला पाणी प्यावयास देऊं, नंतर बाकीचें वर्तमान पुसूं.

**सुचरिता**— ( कमळाच्या पानांच्या द्रोणांत पाणी आणून देते ).

**मुनि**— मुलीनो, मी बायकांचे हातचें पाणी पीत नाहीं, कारण मी व्रतस्थ आहे.

**सीता**— ( डोळ्यांस पाणी आणून ) खरेंच सांगते, हा ब्राम्हण पाणी पीत नाहीं, व खिन्नही दिसतो, यावरून प्रियजनाचें कुशल असणें दुर्लभ वाटतें.

**मुनि**-( मनांत ) त्याचेंच कुशल दुर्लभ इतकेंच नव्हे, तर त्याचा कैवारी जो **विश्वामित्र** त्याचेंहि कुशल दुर्लभ होय ! ( मोठ्यानें )

अलमावेगेन. सत्यंनपिबामिस्त्रीजनदत्तमुदकंव्रतग्रहणेन.

**सुच॰**— [३९] भअवं, उवरिकहेहि.

**सीता**— [३२] दीर्णंखुमेहिअअंजलणस्स वाअमअस्सवाअंतरे चिठइ.

**मुनिः**— नूनमिदानीमीदृशस्यममदर्शनेनपितरौप्रियपुत्रौशोचिष्यतः

**वियु॰**— ( सोपहासं ) नकेवलंतौविरुद्धवेषग्रहणेन, सर्वापिराक्षसजातिः,

**सी॰**- [४०] किंमिमिणा वअणेण समाउलस्स मेहिअअस्स ?

**शी॰**— [४१] सच्चं रक्खसोएसो, जोएव्वंअप्पिअंकरिअ उवरिणकहेइ.

**मुनिः**- ( सभयंस्वगतं ) कथंविज्ञातोहमनया ? ( विमृश्य ) नैतत्संभाव्यते. ( प्रकाशं ) तस्याहं प्रियसखोरामभद्रस्य.

**दशा॰**- ( विहस्य ) कःसंदेहः ? येनतंघातयितुं प्रथममारब्धम्.

**सी॰**- [४२] एदंणालमाआसस्स. बम्भण, कहेहिकिंएत्थआअमणेपओअणं

**मुनिः**- सर्वंकथयामिवः नखलुदशग्रीवपक्षपातिन्योयूयं ?

**सी॰**-[४३] सच्चं. एसोपिअजणस्स अब्भंतरांतरो, जाएव्वंभणादि,

**शी॰**-[४४] हला सुअरिदे, दसग्गीवोणामकोएसो ?

घाबरें होण्याचें काय प्रयोजन ? वास्तविकच मला व्रत आहे म्हणून मी बायकांचे हातचें पाणी पीत नाहीं म्हणतों.

**सुचरिता—** ( महाराज, आतां पुढें सांगा ।

**सीता—** एकीकडे अग्नि व एकीकडे अमृत, दोहींचे मध्यें माझें त्द्दय सांपडलें आहे !

**मुनि—** आईबापांचा मजवर फार लोभ आहे, त्यांनीं माझी असी अवस्था पाहिली तर खचित त्यांना फार दुःख होईल !

**रावण—** ( थट्टेनें ) खरेंच आईबापांनाच काय ? असला विरुद्ध वेष धारण केल्यावरून सर्व राक्षसज्ञातीला सुद्धां दुःख होईल.

**सीता—** माझें त्द्दय फार व्याकुळ झालें आहे, त्याला ह्या अशा भलत्याच गोष्टी सांगून काय उपयोग ?

**शील॰—** खरेंच सांगतें, हा कोणी तरी राक्षस आहे बाई ! म्हणून असें दुःखांत घालून पुढें बोलत नाहीं.

**मुनि—**( भय पावून मनांत म्हणतो ) काय ! हिनें मला वळखिलें ? ( विचार करून ) नाहीं. ही गोष्ट संभवतच नाहीं. ( मोठ्यानें म्हणतो ) त्याचें नाव **रामभद्र**, त्याचा मी प्रियसखा आहें.

**रावण—** ( हसून ) त्याचा प्रियसखा खराच; यांत संशय नाहीं ! म्हणूनच तर त्याला मारून टाकण्याचा हा उद्योग प्रथम मांडला आहे ! केवढी मैत्री ही !

**सीता—** एवढ्या.नें आमचें समाधान होत नाहीं. तर भटजी, आपणास येथें येण्याचें कारण काय झालें तें सांगावें.

**मुनि—** मी तुम्हाला सगळें सांगतों, पण तुम्ही **रावणा**च्या पक्षांतल्या नव्हांना ?

**सीता—** खरेंच गडे, हा कोणी तरी प्रियजनाच्या अगदीं अंतरंगांतला आहे म्हणून असें विचारितो !

**शील॰—** **सुचरिते**, रावण तो कोण आहे गे ?

दशा०- ( सरोषं ) धिङ्मूर्खे त्रैलोक्यविजयिनंनजानासि.

मु०-

हराद्रेरुद्धर्त्ता, हरिहयकिरीटार्चितपदो.

कठोरस्कंधाग्रप्रकटहरिचक्रव्रणकिणः,

प्रपौत्रोयंसाक्षात्त्रिभुवनविधातुर्भगवतो,

दशग्रीवोयंवः कथमनवतीर्णः श्रुतिपथं ? २४

सी०— ( सामर्षं )४५ किंइमिणासेगुणकहणेण ? जस्सिरकखसोत्ति-लोअस्समहंतोउपक्कोसो.

दशा०— ( समुखभंगं ) विद्युज्जिव्ह, श्रुतंचश्रोतव्यं, विदितंच-वेदितव्यं.

विद्यु०— अतएवैतस्यावशीकरणे तस्यरामभद्रस्य रूपग्रहणंविना न-पश्याम्युपायांतरं.

दशा०— अशक्यमिदंवोरावणस्य. पश्यपश्य.

युक्तंकिंवरवर्णिनींवरयितुं, यानानुरक्तास्वयं ?

तस्याः संवरणायहंत नृपशोः किंधर्त्तुमर्हंवपुः ?

आबाल्यादपियः सखा, किमुचितस्तद्विप्रलंभोथवा ?

किंवामेविनिपात्यमानयशसी, कामोनुरोद्धुंक्षमः ? २५

विद्यु०— महाराज, किमकांडेविक्लवोसि ?

यदस्तिवंचनानाम, तदस्तिकुलजीवितं,

यदालंब्य गृहीतेयं, क्रमेण वशमेष्यति. २६

**रावण**— ( क्रोधानें ) हा मूर्ख ! त्रैलोक्य जिंकणाऱ्यालाही तूं जाण-
त नाहींस काय ? तुला धिक्कार असो !

**मुनि**—

**श्लोक.**

कैलासा उचली करेंकरुनि जो, ज्याच्या पदाब्जा[1] शिरें[2]
वंदी इंद्रहि, विष्णुचक्रजकिण[3] स्कंधीं कठोरीं खरे,
निर्मी जो भुवनत्रयासहि विधी[4] नप्ता[5] तयाचा असा,
जो तो रावण, गे, प्रसिद्ध असतां, तुम्हा न ठावा कसा ? ३७

**सीता**.— ( रागानें ) राक्षस राक्षस असें म्हणून लोक ज्याची नेहमीं
निंदा करितात, त्याचे गुण हो कशाला वर्णितां ? तें पुरे करा.

**रावण**— ( तोंड वाईट करून ) विद्युज्जिव्हा, झालें आतां ! ऐका-
याचें तें ऐकिलें, जाणायाचें तें जाणिलें !

**वि०**— म्हणून तर हिला वश करण्याकरितां रामभद्राचेंच रूप
घेतलें पाहिजे; त्याशिवाय दुसरा उपाय दिसत नाहीं.

**रावण**— ही तुमची गोष्ट रावणाला अशक्य होय. पाहापाहा !

**आर्या.**

जो स्त्री स्वयें विरक्ता, वरणें कीं युक्त तीस ? सांग मला.
तीस वराया नरपशुवेष तुला ग्राह्य, रे, कसा गमला ? ३८
जो मित्र बाळपणचा वंचावें त्यास काय म्या आजी ?
मदनार्थ कीर्ति मानहि व्हावें टाकावया कसें राजी ? ३९

**वि०**— महाराज, हें काय ? भलतेंच कारण काढून खेद करण्यास
काय म्हणावें ?

**आर्या.**

वंचुनि सीतेस वरा, वंचन हें राक्षसोपजीवन ही.
होइल हळुहळु वश ती तुम्हास संशय मनांत नच राही. ४०

---

टीप— १ पदकमलातें. २ शिरेंकरून. ३ विष्णुचक्रोत्पन्न व्रण.
४ ब्रह्मदेव. ५ नातु.

सुच०— [96] हला शीलवदि, किंणजाणासि सोलंकेस्सरो, जं महप्प-
हावं तादजणओपि असहोत्ति पसंसंतो चिट्ठइ. १

दशा०— अतएव स्नेहान्नावस्कंद्यते मया जानकी.

शी०— [48] बह्मण, दसग्गीवे सुमरिदे दोसी, अम्हेण एदस्स पक्खवादि-
णी अे रक्खसि अे; किंदु एसाजाणई, अहं अइअंअ एदाए
सहिओ.

मुनिः— हंत, जानकीति सम्यक्. ( अवनीतलं निर्दिशति. )

सुच०— [48] अवं, दाणिं मण विसद्धं.

शील०— [49] बह्मण, जइ कुसलं भणिस्ससि, तदो जाणइ तुह हत्थे
कडअं पारितोसिअं दाइस्सदि.

मुनिः ( स्वगतं ) यदर्थोयमारंभः ( प्रकाशं ) किमस्यद्भणितव्यं. १

सी०— ( सावेगं ) [50] किंउघरिदो मज्झमलोअस्स अलंकारो ( इति
मूर्छा नाटयति )

सख्यौ०— हा जोणइ, हा सहिजणवस्सले, हा मूलोअमंगल दि-
विए, एत्तिअंकालं अणुवट्टमाणं सहीजणं उज्झिअ णिक्करुणा
ए तुए अइर परिचिदस्स मणोरहवल्लहस्स एव्व अणुप्प आणं
ववसिदं ( इति रुदितं नाटयतः )

मुनिः. कथमस्थाने महानातंकः ? श्रोतव्यं मेवचः.

**सुच०**— अगे **शीलवति**, तुला तो महाप्रतापी **लंकेश्वर** ठाऊक नाहीं हे कसें ? 'तो आमचा प्रियसखा, तो आमचा परम मित्र' असें आपले **जन**करावजी तर नेहेमीं त्याची प्रशंसा करीत असतात.

**रावण**-म्हणून तर आम्ही **जान**कीला बळेंच हिसकावून आणीत नाहीं.

**शील०**—भटजीबावा, **रावणाचें** नांव घेतलें तरी आम्हास दोष लागेल. मग आम्ही त्याच्या पक्षांतल्या कोठून असणार ? आम्ही कांहीं राक्षसिणी नव्हे. तर ही **जन**कराजाची कन्या **जानकी** आणि आम्ही दोघीजणी हिच्या सख्या आहों.

**मुनि०**— अरे ही **जान**कीना ? फार चांगलें झालें तर ! ( असें म्हणून भूमीकडे पाहतो ).

**सुच०**— भटजी, आतां शंका न धरितां खुशाल बोला बरें !

**शील०**— भटजी महाराज, जर तुम्ही खुशालीचें वर्तमान सांगाल तर ही **जानकी** कांकणांचा जोड तुम्हाला बक्षीस देईल.

**मुनि**.— ( मनांत म्हणतो ) तेवढ्याकरितांच तर इतका प्रयत्न चाल-विला आहे. ( मोठ्यानें म्हणतो ) दुसरें काय सांगायाचें आहे ?

**सीता**.— ( घाबरी होऊन ) काय ! मध्यम लोकाचा अलंकार नाहींसा झाला ? हायहाय ! ( असें म्हणून मूर्छित होते ).

**दोघी सख्या**.— हा **जानकी**, हा सखीजनवत्सले, हा भूलोकमं-गळदीपिके, इतका काळपर्यंत आम्ही तुझ्या मर्जीप्रमाणें वर्तलों असतां, तूं अशी निर्दय होऊन आमचा त्याग केला, आणि नुक-ताच ज्याचा परिचय झाला, त्या मनोरथवल्लभाच्या मागोमाग जाण्याचा बेत केला ना ? सखे, हें त्वां काय केलें ? आतां कसें करावें बाई ! ( असें ह्मणून धांई धांई रडतात ).

**मुनि**.— विनाकारण असा आक्रोश करितां हें काय ? माझें बोलणें तर पुरतें ऐकून घ्याल कीं नाहीं ?

**सख्यौ—** हेलो, समस्ससिहि. सुणुमो सेसंविवअणं.

**सी०—** ( समाश्वस्य मुनिं पश्यति )

**मुनिः—**

स्मरएव राममूर्तिः कौशिकवपुषात्वदीयपुण्येन.

आनेष्यते दिनेस्मि, न्यहर्षितव्ये कुतः शोकः ? २७

**दशा०—** ( विहस्य ) अयि सारण, मुनिर्भवन्नपि कथमनृतं वदसि ? दशग्रीवो विद्युज्जिव्हेनेति पठितव्यं.

**सख्यौ—** [५३] दिठ्ठिआवट्टसे

**सीता०—** ( सहर्षं संभ्रममुत्थाय सारणस्य हस्तयोः पारितोषिकं कटकद्वयं ददाति. )

**दशा०—** ( सविस्मयं )

विद्युद्भिः प्रकटितकुंकुमप्रभाभिः किंविष्वक्पवितनमभ्रनिर्व्यपेक्षं ?
निष्टप्तद्रुतकनकद्रवैरिदानीं लिप्यते यदव निरंवरं दिशश्च ? २८
हंत, कथमेतत् !

प्रभापटलमीलितामपि कथंचि दुन्मीलयन्

नयावदहमर्पये ततद्दतोपि दृग्विशतिं

तडिद्भि रिव निर्मिता मम हि तावदग्रेवधू

रनन्य सुलभा कृतिर्जगति काचिदालक्ष्यते ! २९

**दोघी सख्या—** सखे जानकी, सावध हो सावध हो ! हा ब्राह्मण काय सांगतो तें पुरतें ऐकून घेऊं !

**सीता.—** ( सावध होऊन मुनीकडे पाहते ).

**मुनि.—**

### आर्या.

**राम** नव्हे मदनचि तो, **कौशिक**वेषें त्वदीय पुण्य तया,
आणील आजि येथें; हर्ष करा, सर्व शोक टाकुनियां. ४१

**रावण—** ( हांसून ) अरे **सारणा,** मुनि झालास तरीं खोटें बोलतो सना ? **रावणाला विद्युज्जिव्ह** घेऊन येतो असें सांग.

**दोघी सख्या.—** सखे, तुझें भाग्य थोर बरें !

**सीता—** ( हर्षयुक्त होत्साती धावऱ्यां धावऱ्यां उठून **सारणाच्या** हातांत बक्षीस म्हणून कांकणांचा जोड देते ).

**रावण.—** ( विस्मय पावून ).

### श्लोक.

झाल्या ह्या प्रकट विजाचि रक्तकांती,
निर्मेघा चहुंकडुनीहि धांवताती,
आकाशक्षितिककुभा[1] हि यत्प्रभेनें[2]
सोन्याच्या दिसति ह्मलिप्त कीं रसानें ! ४२

ओहो ! हें असें कसें बरें झालें ?

### साक्या.

तेजाच्या कल्लोळें दिपुनी वीसहि नेत्रें गेलीं;
यत्नें उघडीं तंव एकसी अग्रभागिं पाहीली. ४३
कांति तिची मी काय सांगुं जणु विजा घडोनी केली;
ऐसी सुंदर आकृति जगतीं इतरा न लभ्य झाली. ४४

( इतक्यांत पडद्यापलीकडे शब्द होतो ).

---

टीप—१ दिशा. २ ज्यांच्या कांतीनें.

( नेपथ्ये )

अवेक्षितुं कौशिक यज्ञं अनुसूया संहितो महर्षिरत्रिरागतः ततः

कृतार्घो जनकः कुमारीमामंत्रयति अस्याभिवंदनाय.

**शां०—** [५४] दिठिआ पिअसहीए उत्तरोत्तरं पिअंदिस्सई चिरआल-

पुरंध्धी आपुण्णदंसणा खु भअवदी अणुसूआ.

**सीता.—** ( सविस्मयं ) अंपि मे कोदुहलं. ता गच्छम्ह.

( इति निष्क्रांताः )

**दशा०—** हा कथमक्षिपथमतिक्रांतैव सुंदरी !

दृष्टं नाननमिंदुबिंबमधुरं, दृष्टौ न पीनस्तनौ,

तस्याः किंकथयामि पक्ष्मलदृशोदृष्टं न कांचीपदं,

एषा खङ्गलतेव पुष्पधनुषो दृष्टा परं वेणिका,

तत्वंगांतरदर्शनाय विदधे साध्वं स दग्धो विधिः २०

**विदू०—** किं न दृष्टः सारणाय कटके प्रदाय प्रतिनिवृत्तोस्याः कर

पल्लवः ?

**दशा०—** दिष्ट्या खल्वयमत्रभवता प्रतिबोधितोस्मि.

शुकतुंडकुटिलपाटल

कररुहकनकांगुलीय कमनीयः,

स्फुटितकमलोदरश्रीः,

स्मरामि तस्याः करोदृष्टः २१

विश्वामित्रऋषि हे यज्ञ करणार, तो पाहण्याकरितां अनुसूयेसहवर्तमान भगवान् अत्रिऋषि आले आहेत, त्यांची जनकराजांनीं अर्घ्यादिक पूजा केली. आतां मुलींनीं त्यांच्या चरणाप्रत वंदन करायास यावें म्हणून ते त्यांस बोलावीत आहेत.

**शील०**— दैव थोर म्हणून प्रियसखीला उत्तरोत्तर इष्टप्राप्तीचाच योग येत आहे। भगवती अनुसूया ही महापतिव्रता व पुण्यदर्शना आहे खरीच!

**सीता**— (विस्मित होऊन) अहा! मला तर त्याविषयीं उत्कंठाच आहे! चला तर जाऊं आतां (असें बोलून सान्या निघून जातात).

**रावण.**— अरेरे! ती स्त्री माझ्या दृष्टीस पडली न पडली इतक्यांत दृष्टीच्या टप्प्यांतून पार जाऊन दिसेनाशी झाली! काय करावें?

## आर्या.

मुखचंद्रा पीनकुचा कांचिपदा ही न पाहिलें विधि रे;
कामखड्गसी वेणिच दाविलि, दुष्टा[1] न अंग कीं दुसरें. ४५

**विद्यु०**— सारणाला कांकणांचा जोड देऊन तिनें आपला करपल्लव मागें घेतला, तो महाराजांनीं नाहीं पाहिला काय?

**रावण.**— दैव थोर कीं त्वां मला आठवण दिली!

## अभंग.

शुक तुंडापरी वांकडी आसती, अतिरक्त कांती जयांची हीं; ४६
ऐसीं नखें ज्यांचीं विलसती देखा, तैशाचिमुद्रिका कांचनाच्या; ४७
पद्मगर्भावरी जो कां सुकुमार, स्मरे, ऐसा कर पाहिला म्यां! ४८

---

टीप.—१ अरे दुष्टा दैवा.

अपिच

आनीता नृपकन्यका ममवशे तिष्ठंतु मा वाधुना,
स्वर्वेद्योपि भवंतु मे परिसरे जंभद्विषो वा पुरे,
किं ताभिर्दशकंधरस्य ? कमलश्रीगर्वसर्वंकषो
यद्यस्याः कमनीयकंकणधरः सोयं गृहीतः करः

विद्यु०— किमिदं दुर्लभं गृहीतरामवेषस्य ?

दशा०—

मनुष्यवेषग्रहणं दुर्लभं यद्तो क्विा
तत्कर्त्ता रावणो लब्धुं जगन्मंगलदीपिकां. ३३

त्वरयस्व तावत्कौशिकवेषग्रहणाय. गृहीतएवहि मया तदीयो वेषः सारणोपि लक्ष्मणइव भविष्यति.

सार०— अचिंत्यमहिमानः खलु महर्षयः.

कांचने कटके तस्याः करेण प्रतिगृण्हतः
यन्मयैव ममांगानि न शक्यंते निरीक्षितुं ! ३४

( पार्श्वतोवलोक्य ) कथं वधूजनविलोकनकुतूहलिनीभिः कन्यकाभिर्विस्मृतश्चित्रपटः. तदेनं देवाय समर्पये. ( चित्रपटं गृहीत्वा ) इमे एतस्याः कटके, अयंच चित्रपटः ( इति दशाननस्य निवेदयति. )

विद्यु०— पश्य, महाराज, पश्य. राक्षसांधकरणमणिघटितकटकयुगलं, रघुशिशुसमधिष्ठितं चित्रपटंच.

अणखी **श्लोक.**

राजांच्या अणिल्या सुता ममवशीं राहोत जावोत वा,
तैशा मन्नगरींत वा सुरपुरीं बंदीहि नाकोद्भवा[1];
त्या ह्या पंक्तिमुखा[2] नकोत; जरि हा अंभोजजेता[3], मला
वैवाहोक्त विधी करूनी कर हा हीचा मला लाधला. ४९

**विद्यु॰**— **रामा**चा वेष घेतल्यावर **जानकी**चा कर मिळणें महाराजांस दुर्लभ आहे असें नाहीं.

रावण— **आर्या.**

असता याहुनि दुर्लभ नरवेष दशास्य तरि तया घेता,
यद्योगें सुलभ घडे **सीता** भुवनैकमंगलीभूता. ५०

**विद्युज्जिव्हा**, तर मग आतां त्वरा कर, लौकर, **विश्वामित्रा**चा वेष घे, मी तर **राम** झालों ह्मण. **सारण** हा लक्ष्मण होईल.

**सारण.**— जे महर्षी आहेत त्यांचा महिमा अचिंत्य होय, त्यांचा अंतच लागत नाहीं, हेंच पाहा,

**आर्या.**

हीं स्वर्णकंकणें जीं **सीते**पासोनि घेतलीं मीं रे,
यांच्या धारणयोगें माझें अंगचि मला दिसें न बरें. ५१

( बाजूस पाहून ) वधूजनांकडे जाण्याच्या गर्दीमुळें मुली हा चित्रपट येथेंच विसरून गेल्या ! तर हा महाराजांस नेऊन द्यावा. ( असें ह्मणून चित्रपट घेतो आणि "हा तिचा कांकणांचा जोड व हा चित्रपट महाराज" असें म्हणून **रावण**ाच्या स्वाधीन करितो).

**विद्यु॰**— पहावें महाराज, पहावें. हें राक्षसांधंकरणमणिघटितकटक युगुल आणि हा **रामा**चें चिन्ह काढलेला पट !

---

टीप.-१ स्वर्गीतील बंदीस टाकलेल्या स्त्रिया. २ रावण. पंक्तिनामक एक छंद आहे, त्याचीं दहा अक्षरें असतात. यावरून पंक्तिशब्द दशवाचक कल्पून त्यावरून "पंक्तिमुख" ह्मणजे दशमुख; "पंक्तिरथ" ह्मणजे दशरथ असे प्रयोग करण्याची कवींची चाल आहे. ३ कमळांस जिंकणारा.

**दशा०**— धिगेतत्कटकद्वंद्वं, यन्न तन्वीमदर्शयत्.

धिक् चित्रफलकं, यत्र तस्या भावहरोनरः. ३५

त्वमपि नदृश्यसे तस्य धारणेन ।

**विद्यु०**—ततश्च विमानएव निगूढं निक्षिप्यतामिदं. भविष्यति कदाचिदनेन किंचित्प्रयोजनं.

**सारणः**— तथा करोति.

**दशा०**— ( विमृश्य )

सुहृदपि वंचयितव्यो, गर्ह्यापि तनुर्गृहीतव्या,

सांप्रतमनुभवितव्यस्तस्याः पाणिग्रहो हि मया. ३६

( इति निष्क्रांताः सर्वे )

द्वितीयोंकः २

**रावण.—**

## अभंग.

धिक्कार असो त्या कटकद्रयाला, जेणें **सीता** मला न दावीली. ५२
तसाची धिक्कार त्या चित्रपटाला, जेथें तो लिहीला तीचा प्रिय. ५३

कायरे **सारणा**, तो कांकणांचा जोड धारण केल्यानें तूं देखील आह्मास दिसत नाहीस ! काय चमत्कार !

**विद्यु०—** तर तो विमानांतच नेऊन गुप्तपणें ठेवावा. पुढें कदाचित् त्याचें काम लागलें तर लागेल.

**सारण.—** ( तसें करितो ).

**रावण.—** ( विचार करून ).

## आर्या.

मित्रातें वंचीतों घेतों नरवेष तो जरी नीच;
**सीता**करग्रहोत्सव अनुभवितों रे जसातसा मींच. ५४

( असें बोलून सारे निघून जातात ).

( दुसरा अंक समाप्त ).

( ततः प्रविशति मारीचः )

मारीचः. ( सानुस्मरणं )

तत्क्षत्रियार्भक विमुक्त महास्त्रवात्या

चक्रभ्रमी कवलनश्लथसंधिबंधः,

यावद्भ्रमामि गगने, कथमंबुराशि

तावत्प्रविश्यशतयोजन मुत्थितोस्मि । १

# जानकीपरिणय नाटक.

## अंक २.

**पात्रें.**

मारीच राक्षस .. .. .. तार्टिकेचा पुत्र.
करा‍ळ राक्षस. .. .... मारीचाचा सोबती.
राम. .. .. .. .. .. दशरथराजाचा पुत्र.
सीता व तिच्या सख्या .. मारीचानें मायाप्रयोगेंकरून दाखविलेल्या.
काश्यप, पिंगल .. .. ब्राम्हणाचे मुलगे आणि रामाचे मित्र.
अहल्या .. .. .. .. गौतममुनीची पत्नी.

---

( तदनंतर मारीच पडद्याबाहेर येतो ).

मारीच.—( स्मरण झालेंसें करून ).

**आर्या.**

त्या क्षत्रियशिशुनें[1] जो केला अतितीव्र अस्त्रमडिमार,
त्यायोगें झंझानिलचक्रें[2] सुटलीं चहूंकडे फार. १
त्यांतचि मी सांपडलों, गेलों गगनीं उडोनि शीघ्रगती,
तें मच्छरीरसंधी शिथिलित होऊनियां तुटूं म्हणती. २
गगनीं भ्रमतों आहें, तंव कैसा पातलों समुद्रतला !
शतयोजनें प्रविशुनी आलों वर, तें न ठाउकें मजला. ३

---

टीप–१ रामानें. २ बाहादुली.

हंत, निरुपमपराक्रमः क्षत्रबटुः। यतः

अस्मिन्विकृष्य धनुरुज्झति बाणमुग्रं
पश्यन्बलानि पुरतो विनिपातितानि,
जीमूत पंक्तिषु निलीय निलीयभूयो
मायासुबाहुरपिहा मरणं प्रपन्नः । २

किंच.

यावद्वाणसमीरहारितमहामायारजोदुर्दिनां,
तेनक्षत्रियजाल्मकेनबलिना दृष्ट्वा पुरस्ताटकां,
हंतस्त्रीति जुगुप्सया शिथिलितो, मौर्वीविकर्षीकरो,
वेगादुत्पतितेनतावदिषुणा सा च स्वयं चिच्छिदे ।३

( सशोकावेगं ) हा जननि ताटके, हा सुतवत्सले, हा नागसहस्र-बलशालिनि, तवापि क्षत्रियबटुना तादृशो विपाक, इति दुर-तिक्रमो दैवनियोगः।

अयेमातः कासि, प्रदिशरुदती मेप्रतिवचः,

( सामर्षं )

विमोक्ष्ये नाहंत्वां प्रथमकृतवैरं नृपबटो.

( सकरुणं )

सुबाहो, धिग्धिङ्मां, यदभिमुखमेवेवमभवः,

( सचिंता निःश्वासं )

कराल, त्वं वत्स क्वगतइति नाद्यापिविदितः. ४

अरे ! केवढा त्या क्षत्रियबटूचा पराक्रम ! असा पराक्रमी आपण दुसरा पाहिला नाहीं ! कारण,

### आर्या.

आकर्षूनि चापातें, सोडी हा उग्र बाण जव बाळ,
इतुक्यांत मरति सैन्यें, ऐसा न समर्थ मारण्या काळ[१] ! ४
मेघा आड दडोनी पाहे जंव हें सुबाहु मायावी,
तंव तो[२] मर्येचि मेला, उपमा शौर्यास काय या द्यावी ? ५

अणखी

### आर्या.

बाणसमीरणयोगें[३] मायारचितां[४] रजोभ्रपटलांतें[५],
सारुनि एकिकडे जंव पाहे, तंव ताटिका दिसे त्यातें. ६
ही तों स्त्री ! छित् ! हिजला मी नचि मारीं म्हणोनि दोरीला
सोडी ढील; परी त्या शिथिलितबाणेंचि तोडिलें तिजला. ७

(शोकाच्या आवेशानें) हे जननी ताटिके, हे पुत्रवत्सले, तूं केवढी पराक्रमी ! हजार हत्तींचें बळ तुला ! असें असून तुझा आणि त्या दुष्ट क्षत्रियबटूच्या हातून असा विपरीत परिणाम व्हावा काय ? तस्मात् दैवयोगच बलवत्तर. त्याच्यापुढें कोणाचाही उपाय चालत नाहीं ! हरहर ! कसें करावें ?

### श्लोक.

अगे माते[६], मातें प्रतिवचन दे, मी रडतसें,
(क्रोधानें दुसरा चरण म्हणतो.)
न सोडीं, रे वीरा, प्रथमकृतवैरा तुज तसें.
(करुणेनें तिसरा चरण म्हणतो.)
सुबाहो, धिङ्मातें, जवळि असतां मींहि मरसी.
(चिंतेनें उसासा टाकून चतुर्थ चरण म्ह०)
कराला, कोंठ तूं अजि अजुनि, नेणेंचि, फिरसी. ८

---

टीप—१ यम. २ सुबाहु. ३ बाणाच्या वाऱ्यानें. ४ माया योगानें केलेलीं ५ धुळीचे मेघांना. ६ आई.

( ततः प्रविशति करालः )

**करालः—**

दिष्ट्याभीतोरणमुखा, द्दिष्ट्यादूरेपलायितः,
दिष्ट्यारामास्त्रपदवीमतीतो जीवितोस्म्यहं. ५

किंतु नजानामि रामास्त्रगृहीतो मारीचो जीवति वानवेति. यतः

प्रभ्रष्टरत्नमुकुटं, पतितासिखेटं,
विस्रस्तकेश, मभितस्तनपाणिपादं,
मारीचमभ्रमिव चंडमरुद्विधुन्वन्
निन्ये क्वचिद्रघुकिशोरशरः क्षणेन । ६

प्रायेण महेंद्रशैलस्य कटके महोदधेर्वीचिषु वापतितः स्यात्. तदेन मन्वेष्टुमुपसर्पतापि मया महेंद्रशैल आसादितएव. तथाहि.

एतेते गिरिकूटसंघटशिलासंघट्टशीर्णांभसः,
प्रेंखच्चामरचारुसीकरकणस्मेरादरी निर्झराः;
यत्प्रान्तेषु निकुंजकुंजरमुखभ्रश्यन्मृणालांकुर
त्रासोद्ग्रंथितदंतदंति परितः कंठीरवा भैरवं. ७

अपिच.

मृगपतिकराघातत्रुट्यत्कठोरशिरस्तटी
परिगलदसृग्धारासंसक्तमौक्तिकपंक्तिभिः
वनभुवमिभश्रेणी शोणीकृतांनिजभीत्कृतैः
कलयति समुत्सर्पद्भल्लूकभल्लविराविणीं. ८

( त्यानंतर **कराल** पडद्याबाहेर येतो. )

**कराल—**

**श्लोक.**

देवें भ्यालों, रणांतुनी गेलों देवें पळोनियां,
देवेंचि नाहिं मी मेलों रामास्त्रीं सांपडोनियां. ९

परंतु **मारीच** हा रामाच्या अस्त्राचे झपाट्यांत सांपडला होता, तो जीवंत आहे किंवा मरण पावला हें कांहींच कळत नाहीं. कारण,

**आर्या.**

पडला मुकुट शिरींहुनि, तैसेंची खेटखड्ग[1] हातूनी,
केश शिरींचे सुटले, धडफड करि हातपाय ताणूनी. १०
चंडानिलें[2] मेघातें नेतो, लोटोनि फार वेगानें.
तैसा त्या **रघुशिशु**चा बाण तया शीघ्र गगनपंथा[3] ने[4] ११

बहुतकरून तो **महेंद्र** पर्वताच्या कड्यावर किंवा समुद्राचे लाटांमध्यें पडला असेल. अरे, त्याचा शोध करीत करीत मी ह्या **महेंद्र** पर्वताच्या समीप येऊन पोंचलों देखील ! येथें पहा,

**आर्या.**

पर्वतदरींतुनी हे निर्झर मोठ्या शिळांवरी पडती
तें शुभ्र चामरांचे परी फंवारे तयांतुनी उडती. १२
हे तों मृणालतंतू चघळुनि करिनींच टाकिले तेथें,
ऐसें मानुनि सिंहां, शब्द करित हिंडताति ते येथें. १३

अणखी पहा !

**आर्या.**

सिंहानीं फोडियले गजमस्तक, मौक्तिकासवें रक्त
वाहे त्यांतुनि, तेणें झाली येथील भूमि आरक्त. १४
गजशब्दा ऐकुनियां, मालूहि मयद शब्द करिति महा;
ऐसा हा पर्वत हो **महेंद्र**नामाचि फार उग्र पहा. १५

टीप—१ ढालतरवार. २ प्रचंडवायु. ३ गगनमार्गाप्रत. ४ नेतझाला.

( अग्रतोवलोक्य ) कथमार्यो मारीचः समुद्रमध्यपतितोत्थितइ-वदृश्यते ! यतः

छिन्नांशुकग्रथितशैवलखंडजालं,
फेनानुविद्धघनमेदुरकेशपाशं,
नीरक्तधौतकरपादतलं, पुरस्ता
दास्ते महेंद्रकदके ननुताडकेयः !९

**मारीचः** ( करालं विलोक्य, सविस्मयं ) अयिकराल, जीवसि ? तदे-हि परिष्वजस्व मां.

**करालः**— आर्य मारीच, दिष्ट्या रामबाणान्मुक्तोसि. ( इतिसबाष्प-मालिंगति. )

**मारी०**— हावत्स, किमन्यद्ब्रवीमि. ?

स तस्य ज्याघोषः, शरपतनझंकारनिनदः
शरेणाकृष्टोसावितिमुदितविद्याधरगिरः,
ध्वनिः सिंधो, रौर्वानलपतितयादः कलकलो,
मयैकस्मिन्काले सकलमिदमाकर्णितमभूत्. १०

अनंतरंच

मत्यानत्स्खलितविशीर्णवीचिमुक्त
व्यक्ताधो भुवनपयोदरावगाढं
तन्मार्गं प्रसृतनिजांतरांबुवेगा
न्मामुच्चैरुदधिरुदक्षिपत्क्षणेन. ११

**करा०**— साधु, महार्णव, साधु ! सत्यं महाराजदशग्रीवप्रतापभीते-न तदनुचरोमारीचः परित्रातः !

( पुढें पाहून म्हणतो ) काय ! हा आपला **मारीचदादा** समुद्रांत पडून वर निघाल्याप्रमाणें दिसतो कीं !

## अभंग.

मुळीं वस्त्र हें भीजलें, त्यांत शेवाळें गुंतलें; १६
मस्तकींचे केश जाड, कैसें झाले ते निबीड[1]; १७
हातपाय शुभ्रवर्ण, त्यांत रक्त नसे पूर्ण; १८
ऐसा कढ्या वरी बरा, **मारीच**ची आहे खरा. १९

**मारीच**— ( **करालास** पाहून विस्मयानें म्हणतो ) **कराला** बाबा, जिवंत आहेसना ? तर ये, मला आलिंगन दे !

**कराल— मारीचदादा**, दैव थोर म्हणून रे तूं त्या **राम**बाणापासून सुटलास बरें । ( डोळ्यांस पाणी आणून आलिंगन देतो ).

**मारीच**— वत्सा **कराला**, फार तर काय सांगूं ? पण,

## श्लोक.

मौर्वीची[2] ध्वनि बाणपातज जसा झंकारही, तो महा,
" बाणीं सांपडला खरेंचि, गडिहो " गंधर्व वागूही पहा,
सिंधूद्भूत निनाद, यादहि[3] तसे पीडूनि और्वानलें
कोल्हाळा करिती, ध्वनींस इतुक्यां म्यां एकदां[4] ऐकिलें. २०

तदनंतर,

## आर्या.

मी जंव खालीं पडलों जोरानें खोल त्या समुद्रांत,
पाणी दुभागुनी पथ पाताळाचाहि पाहिला अंत. २१
मीं बुडतों हें पाहुनि जलधीनें लोटिलें प्रवाहाला,
त्या योगें उसळुनियां सुरक्षितचि देह हा वरी आला. २२

**कराल**.— शाबास, महार्णवा, शाबास ! खरेंच महाराज **दशग्रीव** हे मोठे पराक्रमी आहेत, म्हणून त्यांनां भिऊन त्वां त्यांच्या सेवकाचें संरक्षण केलें ! शाबास शाबास !

---

टीप.—१ दाट. २ धनुष्याची दोरी. ३ जलजंतु. ४ एकदम.

**मारीचः** ( सानुशयं ). कराल, किमुच्यते !

दशग्रीवः श्रीमान्मयिकरुणया तिष्ठति तथा

यथैतेपि त्रस्यंत्युदधिवसुधारण्यगिरयः

अहंतूदासीनः स्वजनविनिपातेप्यनुचरः

कलंकं देवस्यस्त्वय मुपहरामि प्रतिपदं. १२

**करा०—** आर्य, मामैवं. मायाबलमवलंब्य बलवानपि क्षत्रियबटुर्घातयितव्यः. तदेनमहत्वाप्रतिनिवृत्तानस्मान्नबहुमन्यते महाराजः किल. कौशिकः समुनिपाशोपि. अपरिक्षतेनतेनक्षत्रियबटुनागृहीतत्रद्रूपस्यापि देवस्य सीता पाणिग्रहणाय प्रत्यूहमाचरिष्यति उक्तं खलु ताटकया तद्वेषो गृहीष्यते महाराजेनेति.

**मारीचः**. अतः खलु सानुगस्य, तस्य, मुनेः स्वकुलप्रस्थानंविघटनीयं.

**करा०—** अत्रकिमार्यस्य व्यापृतमुपायदर्शने प्रज्ञाचक्षुः ?

**मारी०—** ( क्षणंविचिंत्य ) अयकिं.

**करालः—** कथमिव !

**मारी०—** ( कर्णे एवमेवमिति कथयति )

**करा०—** ईषत्करमेवैतदिदानीमार्यस्य.

विप्रियश्रवणात्सद्यः पतंतीं हव्यवाहने

माया सीता मनुपते द्रामस्तत्प्रेमगौरवात्. १३

**मारीच.**— (पश्चात्ताप करून) **कराला,** काय सांगावें !

**श्लोक.**

दया माझे ठायीं करिति दशकंठ प्रभु, तसें
समुद्रा पृथ्वीला वनगिरिनदीनां भय असे.
प्रतीकाराला तों स्वजनविनिपातींही न करीं,
कलंका देतों मीं अनुचर धन्यीं; गोष्ट ही खरी. २३

**कराल.**— **मारीचदादा,** असें ह्मणूं नको. अजून काय झालें आहे ? तो क्षत्रियाचा पोरगा बलवान् आहे तरी राक्षसी माया करून, तिचे बलानें त्याला मारून टाकूं. त्याला न मारितां परत गेलों, तर मात्र महाराजांस ठीक वाटणार नाहीं. दुसरें, **रावण** महाराज **रामचंद्रा**चें रूप घेणार असें **ताटका** बाईनीं सांगितलें; त्याप्रमाणें ते रामरूपानें सीतापाणिग्रहणार्थ गेले आणि **राम** जर जिवंत आहे, तर त्याचे हातानें तो दुष्ट मुनि **कौशिक** महाराजांचे कार्यांत खचित विघ्न करील यांत संशय नाहीं.

**मारीच.**— यासाठीं **कौशिक** हा परिवारासुद्धां आपल्या आश्रमाप्रत परत येत आहे, तर त्याचें येणें न होई असें केलें पाहिजे.

**कराल.**— यास उपाय कोणता करावा, तो तूं आपले बुद्धिरूप नेत्रानें पाहून काढ कीं !

**मारीच.**— (क्षणमात्र चिंतन करून) होय, पाहून काढिला देखील.

**कराल.**— तो कोणता बरें ? सांग पाहूं.

**मारीच.**— (कानांत असें असें करायाचें म्हणून सांगतो).

**कराल.**— (हांसून) हें काम तर, दादा, तुला अगदीं सोपें आहे. कारण,

**आर्या.**

अग्निप्रवेश करितें ऐकुनियां हा अनिष्ट वृत्तांत
मायासीता, तीच्या प्रेमें **राम**हि करील देहांत. २४

---

टीप.—१ स्वामीला.

अनंतरं पुत्रशोकमोहितं दशरथं आश्वासयन्विश्वामित्रोऽप्य योध्यां सहैव तेन राज्ञा प्रतिनिवर्तयिष्यते. परंतु तस्य महर्षेः स- न्निधानमंतरेण माया प्रयोक्तव्या.

**मारी०—** युक्तं भवानाह. तदुपसर्पावो, यत्र ते रामादयः ( इति परिक्रामतः पुरतोवलोक्य ) कथमध्यर्धयोजनएव कौशिका श्रमस्य कौशिकीतीरे निवेशितस्कंधावारो दशरथः तथाहि

शश्वद्रथ्याश्वघोषासहवनमहिषोद्भूतशृंगावशीर्य
वल्मीकोन्मीलदाशीविषपरुषरुषोद्गारफूत्कारभीमाः,
दृश्यंतेधीरभेरीनिनदकृतमदोद्दाम नृत्यत्प्लवंगाः,
सेनामातंगभुक्तोज्झितकुशकमलाः कौशिकीतीरदेशाः १४

तदिदानीमस्मादुद्देशान्नेतव्यो दूरतएव राघवशिशुः ( नेपथ्ये )

अध्वश्रांत्या शयितमननुज्ञाप्य तातं नरेंद्रं,
विश्रांत्यर्थं क्वचिदवरजानप्य नामंत्र्ययातान्,
चर्मोपानन्निहितचरणः शस्त्रवानेषवेगा
देकोरण्यं विशति मृगया कौतुकी रामभद्रः १५

असे प्रकारें राम मरण पावल्यावर, दशरथराजाला मोठा पुत्र-शोक होईल. मग त्याचें समाधान करीत करीत कौशिकही त्याचे बरोबर अयोध्यापुरीप्रत परत जाईल. पण माया जी करायाची, ती कौशिक जवळ नाहीं तोंच केली पाहिजे.

**मारीच.**— ठीक बोललास. तर चला आतां, जेथें ते रामादिक असतील तेथें आपण जाऊं. ( असें म्हणून दोघे इकडे तिकडे फिरतात व पुढें पाहून म्हणतात ) काय हो ! कौशिकाच्या आश्रमापासून दोन कोसांवर कौशिकी नदीचे तीरीं दशरथ राजाचे सेनेचा तळ पडला आहे. पहा कसा तो !

### अभंग.

रथांच्या चाकूंचे ऐकोनियां घोष, आरण्यमहीष चेताळती. २५
शिंगांनीं वारुळें जेव्हां ते फोडिती, सर्प खवळती वेर्थीचे जे.२६
करीती ते क्रोधें विषारी फूत्कारे, तेणें भयंकर झालें रान. २७
दुंदुभीचा धीर ऐकुनियां नाद, वानरांस मद चढे मोठा. २८
मदाचे धुंदींत नाचती ते फार, त्यांचा चमत्कार, पाहा कैसा. २९
सेनेचे गजांनीं टाकिलीं चाऊनी, तामरसें[1] आणि दर्भ तैसे.३०
कौशीकीचे तीरीं उतरला राजा, तेणें ऐसी मजा दिसे येथें.३१

तर आतां रघुकुमारकाला ह्या प्रदेशापासून दूर काढून नेलें पाहिजे. ( इतक्यांत पडद्यापलीकडे शब्द होतो ).

### श्लोक.

राजा हा निजला थकोनि गमनें त्याला न सांगोनियां,
तैसें बंधुजन श्रमार्त म्हणुनी त्यांनाहि टाकूनियां,
जोडा पायि, हतांत शस्त्र, मृगयाक्रीडार्थ ऐसा, पहा,
एकाकीच वनांत शीघ्रगतिनें जातो स्वयें राम हा. ३२

---

टीप.—१ कमळें.

तदनीकिनीनिवेशं गते रामभद्रस्य परिजनैरप्यनुप्रवेष्टव्योऽय-मरण्यभागः यावदहमप्येनमनुप्रविशामि.

**करालः—** कथमेष रामभद्रस्य प्रियसखः पिंगलोनाम विप्रबटु, रेवमाघोषयति.

**मारीचः** ( सहर्षं ) दिष्ट्यावयोरंतरलाभः वत्स कराल यावदयं न प्रविशति, तावदस्यरूप मवलंब्य मायया वनगज गृहीतोहमि-ति विलपन्सखिस्नेहादनुद्रवंतं रामभद्रमुपसंक्रमय सुदूरमर-ण्यांतरं. अहमपि कौशिकमहर्षिशिष्यस्य काश्यपस्य रूपमा-त्मना दर्शयन् राघवपोतस्य हेतोरनभूयमान विरहव्यथां मै-थिलीमस्मै मायाबलेन समभिव्यंजयन्यया मनोरथं निर्वर्त-यिष्ये. ( इति निष्क्रांतौ )

( शुद्ध विष्कंभकः )

( ततः प्रविशति शरचापहस्तोरामः )

**रामः—** दृष्टःकोपवतामरण्यकरिणां धीरोद्धतश्चंक्रमो,
दृष्टं केसरिणांच वक्रितगुरुग्रीवं रुषालोकनं,
दृष्टं तांडवमुद्धतंच शिखिनां ज्या घोषरुद्धे वने,
दृष्टश्चैवमया चिराय मृगया लीलाविनोदक्रमः १६

अपिच तत्रैव

कुवलयितवनांतादंतिकस्थैः किरातै
रनवगतरसत्वान्यक्तसंभावनानि,
अभिलषितगुणानि प्रौढनारीकटाक्षै
श्चकितहरिणशावप्रेक्षितानि प्रतीमः १७

तर आतां जे कोणी त्याचे सेवकजन सैन्याचे तळावर असतील त्यांनीं ह्या वनांत जावें। मी तर ह्या त्याचे मागोमाग चालता होतों.

**कराल.**— काय हो। हा तर **रामभद्राचा** प्रियसखा **पिंगल** नामक जो विप्रबटू, तोच ही अशी आरोळी देत आहे.

**मारीच**— ( हर्षानें ) बरें झालें। दैवानें हे दोघे वेगळे वेगळे सांपडले। तर वत्सा **काराला**. जंव हा वनांत शिरला नाहीं तंव याचें रूप घे आणि "वनगजानें मला धरिलें रे धरिलें। धांवा कोणी।" असा मायेचे योगानें आक्रोश कर; म्हणजे मित्राचे प्रीतिस्तव **रामभद्र** धांवत येईल; तसा तूं त्याला चाळवीत चाळवीत दूर दुसऱ्या वनांत ने. इकडे मीही **कौशिका**चा शिष्य जो **काश्यप** त्याचें रूप घेतों, आणि **रामा**च्या विरहामुळें **जानकी**स फार दुःख होऊन ती व्याकुळ होत आहे असें मायाबळें करून त्याचे दृष्टीस पाडून धरल्या बेतानें कार्य करितों. ( असें बोलून दोघे निघून जातात.)

( ही पुढील कथेची संगती. )

( नंतर हातांत धनुष्यबाण घेऊन **राम** येतो. )

**राम**—

### श्लोक.

ज्याघोषें[1] वन कोंदलें तंव कसे रोषें करी धांवती,
मानां सिंहहि वांकड्या करुनियां क्रोधें कसे पाहती,
मोरें उद्धत नाचती मदभरें, ही सर्वलीला बरी,
ऱ्या फारादिवशीं करूनि मृगया कीं देखियेली खरी. ३३

आणखी,

### श्लोक.

कुवलययुत[2] रानीं राहती जे किरात,
अरसिक म्हणूनी ते[3] ज्यांस नाहीं गणित.
सुतनु नयन ज्यांचे इच्छिती, हो, गुणातें,
हरिण शिशुकनेत्रें दीसतीं तींच मातें. ३५

टीप.-१ धनुष्याच्या दोरीच्या नादानें. २ नीलोत्पलयुक्त. ३ किरात.

( सोत्कंठं )

यान्येवमाकुलतया हरिणार्भकाना
माविर्भवंति रुचिराणि विलोकनानि,
मन्ये ततोपि मधुराणि महीकुमार्या
स्तस्यास्तु विभ्रमकटाक्षविजृंभितानि १८

( नेपथ्ये ) हा सखे, रामभद्र, हा हतोस्मि !

**रामः**. ( आकर्ण्य ससंभ्रमं ) कथमत्र विजने वने पुरुषस्य मामति हीनस्वरः ( सशरचापहस्तः उद्धतं परिक्रामति. ) ( पुनर्नेपथ्ये ) अयं खलु दुष्टमतंगजः करेण मां व्यापादयति.

**रामः**— कथं पिंगलस्येव परिदेवनं ! ( इति त्वरितं परिक्रामति ). कष्टंभोः कष्टं !

अभिनवमृगलोभान्मय्यरण्यांतरस्थे
प्रियजनपरिमुक्ते पिंगलं मामेकं
वलयितपृथुशुंडादंडसंवेष्टितांगं
नयति नवनिकुंजं कुंजरः संभ्रमेण. १९

( पुनर्नेपथ्ये ) हातात, सुतवत्सल, हा हतोस्मि ! हा अंब, मंदभागिनि, मृत्युमुखे मां पातयितुं प्रसूतासि ! हा सखे, रामभद्र, विपाकदारुणस्ते मयि स्नेहानुबंधः !

**रामः**— ( सकरुणावष्टंभं ) नभेतव्यं, नभेतव्यं. अयमहमागतएव ( विकटं परिक्रम्य ) अहो धिक् प्रमादः ! कथमतिक्रांत एव बाणगोचरादिभराजः ( धनुरुपसंहरन् पुरतोऽवलोक्य ) कथंनदृश्यते गजराजः !

( उत्कंठेनें ) हरिणशावकनेत्र असेजरी दिसति सुंदर भीति वरी तरी,
ललित सुंदर यांहुनि, वाटतें, असतिल क्षितिजानयनांत[1] ते, ३५
( पडद्यापलीकडे शब्द होतो ) हे सख्या **रामभद्रा**, अरे मी मेलों रे मेलों !

**राम.**— ( ऐकून घाबऱ्यां घाबऱ्यां ) ह्या निर्जन अरण्यामध्यें कोणी पुरुष दीनस्वरेंकरून मला हाक मारितो हें काय! ( असें म्हणून हातांत धनुष्यबाण आहे तसाच मोठ्यानें इकडे तिकडे फिरतो. ) ( पुनः पडद्यापलीकडे शब्द होतो ) हे सख्या **रामभद्रा**, हा दुष्ट माजलेला हत्ती मला सोंडेंत धरून मारीत आहे रे !

**राम,**—काय ! **पिंगला**सारिखा विलाप ऐकूं येतो हा ? ( असें ह्मणून आणखी मोठ्या त्वरेनें इकडे तिकडे फिरतो आणि ह्मणतो ) अरेरे ! काय दुःखाची गोष्ट ही.

### श्लोक.

अभिनवमृगलोभें एकला मी वनांत, सहज फिरत आला मित्र मागून येत,
करिवर धरुनीयां त्यास सोंडेकरोनी, त्वरितगति असा तो नेतसे दूर रानीं. ३६

( पुनः पडद्याच्या पलीकडे शब्द होतो ) अरे माझ्या बाबा, तूं मोठा पुत्रवत्सल आहेस रे ! पण हा तुझा पुत्र आतां मरतोरे ! अगे मंदभाग्ये आई ! असें मृत्युमुखांत पाडण्याकरितांच तूं मला प्रसवलीस काय ! हे मित्रा **रामभद्रा**, तुझ्या स्नेहाचाही शेवट असा दारुण झाला कीं !

**राम**—( दयायुक्त होऊन गर्वानें म्हणतो ) भिऊं नको रे भिऊंनको ! हा मी आलोंच ! ( मोठ्यानें इकडे तिकडे फिरून म्हणतो ) अरेरे ! छित् काय करावें ? संधान चुकलें ! हत्ती बाणाच्या टप्यांतून पार निघून गेला ! ( धनुष्य आटपून पुढें पाहतो व म्हणतो ) काय ! तो हत्ती दिसेनासाही झाला ! बरें काय चिंता आहे ?

---

टीप—१ सीता कटाक्ष.

भवतु पदवीमेतस्याहं गजस्य विलोकये,

झटिदमनयागत्वादूरं विमोचयितास्मिच.

सुलभमपथे यद्यप्यस्मिन्पदं न शिलातले,

तदपिविदितं भृंगश्रेणीकषामदधारया. २०

( इतिपरिक्रामितकेनावलोक्य )

मरुत्तरलकोरकाकुलकरंजकुंजोदर

स्खलन्मुखरनिर्झरक्कणदुदारकारंडवं,

इदं, खलु विशृंखलावठ कुटीरकुंभीनस

स्फुरन्मृगदृगुत्पलप्रकरनीलमद्रेस्तटं २१

तदत्रैव भवितव्यमिभराजेन, इतस्ततो मृगयिष्ये. ( इति विलोक्य, सहर्ष ) दिष्ट्याकथमत्रैव गजगृहीतमुक्तः मुग्धइव लक्ष्यते पिंगलः.

( ततः प्रविशति पिंगलवेषेण शिलातलोपविष्टः करालः )

**रामः—** (उपसृत्य) समाश्वसिहि, समाश्वसिहि. (इतिपटांतेन वीजयन्)

अंतर्दहति शोको मे, मोहोमामावृणोतिच,

एवं निपतितो भूमौ, किंकर्तुं चेष्टसे मयि ? २२

### श्लोक.

अतां सरणि[१] शोधितों जिकुनि हत्ति गेला अहा !
स्वमित्र दुरि जाउनी त्वरित सोडवीतों पहा.
जरीं न उमटे पद प्रकट या शिळांचे वरी,
मदाप्लुत[२] अलीच[३] हे सुचविती गजाध्वा[४] तरी. ३७

( असें म्हणून इकडे तिकडे फिरतो व पाहून म्हणतो ).

### साक्या.

करंजतरुचे कुंज[५] बहुत त्यांवरी फुलांचे घोंस;
ते वायू लागोनि डोलती शोभा देत वनास; ३८
दरींतूनियां झरे वहाती झुळझुळ जे बहुगार;
तेथें कारंडवें[६] खेळती, कूजती मंजुळ फार ३९
बिळांतुनी बाहेर विशृंखळ हिंडति काळे व्याल;
त्यावरि पडली मृगनेत्रांची नील कांति बहुसाल. ४०
कुवलयवन[७] हें बहु सुंदर जें त्याचा येथें थाट,
नीलवर्ण या योगें ऐसें हं गिरितट वनदाट. ४१

या वनांतच तो गजराज असेल, त्याला इकडेतिकडे आसमंतात् शोधावें. ( असें म्हणून पाहतो व हर्ष पावून म्हणतो ) अरेरे ! दैव थोर म्हणून **पिंगलाला** येथें हत्तीनें सोडून दिलें आहे बरें । तो पहा कसा मूर्छा येऊन पडलासा दिसतो ! नंतर **पिंगलाचें** रूप घेऊन शिलातलावर मूर्छित पडलेला असा **कराल** येतो ).

**राम**— ( त्याच्या जवळ जाऊन म्हणतो ) **पिंगला** सावध हो ! ( असें बोलून दुपेट्याच्या पदरानें वारा घालितो ) बाबा !

### श्लोक.

जाळितो अंतरीं शोक, मोहही होतसे मला;
पडोनि भूतळीं कांय करूं इच्छिसि तूं असा ? ४२

---

टीप.—१ मार्ग. २ मदानें ओढलेले. ३ भ्रमर. ४ हत्ती गेला तो मार्ग. ५ जाळ्या ६ पक्षिविशेष. ७ नीलोत्पलवन.

**करा॰**— ( स्वगतं ) यद्दशाननस्य पथ्यं भवति. ( प्रकाशं ) कथंचि देव चक्षुषी उन्मील्य ) कथं प्रियसखो रामभद्रः !

**रामः**. अयंकि.

**करालः**— ( आश्वस्य ) सखे, भवदीयमृगया दर्शनकुतूहलादुपसर्पन्नर्द्धपथे मदगजेन गृहीतोस्मि. अनंतरंच.

तव ज्याघोषपरुषे श्रुते सिंहस्य गर्जिते
गजमात्मानमन्यान्वा न जाने मूर्छितोस्म्यहं. २३

**रामः**. अतो मन्ये सिंहगर्जितत्रस्तकरिणो हस्ताद्दिष्ट्या परिभ्रष्टोसि. तदिह प्रच्छायशीतले वकुलतरुमूले विश्राम्यतु भवान्

**करा॰**— भवतापि मृगयापरिश्रांतेन क्षणमत्र विश्रम्यतां. यतः

अविरलतरुखंडश्यामलोयं वनांतः,
प्रसरति सरिदग्रे चारुपद्मावतंसा,
अयमपि वनवातः पाटलामोदमुग्धो
मदकलपिकयूनां कूजितान्यातनोति २४

**रामः** — प्रकामरम्योयमुद्देशः तदत्रैव यावत्परिजनागमनमवस्थातव्यमावाभ्यां.

**करा॰**— ( स्वगतं ) यावन्मारीचागमनमितितुवक्तव्यं ( प्रकाशं ) एवंभवतु.

**रामः**—दिष्ट्या कुशलिनं त्वां पश्यामि.

**कराल**— ( मनांत म्हणतो ) जें **रावणास** हितकर असेल तें. ( किंचित् डोळे उघडून मोठ्यानें म्हणतो ) कोण ! माझा प्रियसखा **रामभद्र** ?

**राम**— होय, तोच आहे.

**कराल**— ( सावध होऊन ) सख्या **रामभद्रा**, तूं मृगया कशी काय करितोस ती पाहण्याचे उत्कंठेनें येत असतां, अर्ध्या वाटेंतच मत्तगजानें मला धरिलें. नंतर,

## आर्या.

त्वज्ज्याध्वनिपरिपरुषा[१] सिंहारावास[२] ऐकुनी भितरा
मी झालों मूर्छित, मग नेणें अपणा, गजास वा इतरा. ४३

**राम**— सिंहाचा शब्द ऐकून तो हत्ती भ्याला. तेव्हां दैवानें तूं त्याच्या सोंडेतून पडलास ! बरें तर आतां ह्या बकुळवृक्षाची छाया थंड आहे, म्हणून त्या छायेखालीं बसून विश्रांती घे.

**कराल**— सख्या, तुलाही मृगया करितां करितां श्रम झाले आहेत. तूं देखील क्षणभर बसून विराम करावा. कांकीं,

## श्लोक.

छाया विशालतरुची घन या वनांत, अंभोजखंडयुत[३] ही सरिता वहात,
वायू सुगंध, बहुशीतल, मंद येतो, अव्यक्तमंजुलहि कोकिलशब्द होतो. ४४

**राम**— खरेंच गड्या, हा प्रदेश फारच रमणीय आहे ! तर आपली सेवकमंडळी येई तोंपर्यंत आपण येथेंच बसूं.

**कराल**— ( मनांत म्हणतो ) सेवक मंडळी येईपर्यंत असें काय म्हणतोस ? **मारीच** येई तोंपर्यंत असें म्हण ! ( मोठ्यानें म्ह० ) बरें तर बसूं या.

**राम**— गड्या, दैव थोर म्हणून तुला मी कुशल पाहिलें !

---

टीप.—१ तुझ्या ज्याचे शब्दापरि कठोर. २ सिंहनादास. ३ कमल समुदाययुक्त.

त्वया ममविना, सखे, जनककन्यकायाः प्रियं,
करग्रहणमंगलं गलितमेव तत्तिष्ठतु,
कथं कथय तावकप्रविलयाद्विषादो महा
नसावविदलय्यमे त्हृदयमर्मनिर्मोक्ष्यते ? २५

**करा०—** ( स्वगतं ) कथमनेन राघवबटुना जानकीकरग्रहण मंगलमपि आत्मना विदितमासीत् ! ( प्रकाशं ) सखे, मामेवं त्वयि मद्विषादात्परिणयपराङ्मुखेसति न जीविष्यति साजानकी.

**रामः—** ( सोत्कंठं ) अपि सखे, सत्यं तत्काश्यपवचनं, यदुक्तं मां-प्रति भवता ?

" मनोभुवा स्वममिषेण दर्शिते दृढं त्वयि प्रेम निबध्य जानकी
कथंचिदध्यासितपल्लवास्तरा सखीजनाश्वासगिरैवजीवति २६
इति

**करा०—** ( अश्रुतिमभिनीय स्वगतं ) कथमेतावतापि मारीचो नागतः !

( इति चिंतयति )

**रामः—** अपि सखे, ( सत्यमित्यादि पुनः पठति )

**करालः.** कः काश्यपो नाम. ?

**रामः.** किंविस्मृतवानसि ? यं कौशिकशिष्यइति भवानेव मां प्रत्याह.

**करा०—** ( सभयकंपं, आत्मगतं. ) अहो प्रमादः ! यन्मारीचगतेन चेतसा प्रस्तुतप्रतीपमेव दृष्टवानस्मि ! ( प्रकाशं ) कथं मिथ्या भवति काश्यपस्यापि वचनं ? शृणु तावत्.

### श्लोक.

जरी प्रिय मला तरी **जनककन्यके**चा वरा
विवाह न रुचे मनीं तुजविणें कराया खरा;
विनाश तव पाहुनी बहु विषाद जो कां अतां
कसा, वद, उरास तो नचि चिरोनि, रे, सोडिता ? ४५

**कराल**—( मनांत म्ह० ) काय ! ह्या **राघव** बटूला **जानकी** बरोबर आपलें लग्न होणार ही गोष्ट समजली आहे तर ! ( मोठ्यानें ) सख्या, असें काय मनांत आणितोस ? हें उपयोगी नाहीं. माझ्या दुःखामुळें तूं लग्न करणें नकरतास तर **जानकी** आपला प्राण न ठेवती.

**राम**—( उत्कंठित होऊन )'गड्या, तूं जें मला सांगितलें तें **काश्यपा**चें वचन खरें असेल काय ? तें हेंः—

### आर्या.

"मदनें त्वन्मूर्ति तिला स्वप्नीं जी काय दाविली सुभगा
तीतेंचि चिंतिते ती, न रुचे तिस कांहीं विषय अन्य, अगा.४६
निजलो पल्लवशयनीं, विरहानल ताप देतसे फार,
आश्वासिती सख्या बहु, हाच तिचे जीवनास आधार. ४७

**कराल.**—( न ऐकिलेंसें दाखवून मनांत म्ह० ) काय ! अजूनहीं **मारीच** आला नाहीं ? कसें करावें आतां ! ( असी चिंता करितो ).

**राम.**—( " गड्या, जें तूं मला **काश्यपा**चें वचन सांगितलें, तें" इत्यादि वाक्य आर्यांसुद्धां पुनः म्हणतो ).

**कराल.**— **काश्यप** म्हणून कोण आहेरे ?

**राम.**— विसरलास, कीं काय ? तो **कौशिका**चा शिष्य असें तूंच तर मला सांगितलें.

**कराल.**—( भयानें कांपून मनांत म्हणतो ) अरे फसलों रे फसलों ! **मारीचा**कडे लक्ष्य गेल्यानें विरुद्ध भाषण केलें ! ( मोठ्यानें म्ह० ) **काश्यपा**चेंही वचन खोटें होईल कीं काय ? नाहीं.

तस्याः सत्यपि हंसतूलशयने, शय्या नवैः पल्लवैः;

सौवर्णेष्वपि कंकणेषु करयोर्भूषामृणालांकुरैः ;

संगीतेषु, मनोविनोदनविधिस्त्वद्विभ्रमाकर्णनः

सीता संप्रति, किंब्रवीमि ? भवता नीता दशामीदृशीं. २७

**रामः**— ( स्वगतं ) कथं मन्निमित्तमीदृशीमवस्थामनुभवति कल्याणी ? ( प्रकाशं ) सखे, कृतं परिहासेन,

**करा०**— ( स्वगतं ) प्रकृतोपयोगिन्येवास्य मनोवृत्तिः तदेवं वक्ष्यामि. ( प्रकाशं ) कथं मद्वचनेऽप्यनाश्वासः ? संप्रतिहि.

सा न स्नाति न चानुलिंपति न वा केशेषु धत्ते स्रजं,

न क्रीडासु मनो दधाति, न सखीरालोकते चाटुषु,

किंतु न्यस्तमुखांबुजं करतले बाष्पायमाणेक्षणं

निःश्वासग्लपिताधरं च नयने जागर्ति ते चिंतया. २८

**रामः** ( स्वगतं )

उक्तिरियं प्रियसुहृदोहृदयमनंगानलेन मे किमपि

तरलयति, हंत, संध्या सागरमिव चंद्रकिरणेन. २९

**करा०**— अपिचेदमुक्तं काश्यपेन.

**रामः** कथमिव. ?



ऐकून घे आणखी

## अभंग.

परांचा बिछाना असोनियां थोर, निजे पाल्यावर कोंवळीया; ४८
सोन्याचीं कांकणें टाकोनीयां जाण, हातांत भूषण मृणालांचें; ४९
संगीताची गोडी नसे आतां तीस, तुझेची वोलास ऐके प्रीती; ५०
फार काय सांगूं ? ऐसी तिची गती, केलीसे नीरूती तूंची, बापा. ५१

**राम.**— ( मनांत म्हणतो ) अहहा ! माझ्याच निमित्तानें ती सुंदरी अशी अवस्था भोगिते काय ? ( मोठ्यानें ) गड्या, थट्टा करणें पुरे कर.

**कराल**— ( मनांत ) आतां ह्याची मनोवृत्ती बरी प्रकृतोपयोगीच झाली आहे. तर याला आतां असें सांगावें. ( मोठ्यानें म्ह० ) काय ! माझ्याही वचनावर विश्वास नाहींना ? सांप्रत,

## श्लोक.

स्नानातें न करी, न लावित उटी, पुष्पें न गुंफीं कचीं,[1]
क्रीडाही न करी, सख्या वदती जें तीतें न त्याची रुचि.
ठेवीते मुखपंकजा करतळीं, डोळे भरी अश्रुनें
श्वासें ओठही शुष्क, झोप न तिला लागे तुझ्या चिंतनें ५५

**राम.**— ( मनांत ).

## आर्या.

ही मित्रोक्ति अनंगें[2] करिते चंचळ मदीय ह्रदयास,
संध्या चंद्रांशुवशें खवळविते जेंवि थोर उदधीस. ५३

**कराल.**— काश्यपानें, आणखी सांगितलें आहे.

**राम.**— काय तें ?

---

टीप.—१ केशांत. २ मदनाचा योगें.

करा०—

दीना दलत्कमल कुड्मलगंधगर्भे

संध्यानिले चलति सा तरलायताक्षी,

संकल्पलंभितभवत्परिरंभणेन

सर्वां निनीषति शशांकवतीं त्रियामां. २०

रामः ( सपुलकोद्भेदं, स्वगतं )

शृण्वतो मम तन्वंग्याः संकल्पपरिरंभणं

विद्धमुत्कंठयैवेदं भिद्यते सहसा मनः. २१

अतः खल्विदानीं

मनसि मम रंध्रजालाद्विगलति लज्जाच धैर्यंच,

अयमप्रविष्टपूर्वः प्रविशति मदनश्च तापश्च, २२

करा०— सखे, तूष्णीं भवसि.

रामः— ( धैर्यमवलंब्य ) किमनया कन्यकाकथया ?

करा०— ( विहस्य )

पृष्टं त्वया प्रथमतश्चरितं नतांग्या,

मध्ये श्रुतं पुलकसूचितभावबंधं,

किं त्वन्निवारयसि मामधुना वसाने ?

कोवाजितो न भुवने कुसुमायुधेन ? २३

करालः—

### साक्या.

सायंकाळीं सुगंधवायू कमळावरुनी येतां,
पूर्णेंदूचा पूर्वदिशेला रम्य उदयही होतां, ५५
हरिणलोचना दीन होउनी बैसे सीता मारी,
मनामधीं आलिंगुनि तुजला रात्र काढिते सारी. ५६

रामः— ( रोमांचित होऊन मनांत म्ह० )

### आर्या.

दयिता मनांत मजला, कवळी हा जंव उदंत[1] ऐकतसें,
तंव माझें त्हृदय कसें उत्कंठेंकरुनि शीघ्र फाटतसे ! ५७

### आर्या.

म्हणूनच आतां
छिद्रें पडलीं त्हृदया, त्यांतुनि लज्जा तसेंचि धैर्य गळे,
अज्ञातपूर्व[2] ऐसे शिरति मदन आणि ताप हे अगळे. ५८

करालः— सख्या, आतां कांहीं बोलत नाहींस ?

रामः— ( धैर्य धरून मोठ्यानें म्ह० ) ह्या अशा मुलींच्या गोष्टी कशाला पाहिजेत ?

करालः— ( हांसून म्ह० ).

### श्लोक.

आधीं तूंच विचारिलें चरित रे त्या अंगनेचें मला,
तें ऐकोनि मधें तुझ्या तनुवरी कांटा उभा राहिला !
अंतीं तूंच मला निषेधिसि कसा, आश्चर्य वाटे मनीं,
सांगे कोण न जिंकिला मनुज, बा, ह्या मन्मथानें जनीं ? ५९

---

टीप—१ वर्तमान. २ पूर्वी ठाऊक नव्हते असे.

रामः— ( सलज्जं, स्वगतं ) किमनेन विदितं मम चापलं ? दग्ध-हृदय, किं प्रतिपद्यसे ? इदमिदानीं.

सा मे यद्यपि सुंदरी भगवतो मामेवचेतो भुवो,
न स्वप्ने न च जागरे नयनयोः पंथानमासादिता,
तामाकर्ण्य तथापि तादृशदशावैधुर्यमासेदुषी,
मानंदाद्भुतशोककौतुकभयव्रीडाकुलंमेमनः ! ३४

( प्रकाशं. ) सखे, किंतवाप्यविदितमस्ति ? अपितु दुर्लभा सा ममेति प्रतिषिध्यसे.

करा०— ( स्वगतं ) कथंचिदस्य मया दृढीकृतो स्यामभिलाषः. ( प्रकाशं ) कीदृशी ते चिंता ? तद्घटनाय कौशिकमुनिरेव व्याप्रियते.

रामः. ( स्वगतं ) कथमसंभावितमाह पिंगळः. ( प्रकाशं ) सखे, कथंविदितं.

करा०— ( स्वगतं ) कथमिदमविदितमेतस्य ? ( प्रकाशं ) सर्वकाश्यपेनैवोक्तं ( नेपथ्ये ) हला उवणेहि मिणालाइं.

करालः ( स्वगतं ) कथमुपक्रांतो मारीचेन मायाप्रयोगः

( ततः प्रविशति मायया निगूढो मारीचः )

**राम.**— ( लज्जित होऊन मनांत म्ह० ) माझें मन चंचळ झालें हें यानें जाणिलें काय ? हे त्हृदया, आग लागो तुजला ! तुला अशानें काय प्राप्त होणार ? हें पहा आतां ?

## श्लोक.

माया केवळ कामदेवविभुची जी सुंदरी, ती जरी
म्यां नाहींच विलोकिली अजवरी स्वर्मीहि वा जागरीं;
तीची ऐकुनि हे दशा, विकृति मच्चित्तांत होती, पहा,
आनंदाद्भुतशोककौतुकभयव्रीडात्मका[1] ह्या अहा ! ६०

( मोठ्यानें म्ह० ) सख्या, ही गोष्ट तुला ठाऊकच आहे. परंतु मी जो तुझा निषेध करितों, तो ती मला प्राप्त होणें दुर्लभ ह्मणून करितों इतकेंच.

**कराल**— ( मनांत ह्म० ) **जानकी**विषयीं ह्याचा अभिलाष मी बराच दृढ केला ! ( मोठ्यानें ह्म० ) सख्या, ह्याची चिंता तूं कशाला करितोस ? याविषयीं **कौशिक** ऋषीच स्वतः उद्योग करीत आहेत.

**राम.**— ( मनांत म्ह० ) **पिंगला**ची ही गोष्ट असंभावित दिसते ! ( मोठ्यानें म्ह० ) गड्या, हें तुला कसें कळलें रे ?

**कराल.**— ( मनांत म्ह० ) ही गोष्ट मला विदित नाहीं बरें ? ( मोठ्यानें म्ह० ) सर्व **काश्यपा**नेंच सांगितलें. ( इतक्यांत पडद्यापलीकडे शब्द होतो ) ' अगे मृणालें घेऊन या गे ' !

**कराल.**— ( मनांत म्ह० ) काय ! **मारीचा**नें मायाप्रयोग करण्यास प्रारंभ केला वाटतें !

( नंतर मायेच्या योगानें गुप्त असा **मारीच** पडद्या बाहेर येतो ).

---

टीप—१ लज्जा.

**मारीचः.**

सीता तिष्ठति यादृशी, परिजनस्तस्याः पुनर्यादृश,

स्तत्कर्माणि च यादृशानि, निखिलं तद्वत्कृतं मायया;

किंत्वेकः परमार्थतः पितृवधव्याजाद्विहातुं वपु,

र्जानक्या इति संभृतो रघुशिशोरेव प्रवेशानलः. ३५

तदिदानीं निवर्तितप्रायएव ताटकावधस्य प्रतीकारो लंकेश्वरमनोरथश्च. ( परितोवलोक्य ) अत्र बकुलतरुमूले मायापिंगलेन नीतोयं रामभद्रइव लक्ष्यते.

**रामः—** इत्थमाहकाश्यपो मामत्रभवान्यज्ञनिमित्तं युष्मदुपनिमंत्रणाय कौशिकमहर्षिरागतइति.

**मारी०—** ( साशंकं, स्वगतं ) किमयं काश्यपः ? यदनेनकाश्यपो भवानित्यामंत्रितं. किमस्य पिंगलवेषग्रहणप्रयोजनं ? तदिदानीं सन्निहिते कदलीवने तिरोधाय क्रमेण ज्ञास्यामि (इतितिष्ठति.)

**करा०—** ( स्वगतं ) यज्ञोपनिमंत्रणार्थमेवकौशिकमहर्षेरागमनमिति निश्चितमेतस्य ( प्रकाशं ) सखे, मैवंवादीः; व्याजएवायं कौशिक महर्षेः.

**मारी०—** ( श्रुत्वासभयं ) हंत, व्यक्तमभिहितं. काश्यपपदप्रयोगं प्रतिषेधवतानेन बटुना स्वस्य पिंगलवेषग्रहणं कौशिकस्यैव व्याज-

मारीच —

### श्लोक.

**सीता** आणि तिच्या सख्या तशिचकीं कर्मे तयांचीं वरीं;
केलीं मायिक हीं हुबेहुब तशीं, तीं तों न होतीं खरीं ;
आतां एक खरा मिया पितृवधव्याजेंचि[1] **सीते** पहा ;
टाकाया तनु पेटवोनि दिधला **राम**प्रवेशाग्नि[2] हा. ६१

तर आतां **ताटि**कावधाचा प्रतीकार, आणि **लंके**श्वराचा मनोरथ, हीं दोन्हीं पार पडल्यासारिखींच आहेत. (इकडे तिकडे पाहून म्ह०) या बकुलवृक्षाखालीं **माया**पिंगलानें **रामा**ला आणिलेंसें वाटतें ?

**राम**.—(**कराला**प्रत म्ह०) तुम्हाला यज्ञार्थ निमंत्रण करण्याकरितां **कौशि**क ऋषि आले आहेत असें मला **काश्यपा**नें सांगितलें.

**मारीच**.—(शंकित होऊन मनांत म्ह०) **रामा**नें **काश्यपा**चें नांव घेतलें ! तेव्हां म्हटलें हा **पिंगल**रूपधारी **काश्यप**च आहे कीं काय ? **काश्यप**च असला तर ह्याला **पिं**गलाचा वेष घेण्याचें काय बरें कारण ? असो, हें जवळच कदलीवन आहे. ह्या वनांत लपून बसावें, म्हणजे हा प्रकार काय आहे तो सर्व क्रमाक्रमानें समजेल. ( असें म्हणून तेथेंच उभा राहतो ).

**कराल**.—(**रामा**च्या बोलण्यावर मनांत म्ह०) यज्ञार्थ निमंत्रण करण्याकरितां केवळ **कौशि**क ऋषि आला असा ह्याचा समज आहे. ( मोठ्यानें म्ह०) असें तूं ह्मणूं नको हो ! **विश्वामित्र** ऋषीचीही मसलत आहे !

**मारीच**.—( ऐकून भयानें म्ह०) अरेरे ! असें म्हणूं नको म्हणजे मला **काश्यप** म्हणूं नको, असा हा विप्रबटू[3] निषेध करितो. यावरून स्पष्ट झालें कीं मी जो **पिं**गलाचा वेष घेतला आहे तें सर्व **कौ**शिकाचेंच कपट आहे. यावरून, मी[4] **काश्यप**रूप घेऊन ठकवि-

---

टीप.—१ बापाच्या मरणमिषानें. २ रामाच्या प्रवेशार्थ केलेला अग्नि. ३ काश्यपानें. ४ मारीच.

इति. अतो मन्ये काश्यपरूपेण प्रलंभयिष्यंतं मामभिव्यक्तुमयं कौशिकस्यारंभः

( पुनर्नेपथ्ये ) हेलाउवणीदाई मिणाळाइं.

**रामः.**— सखे, दक्षिणत आलापः ? कस्यायं भवेत् ?

**करा०**— ( सर्वतोवलोक्य स्वगतं ) इदानीमपि न दृश्यते काश्यपवेषधारी मारीचः ? अतो नायं मायाप्रयोगः.

( प्रकाशं ) वनभूमिषु वनदेवताः व्याहरेयुः.

**मारी०**— सत्यमेवायं काश्यपः. कथमन्यथा मदीयमायाभिज्ञेनानेनापि जानकी परिजनइति नवर्ण्यते ? ( विचिंत्य ) क्रगतःकराळ इति परितप्यते मे त्द्दयं. अथवा

हंत,निश्चितमेतन्मे, करालं पिंगलाकृतिं
आलंब्य कौशिकस्याज्ञामवधीदेव लक्ष्मणः २६
भवतु द्वावप्येतौ रामकाश्यपौ मायया निगृहीष्यामि
तदेवं सुबाहोरिव करालस्यापि शल्योद्धरणं.

**रामः**— सखे, निभृतमस्मिन्निकुंजे विटपांतरितौ पश्यावः

( इति शरचापपाणिरुत्तिष्ठति. )

**करा०**— तथास्तु ( इत्यनुव्रजति )

**मारी०**—

रघुनंदनएष सुंदरः, करपद्मार्पितबाणकार्मुकः,
अहिडिंभ इवोद्गमन्विषं स्पृहणीयश्च भयंकरश्चमे २७
भवत्वेवमस्मै दर्शयिष्यामि ( इति ध्यानं नाटयति. )

णार, ती माझी उघडीक व्हावी म्हणून कौशिकाचाच हा सर्व उद्योग असेल असें वाटतें !

(पुनः पडद्यापलीकडे शब्द होतो) "सखे मृणाले आणिली बरें ! "

**राम.**— दक्षिणेच्या बाजूस हा कोणाचा शब्द ऐकूं येतो बरें ?

**कराल.**—(चोहींकडे पाहून मनांत म्ह०) आजूनही काश्यपाचा वेष घेऊन मारीच येत नाहीं. यावरून वाटतें कीं हा मायाप्रयोग नव्हे. ( मोठ्यानें म्हणतो ) वनांमध्यें वनदेवता बोलत असतील; दुसरें काय आहे ?

**मारीच.**—होय, हा काश्यपच आहे यांतसंशय नाहीं ! कारण कराल असता तर हा माझा मायाप्रयोग आहे असें यास ठाऊक असून ही जानकी व ह्या तिच्या सख्या आहेत असें न सांगता काय ? सांगताच. ( चिंतेनें म्ह० ) कराल कोठें गेला तें समजत नाहीं म्हणून मनाचा संताप होतो अथवा असें झालें असेल.

**श्लोक.**

करालापिंगलाकारा कौशिकाज्ञे करोनियां
लक्ष्मणें मारिलें वाटे मला निश्चित हें खरें. ६२

असो काय चिंता आहे ? राम व काश्यप हे दोघे एथें आहेत. या दोघांसही मायेच्या योगानें शिक्षा करीन, म्हणजे सुबाहु व कराल या दोघांबद्दलचाही सूड उगवेल !

**राम.**—( करालाप्रत म्ह० ) गड्या, ह्या जाळीच्या आड उभे राहून निवळ पाहूं ! ( असें म्हणून हातांत धनुष्यबाण घेऊन उठतो. )

**कराल.**— बरें आहे चला तर. (असें म्हणून त्याच्या मागून चालतो )

**श्लोक.**

रघुनंदन सुंदराकृति, करिंज्याच्या शरचाप शोभती,
स्पृहणीय[१] हि भीति देतसे, विषधारी अहितोक[२] कीं जसें.

असो असें, त्यालाही दाखवीन. ( असें म्हणून ध्यान करितो ).

---

टीप.-१ रम्य. २ सपाचे बाळ.

रामः ( पुरतोवलोक्य, सविस्मयं. )

अंतः शुष्यदुशीरचंदनरसस्रस्तैः श्रितो रेणुभिः,

प्रांते कज्जलबिंदुभिः प्रविगलद्बाष्पावृतैरंकितः,

पर्यंतेच मृणालहारवलयैर्नानापविद्धैर्वृतः,

कस्या वामदृशोयमंगलुठनक्लांतः प्रवालास्तरः ? २८

करा ० — अस्मादालापश्रवणादपत्रपमाणया, कचिदुच्चलितया

कयाचिदुत्कंठितया परित्यक्तो भवत्. ( पुनर्नेपथ्ये ) हं

अण्णेहिसे थणसु एदाइं मिणालाइं, महंतो रखुतवस्सिणीए इम

ए संदावो.

रामः— सखे, संगतस्ते तर्कः.

करालः— ( स्वगतं ) कथंकचिद्विलीनेन मारीचेन वितन्यते माय

अथवा परमार्थोयं ? भवतु, पश्यामि. ( प्रकाशं ) सखे, किं

दग्रतोभवावः.

रामः— तथा कुर्वः ( इति परिक्रम्य ) केयमग्रे रक्तांशुकपिहि

स्तनी, पल्लवितेवाशोकलतिका, नवनिकृत्तमत्तकरिदंतछवी

मृणालानि समानयति ?

**राम.**— ( पुढें पाहून आश्चर्यानें म्हणतो ).

**श्लोक.**

वाळा चंदनचूर्ण ओलसर हें जीच्या[1] मधें शोभतें,
कांठीं कज्जल अश्रुबिंदुयुत हें कैसें परी दीसतें,
झाले म्लान मृणालहार म्हणुनी हे टाकिले भोंवतीं,
शय्या यास्तव ही सुपल्लवकृता स्त्रीचीच रे, दीसती. ६४

**कराल.**— हें बोलणें ऐकूं येतें, यावरून कोणी एकादी तरुण स्त्री कामानें उत्कंठित होऊन या शयनावर निजली असून पुढें लज्जित होऊन ह्या शयनावरून कोठें तरी पलीकडे गेली आहे असें वाटतें.

( पुनः पडद्यापलीकडे शब्द होतो. )

अगे सखे, हिच्या स्तनावर हीं मृणालें घाल. ह्या बिचारीचे अंगाचा फारच संताप होत आहे ?

**राम.**— गड्या, तुझा तर्क बरोबर आहे ?

**कराल.**—(मनांत म्ह०) मारीच हा कोठें तरी लपून बसून ही माया दाखवीत आहे, किंवा हें सर्व वास्तविकच आहे. याचा उमज पडत नाहीं ? असो पहावें तर खरें !( मोठ्यानें म्हणतो ) सख्या रामभद्रा अम्मळ पुढें जाऊन पाहूं.

**राम.**— बरें चल तर. ( असें बोलून इकडे तिकडे फिरतो व म्हणतो ) अरे ही कोण येत आहे बरें; ही लाल कुसुंभी साडी नेसली आहे. कोणी म्हणेल कोंवळी कोंवळी लाल पालवी जीस फुटली असी ही अशोकलताच आहे ! हिनें स्तनावरून पदर कसा घट्ट आंवळून बांधिला आहे पहा ! नवाच मत्तगजाचा दंत कापून आणावा त्या दंताप्रमाणें कांतिमान् असीं मृणालें हिच्या हातांत आहेत !

---

टीप.–१ शय्येच्या.

**करा०**— ( स्वगतं )

नदृश्यतेत्र मारीच, स्तन्मन्ये काश्यपाकृतिं
विज्ञाय लक्ष्मणेनैनं घातयामास कौशिकः. ३९

भवतु, नायमवसरः शोकस्य. ( प्रकाशं ) किमनेन परकलत्र दर्शनेन ? सखे, गवेषयिष्यते परिजनस्तदन्यतोगच्छावः.

**मारी०**— ( सशोकं ) निश्चित एवायं काश्यपइति, यदेषसंपादयति वैमुख्यं रामस्य. भवतु, तस्यत्हृदयमाक्षिपामि ( ध्यानं नाटयति )

**रामः**— सखे, पश्य पश्य.

अयं क्रीडाशैलः कनककदलीवेष्टिततरो
वहत्यस्योपांते विलसदरविंदासरिदियं,
अदूरे वैतस्माद्दरदलितमाकंदकलिको
निकुंजोयं कूजद्भ्रमरकुलझंकारमधुरः ४०

अपिच तत्रैव मृणालान्युपहरति सीमंतिनी .

**करा०**— रमणीय मिदं संविधानं. तदेतद्द्रक्ष्यामि ( परावर्त्तते )

**मारी०**— ( सावेगं ) अयिकाश्यप, नन्वितो हतोसि मारीचेन.

( नेपथ्ये ) हला, अप्पिदाइं मिणालाइं, सिंचेमिणं उसीर चंदण रसेहिं.

**कराल.**—( मनांत म्हणतो ) मला निश्चयें असें वाटतें,

## आर्या.

नदिसे मारीच म्हणुनि वाटे त्याला मुनीश्वरें वधिलें
लक्ष्मणहस्तें, जाणुनि कीं त्यानें काश्यपाकृतिस धरिलें. ६५

असो. हा आतां शोक करीत बसण्याचा समय नव्हे ! (मोठ्यानें म्हणतो ) सख्या दुसऱ्याच्या स्त्रीस पाहून काय करायाचें आहे ? तर आपली सेवकमंडळी कोठें आहे त्यांचे शोधार्थ दुसरेकडे जाऊं चला.

**मारीच.**—( शोकानें म्ह० ) खचित हा काश्यपच यांत संशय नाहीं ! कांकीं, माझ्या मायेविषयीं हा रामाला विमुख करितो. असो त्याचे त्दृदयासही वळवितों, काय चिंता आहे ? ( असें बोलून ध्यान करितो. )

**राम.**—( करालाप्रत म्ह० ) गड्या,

## श्लोक.

क्रीडापर्वत हा, सुवर्णकदली याच्या तटीं शोभती;
वाहे सन्निध ही नदी, कुवलयें जीच्या जळीं दीसती;
येथोंनी जवळी रसालकलिकासंपन्न[१] ऐसा नवा;
आहे कुंजें[२], जयांत भृंग करिती मंजूळ गुंजारवा[३]. ६६

आणखी ही स्त्री तिकडेसच मृणालें घेऊन जात आहे !

**कराल.**—हें संविधान रमणीय आहे खरेंच ! तर हें पाहतों मी ! ( असें म्हणून मागें वळतो )

**मारीच.**—( आवेशानें) काश्यपा, येथें तूं मारीचाचे हातून मेलासच बरें ! सुगयाचा नव्हेस ! ( पडद्या पलीकडे शब्द होतो ) सखे मृणालें दिलीं, आतां वाळा आणि चंदन यांचा रस काढून हिचे शरीरावर शिंपतें ?

टीप.—१ आंब्याच्या मोहारांनीं युक्त. २ जाळ्या. ३ चांगल्या मंजुल शब्दातें.

**करा०**— ( स्वगतं ) कथं मधुरोयं बालानामालापः; उपसृत्य पश्यामि, अथवा, न पश्यामि.

मारीचे रक्षसांमाया संप्रदाय गुरौ हते,

पर्याकुलस्यमनसः क्कमे धैर्यावलंबनं १ ४१

( प्रकाशं ) सखे, पश्य पश्य, कोयमालापइति.

**रामः**— ( उपसृत्यदृष्ट्वा ) पिंगल, काः पुनरिमाः समानवयोरूपसंपदः कन्यकाः १ ततः प्रविशति किसलयशयनोपविष्टा माया सीता, सख्यश्च.

**एका.**— हंहो, णलिणी पत्तेहिं वीजेमिणं.

**अपरा**— तुमं विचंदणदव्वेण एदाए थण जु अलं अणुलिपेहि.

**करालः**— ( दृष्ट्वा, स्वगतं ) केयमसाधारणरूपलावण्या वरवर्णिनी जानकी वपुषा मदनविकारमनुभवति १ ततो मन्ये मारीचस्य मायाप्रयोग इति. भवतु, उपर्यपिद्रक्ष्यामि.

एतामनोहरांग्यः स्मरसुदृशो, वा भुजंगकन्यावा,

केलीगृहीतलीलावपुषः स्मरवैजयंत्योवा १ ४२

**रामः** ( साश्चर्यं ) सखे, मध्ये पश्यपुनरेतासां

विभक्तेयं विद्युत्कथमपि घनाद्धमरुता

शरीरिण्यथ्यास्ते शयनमधुना पल्लवमयं,

**कराल.**— ( मनांत म्ह० ) काय हो मधुर हा मुलीचा शब्द आहे ! जवळ जाऊन तरी पहावें, अथवा नच पहावें.

## आर्या.

मायिककर्मनिपुण जे राक्षस त्यांचाहि थोर आचार्य,
तो **मारीचहि** मेला, मग मच्चित्तास कोठचें धैर्य ? ६७

( मोठ्यानें ) सख्या पहा पहा हा कोणाचा शब्द आहे तो ?

**राम.**— ( जवळ जाऊन पाहतो आणि म्हणतो ) **पिंगला,** ह्या कोणाच्या मुली आहेत बरें ? यांचीं वयें व रूपें कशीं एकसारिखीं च आहेत ! ( नंतर कोंवळ्या कोंवळ्या पाल्याच्या आंथरुणावर निजलेली मायेची **सीता** व तिच्या सख्या येतात ).

**एक सखी.**— अगे, नलिनीपत्रानें मी हिला वारा घालितें.

**दुसरी सखी.**— तूंही हिचे स्तनांस चंदनाची उटी लाव.

**कराल.**— (पाहून मनांत म्हणतो) ही अत्युत्तमस्त्री कोण आहे बरें ? हिच्या रूपासारिखें उत्कृष्ट रूप कोठें पाहिलें नाहीं. ही आकृतीनें **जानकी** सारिखी दिसते व मदनव्यथाहि भोगिते आहे. यावरून हा **मारीचा**चा मायाप्रयोग असेल असें वाटतें. असो पुढें काय होतें तें पहावें.

## आर्या.

अत्यंतरम्यरूपा स्मरस्त्रिया ह्या भुजंगकन्या वा
किंवा कामपताका धरिला ज्यांनीं विलास देह नवा. ६८

**राम.**— ( आश्चर्य पावून ) ह्या मुलीच्या मध्यभागीं तर पहा !

## श्लोक.

निराळी कीं केली घनपटलिंची वीज मरुतें,[१]
धरोनी देहातें किसलय पलंगीं पहुडते,

टीप.—१ वायूनें.

( अथवा )

हरस्य क्रोधाग्नौहुतवति शरीरं प्रियतमे

वियोगक्षामांगी विगमयति कालं किमु रतिः ४३

करालः.— सखे, दृश्यते एव.

कुशविलुलितमंगं, कातरो दृष्टिपातः,

परिणतबिसवल्लीपांडुरांगंडपालिः,

स्तनतटमकठोरं, सर्वमप्येतदस्यां

कथयति सुकुमारं कामदोर्विक्रमैनः. ४४

मारीचः—( सहर्ष ) इत्थमिदानीं मारीचवागुरालग्न एव क्षत्रिय बटुः काश्यपेन सह ।

लक्ष्मणेनसहैतस्य करालस्याधुनाततः

करिष्यते मयैताभ्यां वैरनिर्यातनं द्रुतं. ४५

( अथवा )

हरक्रोधाग्नीनें प्रिय जळुनि गेला निजपती
म्हणोनी क्षीणांगी जणुं समयही पाळित रती. ६९

**कराल.**— पहा म्हणून सांगणें कशास ? ही स्पष्ट दिसतेच आहे.

**आर्या.**

क्षीणग्लानतनू ही, परिणत[१] बिसतुल्य पांढरे गाल,
अकठिन पयोधरद्वय, झाली दृष्टीहि भीतिनें चपल; ७०
ऐसी स्थिती तरुणिची पाहोनी आपणा असें कळलें,
कीं कामें सुकुमारा निजभुजयुगविक्रमासि[२] दावियलें. ७१

**मारीच.**— ( हर्ष पावून ) हाँ ! आतां हा क्षत्रियाचा पोरगा **का-श्यपा** सुद्धा ह्या **मारीचा**चे जाळ्यांत सांपडला खरा !

**आर्या.**

**लक्ष्मण, राम** तसाची **काश्यप** ऐशा तिघांस मारुनि हा
मी **मारीच** उगवितों **कराल**वैरास आजि शीघ्र पहा. ७२

( असें म्हणून पुनः ध्यान करितो. )

**राम.**— ही गोष्ट काय विलक्षण दिसते पहा !

**श्लोक.**

नेघे ही दधिभक्तपात्रें[३] जवळी भक्षावया सारिका,
नाहीं पाहत, तो, जरीहि दिधलें दाळिंब केलीशुकां[४],
देतां हंस मृणालतंतु वदनीं टाकी बळें थुंकुनी,
पक्षीही करितात शोक असल्या शोका हिच्या देखुनी ! ७३

**कराल.**— (मनांत म्ह० ) समजलें रे समजलें ! हा **मारीचा**चाच मायाप्रयोग आहे. ( मोठ्यानें म्ह०) सख्या **कौशिकऋ**षीचा आश्रम येथून जवळ आहे, त्यावरून ही **जानकी**च असावी असें वाटतें.

---

टीप.—१ पक्क.२आपल्या भुजयुगाच्या पराक्रमास. ३ दहिंभाताचें भांडें. ४ क्रीडाशुकाला.

( इति पुनर्ध्यानं नाटयति, )

**रामः—** अपूर्वमिदमन्यथालक्ष्यते । तथाहि

नादत्ते दधिभक्तभाजनमिदं पातुं पुरःसारिका ।
बीजापूररसोपभोगविमुखः क्रीडाशुकोयंस्थितः ।
दूरोन्मुक्तमृणालकंदकवलो हंसोप्यसौवर्त्तते ।
तन्व्याः शोकमवेक्ष्यनून मधुना शोकस्तिरश्चामपि । ४६

**करा०—** ( स्वगतं ) विदितमिदं मारीचस्य मायाप्रयोग इति. ( प्रकाशं ) सखे, सन्निधानात्कौशिकमहर्षेराश्रमपदस्य भवेद्‌पिनामेयं जानकी.

**रामः—** ( स्वगतं ) उपपन्नमेवैतत्. ईदृशी खल्ववस्था कथिता काश्यपेनतस्याः. ( प्रकाशं ) अलमसंभावितार्थकथनेन.

( ततः प्रविशति काश्यपः )

**काश्य०—** रामस्य पिंगलमुखेन विदेहकन्या,
नीतं मनः स्थितमुदारगभीरमेव,
तातस्थ्यनाटनपरस्यच गाधिसूनो
राज्ञा गुरोरपिकथंचिदनुष्ठितैव. ४७

( विचिंत्य ) नहि मृगयाप्रवृत्तस्य रामभद्रस्य प्रवृत्तिरुपलब्धा. अतः खलु पिंगलोपि क्वचिदन्विष्य मयाविसृष्टः भवत्वप्रविष्टमिदं माकंदवाटं प्रविश्य मृगयिष्ये ( इतिपरिक्रामति. )

**करा०—** ( काश्यपं दृष्ट्वा सहर्षमात्मगतं ) अयं खलु काश्यपवेषो मारीचो मिथ्यात्मानं दर्शयति रामस्य. ( प्रकाशं ) कथमसंभावितार्थकथनं ? असौ सीतावृत्तांतवेदीकाश्यप इतोदृश्यते तमेन मानयिष्यामि भवदंतिकं ( इति निष्क्रांतः )

**रामः—** ( दीर्घं निश्वस्य )

कथयिष्यति कौशिकस्यशिष्यो मदनच्छिन्नमनोरमांगयष्टिं
वसुधातनयात्वियंनचेति क्षुभितं मे लभते न शर्म चेतः ४८

राम.— ( मनांत म्ह० ) हा म्हणतो हें बरोबर आहे. कांकीं जानकीची अशी अवस्था झाली आहे असें काश्यपानें सांगितलें खरेंच. (मोठ्यानें म्ह०) असंभावित गोष्टी नको सांगूं गड्या.

( तदनंतर काश्यप पडद्या बाहेर येतो. )

काश्यप.—

श्लोक.

केलें राममनास पिंगलमुखें सीतानुरक्तत्वरें,
जे गंभीर उदार फार म्हणुनी विख्यात लोकीं खरे,
बाहेरूनि उदासता धरि, परी चित्तांत नाहीं तसा,
जो कां गाधिज,[1] तन्नियोग[2] हि मियां संपादिला कांहिंसा. ७५

( विचार करून ) रामभद्र मृगया करायास गेला, त्याचें ठिकाण लागेना म्हणून पिंगलाला शोधून काढून पहायास पाठविलें. असो ह्या माकंद वटिकेंत अद्यापि आपण गेलों नाहीं. तर येथें जाऊन शोध करावा. ( असें म्हणून इकडे तिकडे फिरतो. )

कराल.— ( काश्यपाला पाहून हर्षानें मनांत म्हणतो ) खरेंच हा काश्यपाचा वेष घेऊन मारीचच रामाला माया दाखवीत आहे. ( मोठ्यानें म्हणतो ) मी असंभावित गोष्टी सांगतों ना ? बरें तर थांब. तो काश्यप दिसत आहे. पहा, तो सीतेचें सर्व वर्तमान जाणतो. तर मी त्याला तुजकडे घेऊन येतों.

( असें म्हणून निघून जातो. )

राम.— ( दीर्घश्वास टाकून ).

आर्या.

मदनज्वरें निपीडित मनोरमा हीच जानकी ऐसें
काश्यप वदेल किंवा नाहीं म्हणवोनि चित्त कांपतसे. ७५

टीप.—१ कौशिक. २ त्याची आज्ञा.

**मारी०**— कथंरामंविहाय पिंगलवेषः काश्यपो दूरंगतः । तदहं यथा संकल्पितमस्यरूपमादाय क्रमेण तदध्यवसितमाविष्करिष्ये. ( इतिध्यानं नाटयति )

**सीता.**—

संदाँवो महणगओ इमिणा सिसिरोवआरेण;

हिअहे घणसलिलेहिं उप्पलिणीए कहं सुहंहोदि । ४०

( इतिरोदिति )

**रामः**— अये कथमेतत् !

क्वणद्वीणानादप्रतिनिधिरमुष्यामृगदृशो,

मृदुःकंठादुद्यन्नभिनवसुधास्यंदिमधुरः ,

मदावेशोयद्वत्प्रगुणमदिरास्वादजनितः ,

श्रुतो यं व्याहारो त्दृदयमिदमाघूर्णयतिनः. ५०

( ततः प्रविशति काश्यपवेषो मारीचः )

**मारीचः**— अयमिदानीमुपसर्पामि. आगते पिंगलवेषे काश्यपे छद्मना राममावर्जयिष्ये. ( इति चिंतयन्परिक्रामति )

**रामः**— अहो रूपानुगुणावाणी ! तदनुगुणाच रूपसंपत् । तथाहि;

अस्याश्चेदलकावली, कुतमलिश्रेणीभिरेणीदृशः

सौंदर्यं यदि चक्षुषोः सरलयोः, किमन्मथस्याषुभिः १

का प्रीतिः कनकारविंदमुकुले, पीनौस्तनौचे, दतो

मन्ये काचिदियं मनोभवकृता माया जगन्मोहिनी । ५१

**मारी०**—काय ! **रामा**ला सोडून **पिंगलवेषधारी काश्यप** दूर गे-ला ! तर आतां ठरल्याप्रमाणें याचें रूप घेऊन त्याच्या मनांत काय आहे याचा हळूहळू शोध लावितों. ( असें म्हणून ध्यान करतो. )

**मायासीता**.—

### आर्या.

शांति नपवेचि माझा संताप अशाहि थंड उपचारें ;
दिवसा कुमुद्वतीला[1] घनसलिलें सौख्य काय होय बरें ? ७६
( असें ह्मणून रुदन करिते. )

**राम**.— अरेरे ! हें काय !

### आर्या.

वीणानादचि दुसरा कंठांतुनि मृदु हिचे निघे स्वर हा,
धिक्कारुनि माधुर्यें स्वीयें म्हणतो सुधेस दूर रहा. ७७
मत्ताच्या चित्ताला मदिरेचा स्वाद जेंवि तेंविच हा
आलाप ह्या तरुणिचा व्यग्र करी मन कसें मदीय पहा ! ७८

( नंतर **काश्यपा**चा वेष घेऊन **मारीच** पडद्या बाहेर येतो. )

**मारीच**.— हा मी आतां **रामा**च्या जवळ जातों, आणि **पिंग-लवेषधारी काश्यप** आला म्हणजे कपट करून **रामा**च्या मनांत त्याविषयीं वांकडें आणितों. ( असें म्हणून इकडे तिकडे फिरतो )

**राम**.— अहाहा ! रूपाला योग्य अशी वाणी, आणि वाणीला योग्य अशीच रूपसंपत्ति आहे.

### श्लोक.

माथा ही अलकावली[2], मग नको श्रेणी[3] अलींची[4] बरें;
तैसे सुंदर नेत्र दृष्ट तरि, तीं कामायुधें[5] तुच्छ रे ;
पाहाती स्तन पीन, त्यांस कनकाब्जांचे कळे कायसे ?
कामें ही रचिली गमे मज जगन्मोहार्थ माया असे. ७०

---

टीप.—१ चंद्रविकासी कमल. २ केश. ३ पंक्ती. ४ भ्रमरांची. ५ कमलें.

**मारीचः**— ( विहस्य ) मारीचकृते तिवक्तव्यम्.

**रामः**— दिष्ट्या काश्यपोयमागतः. तदेनंद्रष्टुमपत्रपते मेन्हृदयं. ( इति मुखंनमयति )

**मारी॰**— ( स्वगतं ) एषखलुताटकावधमहापातकी क्षत्रियबटुः,

निगूढाहंकारो, मनसि निजधैर्येण गुरुणा
दुराधर्षो, वीरोरसइव शरीरी परिणतः,
असौ मे सौभाग्यादमृतमिव सिंचन्नपि दृशो
विधत्ते वैधुर्यं ज्वलितइव दीपः कलुषयोः. ५२

कदापुनरेनममनोप्रवेशयिष्यामि. ( उपसृत्य, प्रकाशं ) विजयीभवतु कुमारो रामभद्रः

**रामः**—( मुखमुन्नमय्य ) कथं काश्यपोसि ?

**मारीचः**— ( साशंकं, स्वगतं ) किमनेनमदीयमायानिकृतिः परिज्ञाता ? ( विमृश्य ) नैतत्संभाव्यते. अपितु मन्ये परमार्थकाश्यपइति मत्वा पिंगलरूपंपरित्यज्य पुनः स्वरूपग्रहणे फलंपृच्छति. भवत्वेवं तावत् ( प्रकाशं ) अकैतवः खल्वयं महर्षिशिष्यः.

**रामः**— ( स्वगतं ) नूनमयं पिंगलेनदृष्टः स्यात्, मदनेन वचनेन जानकीयमिति विज्ञाप्यते. ( प्रकाशं ) किमियंसीतैव. ?

**मारीच**— ( हांसून ) कामानें काय ? **मारीचानें** असें म्हण.

**राम**.— ( **मारीचास** पाहून म्ह० ) दैवानें हा **काश्यप**ही प्राप्त झाला. पण याची भेट घेण्यास मला लाज वाटते. ( असें म्हणून तोंड खालीं घालितो )

**मारीच**— ( मनांत म्ह) हा, ताटकावध करून महापातकी झालेला क्षत्रियाचा पोरगा तो हा बरें !

## श्लोक.

चित्तीं गूढ अहंमति प्रकटही, धैर्ये दुराधर्ष हा,
जाणों वीररस स्वयें धृतवपू होऊन आला पहा,
सौंदर्य करुणीच सिंचित असे पीयूष डोळ्यांवरी,
दुर्दैवें मज पाहवे न दुखऱ्या डोळ्यांस दीपापरी. ८०

अरेरे ! यानें अग्नींत उडी टाकून हा भस्म झाला असें केव्हां करीन रे ! ( **रामा**चे जवळ येऊन मोठ्यानें म्हणतो). कुमार **रा**मभद्रा, तुझा जयजयकार असो !

**राम**.— ( वरती पाहून ) काय ! तूं **काश्यप** कीं ?

**मारी**०— ( शंकित होऊन मनांत म्हणतो ) काय ! यानें हें माझें मायेचें कपट जाणलें कीं काय ? ( विचार करून म्हणतो ) अँः असें कोठून होणार! परंतु हा खराच **काश्यप** आहे असें मला समजून, **पिंग**ळाचें रूप घेतलें होतें तें टाकून पुनः आपलें रूप घेण्याचें प्रयोजन काय ? असा याचा ह्या विचारण्यांतील भाव दिसतो, इतकेंच. असो कांहीं. ( मोठ्यानें म्हणतो ) हा **कौ**शिक महर्षींचा निष्कपट शिष्य आहे.

**राम**.— ( मनांत म्ह० ) खचित हा **पिंग**लाला भेटला असावा, आणि ह्याचमुळें ही **जान**कीच आहे, असें त्याच्या ह्या निष्कपट पदावरून सूचित होतें. ( मोठ्यानें म्हणतो ) काय, ही **सीता**च होयना ?

**मारी०**— ( स्वगतं ) न खलु स पिंगलवेषः काश्यपः, अतएव नायमाह, यद्यकैतवस्त्वं कुतःपिंगलोसीति. ( प्रकाशं ) सैवेयंसीता.

**रामः**— ( सहर्षं, स्वगतं ) धन्यमसि, हृदय, धन्यमसि ! ( प्रकाशं ) तदिमांप्रति असत्यामाह पिंगलः.

**मारीचः**— ( स्वगतं ) सखलुपरमार्थएवपिंगलः करालस्तु लक्ष्मणेनहत-एव किंकरोमि ? ( प्रकाशं ) क्वगतः पिंगलः ?

**रामः**—( स्वगतं ) नूनमस्य तेन विसंवादः. कथमेतत् ? ( प्रकाशं ) त्वमिहागतइत्यभ्युद्गतः किमयं प्रागिव वनगजेनगृहीतः स्यात् ?

**मारीचः**— ( सहर्षं, स्वगतं ) करालएव पिंगलरूपं धृतवान्. अस्थाने पुनरहं भ्रांतः. ( प्रकाशं ) नह्यस्मिन्माकंदवने तस्यप्रसंगः ( इति ध्यानं नाटयति )

**काश्यपः**. — ( किंचिद्दूरमग्रतोवलोक्य ) कथमत्र पल्लवशयनाधिष्ठिता, परिमितसखीजनपरिवृता जानकी शिशिरोपचारैरात्मनोमदनतापमपहरति. अहोकथमेतत् ! सारवल्वध्यर्द्धयोजने कौशिकाश्रममधिवसति. अनयापुनरन्यया तत्समानाकारण्याभवितव्यं. ( ततः पश्चादवलोक्यसमयं ) अहो बत महतिगर्ते शुष्केंधनसमिद्धो, भग्नानंगारप्रायः सन्निहितयामहत्या शिलया तिरोहितरूपो,

**मारीच.**— ( मनांत म्हणतो ) तूं निष्कपट आहेस तर पिंगल कां झाला होतास, असें यानें मला म्हटलें नाहीं, यावरून तो पिंगल वेषधारी काश्यप नव्हे ! ( मोठ्यानें म्हणतो ) होय सीताच ही.

**राम.**— ( हर्ष पावून मनांत म्हणतो ) ह्रदया, धन्य आहेस, धन्य आहेस ! ( मोठ्यानें म्हणतो ) तर पिंगल म्हणाला कीं ही खोटी आहे.

**मारीच.**— ( मनांत म्हणतो ) तर मग तो खराच पिंगल होता. हायहाय ! करालास लक्ष्मणानें मारिलेंच यांत संशय नाहीं ! हर हर ! काय करावें आतां ! ( मोठ्यानें म्हणतो ) पिंगल कोठें गेला तर ?

**राम.**— ( मनांत म्हणतो ) खचित याचें भाषण त्याच्याशीं मिळत नाहीं ! हें कसें झालें ? ( मोठ्यानें म्हणतो ) तूं आलास म्हणून तुलाच तो सामोरा गेला. मग पहिल्याप्रमाणें त्याला वनगजानें धरिलें असलें तर कोण जाणे !

**मारीच.**— ( हर्ष पावून मनांत म्हणतो ) तो पिंगलाचे रूपानें करालच होता ! मी वेडा उगाच भ्रांतीमध्यें पडलों ! अरेरे ! (मोठ्यानें म्हणतो ) ह्या माकंदवनांत हत्ती येऊन धरील असें घडणार नाहीं. ( असें ह्मणून ध्यान करितो. )

**काश्यप.**— ( कांहींसें दूर पुढें पाहून ) येथेंही पल्लवाचे शय्येवर जानकी आहे, तिचे बरोबर दोघी तिघी सख्या मात्र आहेत, आणि तिला कामज्वर झाला आहे त्यावर शीतोपचार करीत आहेत असें दिसतें. अहो पण हें कसें होईल?जानकी तर येथून-दोन कोसांवर कौशिकाश्रमांत आहे. यावरून ही रूपानें जानकी सारिखीच, परंतु कोणी दुसरी कन्या आहे. ( नंतर मागचे बाजूस पाहून भयानें ) हायहाय ! हा येथें मोठा खाडा दिसतो; त्या खाड्यांत कोरडे खडखडीत लांकडाचे धगधगित विंगळ भरले आहेत, आणि त्याचे आड एक शिला लाविली आहे ! यावरून,

हव्यवाहः ! तन्मन्ये विरहज्वरावेगमसहमानया, तया तरुण्याप्रवेष्टुमयमनलःसंभृतइति. भवतु. विटपांतरित एव पश्यामि यावत्पिंगलसन्निधानंरामदर्शनंवा. ( इतिविलोकयन् स्थितः ) ( ततः प्रविशति पिंगलः )

पिंगलः.— क्वपुनरिदानींमृगयाप्रवृत्तं वयस्यं पश्यामि ? ( सर्वतो निर्वर्ण्य सहर्षं )

शरदलितवराहव्याघ्रमल्लूकशल्य,

प्रमुखमृगशतासृग्बिंदुसंदर्शनेन,

सखिगमनपथेनद्रागरण्याद्दरण्यं,

प्रविशति मयि दिष्ट्या दृश्यते काश्यपीयं. ५३

तदत्र वयस्येनापि भवितव्यम्. नहिवसंताद्दृते मंदानिलश्चलति. दिष्ट्या खलुपार्श्वतः काश्यपस्य.

आबद्धतूणमंसेकरकमलद्वंद्वधृतधनुर्बाणं

पश्यामि रसालतले रामंदूर्वादलश्यामं. ५४

( इत्युपसर्पति )

मारीचः— ( दृष्ट्वास्वगतं ) पिंगलवेषः करालोयमभिवर्तते. ( प्रकाशं ) वयस्य, पिंगलोयं संप्राप्तः.

रामः— ( दृष्ट्वा ) सखेपिंगल, भवंतंसंभावितार्थवादिन मेवजानामि.

पिंग०— ( स्वगतं ) किमिदमकांडे मामेवमालपति ! ( प्रकाशं ) वयस्य, नगूह्यते मया मोघवचनार्थः

विरहज्वर सोसत नाहीं ह्मणून त्या तरुणीने अग्निकाष्ठें भक्षण करण्या करितां हा अग्नि पेटविला आहे असें वाटतें. असो, आ-तां **पिंगल** किंवा **राम** यांची भेट होई तोंपर्यंत या झाडीचे आड उभें राहूनच काय आहे तें पहावें. ( असें बोलून पहात उभा राहतो ).

( तदनंतर **पिंगल** येतो ).

**पिंगल.**— सखा **रामभद्र** मृगयेला गेला त्याला आतां कोठें तरी पहावें ? ( चोहोंकडे निरखून पाहून हर्षानें ह्म० ).

**श्लोक.**

शरदलितें[1] मृगाचे रक्तबिंदूवरोनी
इकडुनि मग गेला मित्र ऐसें ह्मणूनी
वनिं वनिं फिरतों मी दैवयोगेंचि आतां
मज दिसत असे हा **काश्यप** स्पष्ट येतां. ८१

तर येथें आपला वयस्यही असेल, वसंतावांचून मंदवायु वाहत नाहींच ! अरे, दैव थोर कीं तो पहा **काश्यपा**च्याच जवळ,

**आर्या.**

पाठीं भाता, हातीं ज्याचे शोभे धनुष्यबाण असा,
तो हा रसालमूळीं विराजतो **राम** नीळवर्ण कसा. ८२

( असें म्हणून जवळ जातो ).

**मारीच.**— ( पाहून मनांत ह्म० ) तो **पिंगल**वेषधारी **कराल** येत आहे. ( मोठ्यानें म्ह० ) वयस्या, हा **पिंगल** आला बरें !

**राम.**— ( पाहून म्ह० ) सख्या **पिंगला**, तूं खरें बोलणारा आहेस असें मी समजतों.

**पिंगल**— ( मनांत म्ह० ) हें काय बरें ? हा मजशीं असें असंगत काय बोलतो ! ( मोठ्यानें म्ह० ) वयस्या, तुझ्या बोलण्याचा अर्थ मला कळत नाहीं.

---

टीप.—१ बाणांनीं मारलेल्या.

**मारी०**— ( पिंगलमालिंग्य जनांतिकं ) दिष्ट्या कराल जीवंतंत्वा पश्यामि. यदसमयं काश्यपस्यापिंगलवेषग्रहणं तव पुनरमोघलक्ष्मणबाणगोचरतामाशंक्य दुर्निवारशोकावेगदूषितंमेत्हृदयं.

**पिंग०**— ( विहस्यस्व० ) कथं काश्यपेनापि ततोप्यसंबद्धमालपितुमुपक्रांतं ! ( प्रकाशं ) कथय पुनरपियदुक्तंभवता.

**मारी०**—(समयस्तिष्ठति)

**रामः**— सखे पिंगल, वनितामिमामधिकृत्य ब्रवीमि ( इति भ्रूसंज्ञया दर्शयति )

**पिंगलः**— ( दृष्ट्वास्वगतं ) कथमियमुत्कंठिता, पल्लवतल्पशायिनी, सखीजनसंमान्यमाना, विटपांतरेदृश्यते. ततएवेयमीदृशावस्थेति मदुक्तमनुबोधितोऽस्मि वयस्येन. ( प्रकाशं सविमर्शं ) अहो कथमेतत् ! साखल्वध्यर्द्धयोजने कौशिकाश्रममधिवसति ! ( सविस्मयमवलोकयन्स्थितः. )

**मारी०**—(स्वगतं ) नायंकरालः, अपितुपरमार्थपिंगलः. हंत, हंत !

वत्संप्रतिकरालंतंमया शंकितचेतसा
यत्तदाशंकितं पापं, तस्यजातोविनिश्चयः. ५५

**मारीच.**— ( **पिंगल**ला आलिंगून त्याच्या कानांत म्हणतो ) **कराला**, दैव थोर म्हणून बाबा तूं मला जीवंत भेटलास बरें ! कां कीं **काश्यपानें**च **पिंगला**चा वेष घेतला, आणि **ल**क्ष्मणाचे अमोघ बाणानें तूं मेला गेलास, अशा मला नाना शंका उत्पन्न होऊन जो कां मला दुर्निवार शोक झाला, त्याच्या योगें माझें मन अगदीं व्यग्र होऊन गेलें होतें.

**पिंगल.**— ( हांसून मनांत म्ह० ) वाहवा ! **काश्यप** तर **रामभद्रा** पेक्षांही असंगत बोलतो ! ( मोठ्यानें म्ह० ) गड्या, काय बोललास तें पुनः बोल बरें ?

**मारीच.**— ( भय पावून उगाच उभा राहतो ).

**राम.**— ( **पिंगला**प्रत ) गड्या **पिंगला**, ह्या स्त्रीला उद्देशून मी बोलिलों. ( असें ह्मणून भ्रूसंज्ञेनें दाखवितो ).

**पिंगल.**— ( पाहून मनांत म्ह० ) ही कोणी एक स्त्री उत्कंठित होऊन ह्या जाळीचे आंत पल्लवशय्येवर निजली आहे, आणि तिच्या सख्या तिला उपचार करीत आहेत असें दिसतें; तेव्हां यावरून अशीच **जान**कीची अवस्था झाली आहे, असें मी ह्याला सांगितलें होतें त्याचीच हा वयस्य मला आठवण देत आहे. (विचार करून मोठ्यानें म्हणतो ) अरे पण हें कसें होईल ? ती तर येथून दोन कोसांवर **कौशि**काश्रमांत आहे. ( आश्चर्यानें उगाच पाहत उभा राहतो ).

**मारीच.**— ( मनांत म्ह० ) हा **कराल** नव्हे, तर वास्तविकच **पिंगल** आहे कीं ! हायहाय !

## श्लोक.

जें कां **कराल** मेला हें व्यग्रें म्या शंकिलें मनीं,
तेंचि आतां खरें ऐसें प्रत्यया येतसे जनीं. ८३

अथवा पिंगलवेषः क्वचिदन्विष्य सगतःस्यात्. भवतु. नैषमेशो-
कावसरः. समापितव्या मया रामकथा. (प्रकाशं) पश्य, सखे,
रुदतीमिमां सुंदरीं.

**रामः**— पश्याम्येव.

मकरंदकणाद्दृगब्जयो, मुखचंद्रामृतबिंदवो यथा,
मम हिद्रवयंति मानसं मदिराक्ष्या बतबाष्पसीकराः. ५६

**मारी॰**— ( ध्यानं नाटयति )

**एका.**—

उंप्पलिणीए विअसे एदाएणं सुहं होदि
जइपरिरंभइस्सदि राआचंदोव्वरामभद्दोसो ५७

**रामः**

रोमांचयति ममांगं वचनमिदं चारुजानकीसख्याः,
कुड्मलयतिच कदंबं कादंबिन्याः पयोभिनवं.५५

**पिंगलः** ( सविमर्शं स्वगतं ) नायंकाश्यपः; तदेवंतर्कये.

मायया जानकीं व्यंजन्मायावी कोपि राक्षसः
अमर्षं ताटकाद्रोहादस्मिन्किंचिच्चिकीर्षति. ५८

ततएवायं किंचिदसंबद्धं वदन्सपृष्टोपिनकेवलंप्रतिवदति; अपि
तुसमयं तरलतारकमवलोकयति

अथवा पिंगलाच्या वेषानें येथें माझा शोध करून तो कोठें गेला असावा. असो, हा आतां शोक करीत बसण्याचा समय नाहीं. रामाची कथाच समाप्त केली पाहिजे. ( मोठ्यानें म्ह० ) पहा सख्या, ही तरुणी कशी रुदन करीत आहे ती !

**राम.**-- होय पाहतोंच आहें.

## आर्या.

दृगब्जमकरंदचि हा, वदनेंदूचे सुधाकणच कीं हे,
हरणाक्षीच्या अश्रुंसि पाहुनि मद्धृदय फार द्रवताहे. ८४

**मारीच.**— ( ध्यान करितो ).

**एक सखी.**—

## आर्या

उत्पलिनीपरि हिजला सुख होइल वाटतें मला मोठें,
स्वकरांहीं हिजला जरि चंद्रापरि **राम**राज कीं भेटे. ८५

**राम.**—

## आर्या.

ऐकुनि सखी वचोमृत हें पुलकित मच्छरीर होय कसें,
नूतन मेघजलानें कुड्मलयुत[1] ते कदंबवृक्ष[2] जसे. ८६

**पिंगल.**— ( विचार करून मनांत म्हणतो ) हा **काश्यप** नव्हे, तर असा तर्क वाटतो कीं,

## श्लोक.

ऐकोनि झाला वध **ताटिके**चा नक्तंचरा कोप अलाचि साचा,
दावोनि तो मायिक **जान**कीला, इच्छीतसे यामति मारण्याला. ८७

असें आहे म्हणूनच हा कांहीं असंबद्ध बोलिला. व पुनः बोल असें मी म्हटलें असतां, हा प्रत्युत्तर देत नाहीं, इतकेंच केवळ नव्हे, याची दृष्टिही अवधाकानें चंचल होऊन हा घाबरल्या सारखा दिसत

---

टीप.—१ कळ्या आलेला. २ कळंब.

अतएवंब्रवीमि, ( प्रकाशं ) वयस्य रामभद्र, नेयं जानकी; नचा-
यंपरिजनः; नह्यस्मिन्नरण्येतत्संभवः; अपितुमायेतिनःप्रतिभाति.

**रामः**— ( स्वगतं ) कथमस्यपूर्वापरविरुद्धंवचनं ! जानकीतियःप्रति-
ज्ञाय तद्वृत्तांतवेदिनं काश्यपमानेतुंगतः, कथंवा सपरिवारा जानकी
माया स्यात् ? ( प्रकाशं ) अपिश्रुतं पिंगलवचनं काश्यपेन ?

**मारीचः**. ( रामंप्रति जनांतिकं )

मन्येहं पिंगलो भूत्वा मायावी कोपिराक्षसः
ताटका द्रोहिणंहंतुं त्वामन्यत्रनिनीषति. ५९

**रामः**— युक्तमाह भवान्. पिंगलः पुनरिहागतश्चेदयंकिंप्रतिपत्स्यते ?

**मारी०**— यत्ताटकया सुबाहुनाच प्रतिपन्नं.

**रामः** एवमेतत्.

**पिंगलः** ( स्वगतं ) काश्यपइतिमत्वाऽस्यवचनं शृणोतिवयस्यः. ( प्र-
काशं ) मामंतरेण किमस्यवचनमाकर्ण्यते ?

**रामः** ( सभ्रूभंगं ) किंराक्षसो पिवचनेष्वभ्यंतरी क्रियते ?

आहे. म्हणून मी आतां असें म्हणतों. ( मोठ्यानें म्हणतो ) सख्या **रामभद्रा**, ही स्त्री दिसते ती **जानकी** नव्हे, व ह्या तिच्या सख्या नव्हत, कां कीं या अरण्यांत त्यांच्या येण्याचा संभवच नाहीं, तर ही सर्व माया आहे असें मला वाटतें.

**राम.**— ( मनांत म्ह० ) काय हो याचें हें असें विरुद्ध बोलणें ? मघां काय बोलला आणि आतां काय बोलतो ? **जान**कीच हो अशी प्रतिज्ञा गाऊन तें वृत्त **काश्यपा**ला ठाऊक आहे म्हणून त्याला आणायास गेला. आणि आतां ही **जान**की नव्हे तर माया आहे असें म्हणतो. दुसरें, परिवारासुद्धां **जान**की आहे ही सर्वच माया कसी होईल ? ( मोठ्यानें म्हणतो ) कां **काश्यपा** ? **पिंगल** काय म्हणतो हें ऐकिलें ना ?

**मारीच.**— ( **रामा**च्या कानांत म्ह० )

### श्लोक.

तूं मारिलें जाणुनि **ताटि**केला, निशाट¹ हा **पिंगलरूप** झाला,
कोठें तरी नेउनियां तुला हा इच्छी वधूं, वाटतसे मला, हा ! ८८

**राम.**— ( **मारी**चाप्रत म्ह० ) तूं बरोबर बोलिलास **काश्यपा**, पण जर खरा **पिंगल** पुनः परत येथें आला तर मग याला काय बरें लाभ होईल ?

**मारीच**— जो **ताटिके**ला व **सुबाहू**ला झाला तोच.

**राम.**— हेंच खरें, यांत संशय नाहीं.

**पिंगल.**— ( मनांत म्ह० ) हा खराच **काश्यप** आहे असें मानून **रामचंद्र** त्याचें बोलणें ऐकतो. ( मोठ्यानें म्ह० ) माझ्या वांचून तूं याचें बोलणें कसें ऐकतोस ?

**राम.**— ( भोंवया चढवून म्ह० ) राक्षसाला देखील आम्ही आपले बोलण्यांत घ्यावें काय ?

---

टीप.— १ राक्षस.

**पिंगलः**— ( सभयशोकमात्मगतं ) नकेवलमन्यइतिराक्षसइत्यपि मामसौमन्यते ! हाहतोस्मि ! कर्णोपजापिनाकाश्यपरूपेण निशाचरेण ! ( प्रकाशं ) वयस्य, विमृश्यतामयंजनः ( इति विवर्णमुखस्तिष्ठति ).

**मारीचः**— ( ध्यानंनाटयति )

**सीता.**— दुल्लहं खुएदं मंदभाग्गिणीए.

**रामः**—

अयि ममपरिरंभोदुर्लभः किंभवत्याः
कनकनलिनकोशस्निग्धवक्षोरुहायाः
किमपि कुवलयश्रीगर्व सर्वंकषस्ते
मयि मलयजनस्रे पातितश्चेत्कटाक्षः १६०

**मारी०**— ( स्वगतं ) स्थिरोयमस्या मय्याभिनिवेशः. तत्सुकरमेव चिकीर्षितं ! ( प्रकाशं ) कर्त्तव्यो जानकीमनोरथो वयस्येन.

**रामः**—

याद्दष्टाविपिनेवधू. ( साश्चर्यं ) रियमभून्मत्प्रेयसी जानकी !
याचास्या मदनज्वरार्ति (सहर्षानुरागं) रियमप्यस्मन्निमित्ताजनि !
यस्तस्याः प्रशमः (सरोमांचमभिनयन्) समेतनुपरीरंभेणसाध्यःश्रुतः.
सत्यंव्येवमिदंविधातुमधुना नूढेतिभीतंमनः. ६१

**मारी०**— ( ध्यानं नाटयति )

**पिंगल**—(भयानें व शोकानें मनांत म्ह०) हा कोणी इतर आहे इतकेंच राम मला समजती असें नव्हे, तर आणखी राक्षस आहे असें समजतो ! अरेरे ! चहाड्या सांगून काश्यपरूपी राक्षसानें माझा घात केला ! हरहर ! काय करावें ? (मोठ्यानें म्ह०) वयस्या, मी कोण आहें, काय म्हणतों, याचा नीट पक्का विचार कर. ( असें म्हणून खिन्नवदन होऊन उभा राहतो ).

**मारीच**— ( ध्यान करितो ).

**मायासी०**— ( एके सखीचे बोलण्यावर म्ह० ) हें तर मज मंदभागिनीला दुर्लभ आहे !

**राम.**—

## श्लोक.

माझागे परिरंभ[१] दुर्लभ तुला आहे कसा जानकी,
ज्या तूझे कुच कांचनाब्जकलिकासुस्निग्ध[२] आहेत कीं,
जो नीलोत्पलगर्वहारक असा नेत्रांत तेणें जरी,
पाहाशी मजला सुचंदनरसें तपास वो सुंदरी. ८९

**मारीच**—( मनांत म्ह० ) हिच्या ठिकाणीं ह्याचा अभिनिवेश पक्का स्थिर झाला ! आतां आपलें इच्छित जें आहे तें करायास कठीण नाहीं. (मोठ्यानें म्ह०) वयस्या, त्वां जानकीचा हेतू पूर्ण करावा हें योग्य आहे.

**राम.**—

## श्लोक.

दृष्टा जी विपिनीं वधू ( आश्चर्यानें) अजि खरी झालीच ती जानकी,
तीनें जी मदन व्यथा करितसे ( हर्षानें व प्रीतीनें) ती मन्निमित्तेंच कीं,
शांतीला उपचार एकचि तिच्या(अंगरोमांचित करून) आलिंगनाचा असे
ऊढा[३] ही न म्हणूनि त्यास[४] करण्या मी मानसीं भीतसें . ९०

टीप–१ आलिंगन.२सुवर्ण कमलाचे कळ्या प्रमाणें स्निग्ध.३ विवाहित. ४ आलिंगनास.

**अपरा०—** कहंदुल्लहं ? कोसिअमहेसी तुह वल्लहंतुचरिदं पावइस्सदि.

**रामः** श्रुतएवायमर्थः पिंगलमुखात्.

**पिंगलः.—** अहोवृत्तानुकारिता मायाविलासस्य !

**मारी०—** श्रुतंकिमस्यवचनं वयस्येन ?

**रामः—** काश्यप, नश्रोतव्यमेतस्यवचनं.

**काश्य०—** सत्यजानकीपरिजनवदेव परस्परं व्याहरति. ममत्हृद यंतु किंचिदपि नविश्वसिति.

**मारी०—** ( ध्यानं नाटयति )

**एका** हला, होदुएव्वं. दसग्गीवोणं पत्थेदित्ति सेहिअए आंतको.

**काश्य०—** अनृत मिदमेकं, यन्नाद्यापिजनकराजं दशग्रीवः प्रार्थयति.

**रामः—** दशग्रीवः प्रार्थयतीति विप्रतिषिद्धमेतत्.

**पिंग०—** ( स्वगतं ) नैतद्युज्यते. मयातुवयस्यस्यनेदंवक्तुं शक्यं, यदस्याप्यहंराक्षसः संवृत्तः. ( प्रकाशं ) वयस्य, विमृश्यतामयंजनः.

**रामः—** ( अश्रुतिमभिनीय दशग्रीव इत्यादिपुनः पठति. )

**मारी०—** कोदोषः ? स्वतंत्रस्यापि कस्यचित्कस्यचिदस्तिपारतंत्र्यं.

**मारीच**— ( ध्यान करितो. )

**दुसरी स०**—( मायासीतेप्रत म्ह० ) दुर्लभ कां म्हणतेस ? कौशिक महर्षी हे तुझा वल्लभ तुला आणून देतील बरें; यांत संशय नाहीं.

**राम**.— ही गोष्ट पिंगलमुखापासून मघांच ऐकिली आहे.

**पिंगल**.— अहो काय आश्चर्य ! झालेली गोष्ट थेट खऱ्याप्रमाणें संपादून दाखविण्याविषयीं मायेच्या कौशल्याची पराकाष्ठा आहे.

**मारीच**—(रामाप्रत म्ह० ) हा काय म्हणतो हें मित्रानें ऐकिलें ना ?

**राम**.—अरे काश्यपा, याचें बोलणें आपण ऐकूंच नये म्हणजे झालें.

**काश्यप**— ( झाडाच्या आडून ती माया पाहून म्ह० ) जानकीच्या वास्तविक सख्यांप्रमाणेंच ह्या परस्पर बोलत आहेत. पण मला तर यांतून कांहींच खरें वाटत नाहीं !

**मारीच**.— ( ध्यान करितो )·

**एक स०**— अगे तूं म्हणतेस तें खरें. पण दशग्रीव हिला मागतो म्हणून मोठी चिंता उत्पन्न झाली आहे !

**काश्यप**.— ही एक खोटी गोष्ट ! कां कीं अजून दशग्रीवानें जनकापाशीं मागणें केलें नाहीं.

**राम**— दशग्रीव आणि मागतो हेंच विरुद्ध आहे.

**पिंगल**.— ( मनांत म्हणतो, ) ही गोष्ट तर मुळीं संभवतच नाहीं; परंतु काय करावें ? मीही ह्याच्या दृष्टीनें राक्षसच आहें. तेव्हां हें मला बोलतां येत नाहीं. ( मोठ्यानें म्ह० ) मित्रा, हा मी कोण आहें काय म्हणतो ह्याचा नीट विचार कर.

**राम**.—( न ऐकिलेंसें करून ) दशग्रीव आणि मागतो हेंच विरुद्ध आहे, ( हेंच वाक्य पुनः म्हणतो ).

**मारीच**.— विरुद्ध कशानें ? कोणी स्वतंत्र असला तरीं त्याला एखाद्या वेळेस परतंत्रही व्हावें लागतें, त्यांत काय बाध आहे ?

**सीता॰**— ( सास्रं ) [१२] कहं दसग्गीवो मंपत्थेदि. अहंदावतादेणदिण्णा पि विसं खादिस्सं, जलणंवा पविसम्हि.

**राम॰**-- ( सानंदानुशयं )

मामेवान्वेतिभावोस्याः, परंनान्वेतिकंचन,
तदियंत्वद्दयप्रेम्णा क्रीणीते तरुणीमम. ६२

( इतिविलोकयन्स्थितः )

**काश्य॰**— ( करालं विलोक्य सहर्षं ) एषपिंगलो मामभिवर्त्तते. आर्य, कथय, किमासादितो मृगयाप्रवृत्तो रामभद्रः ?

**करा॰**— नकेवलमयमासादितस्त्वदुपदिष्टपथेनमायावनाद्दनांतरमानीतः; परंतुक्षणमात्रमनवेक्ष्यभवंतंकौशिकप्रहितलक्ष्मणबाणलक्षीकृतोसीति विशंकमानस्य मममानसं कीदृग्भूदिति नजाने.

**काश्य॰**— ( विहस्यस्व॰ ) कोयं पिंगलरूपावलंबी लक्ष्मणविपक्षजनेष्वंतर्भवन्मामपि स्वजनंमन्यते ! योहिमद्रूपमवलंब्यतिष्ठति भवतु ज्ञास्यामि. ( प्रकाशं ) क्वपुनरिदानीं रामभद्रः ?

**करा॰** ( स्वगतं ) नूनमनेनरामगतमनोरथतया नाश्वासितोस्मि ( प्रकाशं ) सीतां पश्यन्नस्मिन्नसातले निवसति.

**मायासी**०—( डोळ्यांस आसवें आणून) अगे बाई! दुशग्रीव मला मागतो काय? बाबानें मला त्याजकारणें दिलें तर मी विष खाईन अथवा अग्नींत उडी टाकीन! राहणार नाहीं!

**राम**.—( आनंदानें आणि प्रेमानें म्ह०).

**आर्या.**

भाव हिचा मजवरिची, अन्या न शिवे कदापिहि नरास;
मद्दृदया विकतचि घे मोल्या दे प्रीतिची करुनि रास ९१

( असें म्हणून पाहत उभा राहतो. )

**काश्यप**.—(करालास पाहून हर्षानें म्ह०) बरें झालें कीं हा **पिंगल** मजकडे येत आहे। अरे **पिंगला**, **राम**भद्र मृगयेला गेला त्याला शोधून काढिलें कीं नाहीं?

**कराल**.—शोधून काढिलें इतकेंच नाहीं, तर त्वां सांगितले रीतीनें मी त्याला एके वनांतून दुसरे वनांत, दुसरे वनांतून तिसरे वनांत असें चाळवीत चाळवीत येथें आणिलें आहे. परंतु बाबा अम्मळशी तुझी वाट पाहिली तरी तूं दिसेनास, म्हणून **कौशि**काच्या सांगीवरून लक्ष्मणानें तुला मारून टाकिलें, अशी शंका उत्पन्न होऊन माझ्या मनाची काय जी अवस्था झाली ती मला सांगतां देखील येत नाहीं.

**काश्यप**.—( हांसून मनांत म्हणतो ) अरे! हा **पिंगल**वेषधारी असा लक्ष्मणाच्या शत्रूंपैकीं एक आहे, आणि याच्या सोबत्यानें माझें रूप घेतलें आहे. तोच सोबती हा असें हा मला समजतो. बरें असो, समजेल काय असेल तें. (मोठ्यानें म्हणतो) अरे आतां **राम**भद्र कोठें आहे?

**कराल**.— (मनांत म्ह० ) याचें चित्त अगदीं **राम**ासक्त झाल्यामुळें ह्यानें मला कुशल विचारून आश्वासन देखील दिलें नाहीं! (मोठ्यानें म्हणतो ) तो त्या आंब्याच्या झाडाखालीं **सीते**ची मौज पाहत बसला आहे.

**काश्यपः**—किंजानासि सीतैवेयमिति ?

**करालः**- ( विहस्य ) तयाप्यवहरन्नपिजानामितिवेयं मायेति ?

शंबरादिद्विजयिनो विद्युज्जिव्हान्मयादपि
या विशिष्टैव खल्वास्ते ताटकातनये त्वयि ६३

**काश्य०**— ( सोद्वेगं स्व० ) मारीचानुचरोयंभवेत् ! मारीचश्चकचित्
वस्याय मद्रूपावलंबीमायांप्रयुंक्ते, इति विदितमिदानीं.

हाकिंकरोमि मामेष हनिष्यत्येव राक्षसः,
शार्दूलस्यांतिकं प्राप्तो जीविष्यति कथं मृगः ६४

( इतिमनसा विमृशन्मूर्च्छति. )

**करालः**- समाश्वसिहि, समाश्वसिहि. कृतमाशोच्यजननींताटकां.
कृतंपराक्रममनुचिंत्यराजपुत्रस्य ( इत्याश्वासयति. )

**काश्यपः**- ( आश्वस्योत्थायसांजलिबंधं )

नाहंभवामि मारीचो; नमस्तेस्तुनिशाचर.
कृपां कुरु मयि, स्वामिन्, कीर्तिमाप्नुहि शाश्वतीं. ६५

**करालः**—कथं विप्रवटुरेवायं ! मयातु जाल्मेन मारीचइतिमत्वा तत्त-
द्यात्द्दतं. ( सशोकावेगं )

**काश्यप.**— काय ही सीताच आहे असें तुला वाटतें ना ?

**कराल.**—( हांसून म्ह० ) तोंडानें सीता असें म्हणतों खरा, पण ही सर्व तुझी माया आहे हें मी जाणतों.

### श्लोक.

इंद्रजिच्छंबर, तसा विद्युज्जिव्ह, मयासुर,
त्यांहून ताटिकापुत्रा माया तूझीच दुस्तर. ९२

**काश्य०**-(उद्विग्न होऊन मनांत म्ह०)अरे हा कोणी तरी मारीचाचाच सेवक आहे. आणि मारीच हा माझें रूप घेऊन कोठेंतरी माया-प्रयोग करीत आहे असें आतां समजलें !

### श्लोक.

अरे काय करूं आतां राम राक्षस मारितो,
व्याघ्राच्या जवळी आला मृगकेसेनि वांचतो ! ९३

( असें मनांत चिंतून मूर्छित होतो. )

**कराल.**--सावध हो सावधहो ! जननी ताटिका हिचा शोक करणें व त्या राजपुत्राचा पराक्रम मनांत आणून दुःख करणें हें आतां पुरे कर ! शोक व दुःख करून बाबा आतां कांहीं उपयोग नाहीं,

( असें म्हणून सावध करितो. )

**काश्यप.**—( सावध होतो आणि उभा राहून हात जोडून म्हणतो ).

### आर्या.

राक्षसराय, तुम्हांला नमितों बहु, मी नव्हेचि मारीच.
रक्षावें या दीना, पावावी शाश्वतिक सुकीर्तीच. ९४

**कराल.**—अरेरे ! हा तर ब्राम्हणाचा पोरगा आहे ! मी पहा कसा मूर्ख, कीं यालाच मारीच असें समजून सर्व गुप्त गोष्टी मी त्याच्या जवळ बोलिलों ! ( शोकाच्या अवेशानें म्हणतो ).

---

टीप-१ निरंतर राहणारी.

तमार्य प्रतिमारीचं मया तरलचेतसा
यत्तदाशंकितं पापं; तस्यजातो विनिश्चयः. ६७

हामारीच, विविधमायासंप्रदायगुरो, ( इत्यर्धोक्ते ) किमिदानी मनेन प्रलापेन ? ( सकोपावलेपं ) अरेरे सुमित्रागर्भविक्षेष, क्षत्रियबटो, ( इत्युक्त्वासविमर्शं ) हाकथमस्मिन् क्रमते ममसंरंभः !

रामइव लक्ष्मणोपि प्रकृष्टसारो नशक्यतेद्रष्टुं
अस्यतु वधेन कुर्यां मारीचवधप्रतीकारं. ६८

( इतिकाश्यपस्य कंठं भङ्क्तुमारमते. )

**काश्य॰**—( मोचयित्वारामाधिष्ठितरसालमभिद्रवति. )

**करा॰**—( तमनुद्रवति. )

**काश्य॰**—

मामेषराक्षसो हंतुं मारीचानुचरो बली
अनुद्रवति वेगेन; पाहिमां, राम, पाहिमां. ६९

**रामः** कथं काश्यपस्येवपरिदेवितं ! सखे, नभेतव्यं, नभेतव्यं. ( इत्युपसर्पति )

**मारीचः**— वयस्य पश्यमां काश्यपं पार्श्वतः स्थितम्. कस्यपरिदेवितं जानीहि.

**करा॰**- ( काश्यपमतिक्रम्य द्रवन् "मामेषराक्षसोहंतु" मित्यादिपठित्वा राममालिंगति ).

**रामः**- ( मारीचंप्रति ) सखे, पिंगलोयमागतः.

## आर्या.

मेला **मारीच** असें पूर्वीं म्या कल्पिलेंच जें होतें
व्यग्रत्वें करुनि, परी झालें परमार्थ[1] कीं कसें हो, तें। ९५

हा **मारीचा**, हा विविधमायासंप्रदायगुरो, ( इतकें अर्धेंच वाक्य बोलून ) आतां ही व्यर्थ बडबड करून काय होतें ? ( क्रोधानें व गर्वानें म्ह० ) रे **सुमित्रा**गर्भदाहका, रे क्षत्रियाच्या पोरट्या, ( इतकें बोलून विचार करून म्हणतो)अरे त्याचें माझ्यानें काय होणार ?

## श्लोक.

**रामा**परी **लक्ष्मण** शूर आहे; त्याचें मला दर्शनही न साहे;
या **काश्यपा**लाच अतां वधावें, **मारीच** वैरा उगवूनि घ्यावें. ९६

( असें म्हणून **काश्यपा**च्या नरडीस बिलगतो ).

**काश्यप.**— ( त्याच्या हातून निसटून, आंब्याच्या झाडाखालीं **राम** बसला होता त्याजवळ धांवत जातो ).

**कराल.**— ( त्याच्या पाठीस लागतो ).

**काश्यप**

## आर्या.

**मारीच**सेवक बळी राक्षस हा मारण्यास मज आतां
धांवत येतो, रामा, रक्षीं, मज तुजविणें नसे त्राता. ९७

**राम.**— काय ! **काश्यपा** सारिखें ओरडणें भासतें, सख्या भिऊं नको, रे भिऊं नको ! ( असें ह्मणून त्याच्या जवळ जातो ).

**मारीच**— मित्रा, जो **काश्यप** तो मी तर तुम्हाजवळ उभा आहे, मग हें ओरडणें कोणाचें असेल तें पहा !

**कराल.**— ( **काश्यपा**ला मागें टाकून '**मारीच** सेवकबळी' ही आर्या म्हणत पळत जाऊन **रामा**च्या गळ्यांत मिठी मारितो).

**राम.**— ( **मारी**चाप्रत म्ह०) गड्या, हा **पिंगल** आला !

---

टीप— १ सत्य.

**मारी०**— ( सहर्षं स्वगतं ) अयमेवकरालः काश्यपेनचायमनुगम्यते.

( प्रकाशं ) वयस्य, पश्य मद्रूपधारिणं मारीचानुचरं.

**काश्यपः**- सखे रामभद्र, मद्रूपधारीमारीचएवायं तवपार्श्वे स्थितः सीतेतिमायया भवंतं व्यामोहयति.

**करा०**-( सहर्षं स्वगतं ) दिष्ट्याजीवतिकाश्यपरूपधारीमारीचः (प्रकाशं ) मद्रूपधारीकोयंविवर्णरूपस्तिष्ठति ?

**मारी०**- प्रागेवायं निश्चितोवयस्येन राक्षसइति.

**पिंगलः**- ( काश्यपसमीपंगत्वा ) सखे काश्यप, कराल इति ! मामयं त्वद्रूपधारी समाह्वतवानुपह्वरे मारीचः. अतोयंमद्रूपावलंबी करालोभवति, योराममालिंगितवान्.

**रामः** ( स्वगतं ) कथमयं काश्यपं मारीचइतिवदति ! सपरिवारां जानकींमायेतिच ! अयं पिंगलं कराल इति ! आश्चर्यं आश्चर्यं !

( प्रकाशं )

द्वावेतौ पिंगलावत्र, द्वावेतौ काश्यपाविति.
द्वावेतेषु मम स्निग्धौ, द्वावेतेषु निशाचरौ. ७०

**कराल मारीचौ**- ( पिंगलकाश्यपौप्रति )

एतौ निशाचरौ हंतुं त्वर्यतां, त्वर्यतां, सखे.

**रामः**- ( सक्रोधं शरासने बाणमारोपयति. )

**का०**- सखे, मारीचमायेयं, कर्तव्यं विमृशन्कुरु. ७१

**मारीच**— ( हर्ष पावून मनांत म्ह० ) होयरे होय ! हाच **कराल** खरा. आणि ह्याच्या मागून येत आहे तो **काश्यप** होय ! (मोठ्यानें म्ह० ) पहा हा **मारीचाचा** सेवक माझें रूप घेऊन आला आहे तो !

**काश्यप**— सख्या **रामभद्रा**, तुजपाशीं जो उभा आहे, तोच मद्रूपधारी **मारीच** होय बरें ! हाच ही मायेची **सीता** दाखवून तुला मोहांत पाडीत आहे !

**कराल**— ( हर्षानें मनांत म्ह० ) दैव थोर कीं **काश्यपा**चावेषधारी **मारीच** जिवंत आहे ! ( मोठ्यानें म्ह० ) हा माझें रूप घेऊन खिन्नवदन होऊन कोण बरें उभा आहे ?

**मारीच**— हा राक्षस ह्मणून मित्रानें मघांच निर्णय केला आहे.

**पिंगल**— ( **काश्यपा**चे जवळ जाऊन ) सख्या **काश्यपा**, हा त्वद्रूपधारी **मारीच** यानें मला **कराल** असें समजून एकांतीं गोष्टी केल्या, यावरून हा माझें रूप धारण करणारा **कराल** होय. त्यानेंच **रामा**च्या गळ्यांत मिठी घातली.

**राम**— ( मनांत म्ह० ) हा तर **काश्यपाला मारीच** व **पिंगल** आणि **जानकी** व तिच्या सख्या दिसतात, ही सर्व माया आहे असें म्हणतो. हें मोठें आश्चर्य आहे ! ( मोठ्यानें म्ह० ).

**श्लोक.**

यांत दोघे **पिंगल** हे, दोघे **काश्यप** हे बरे,
त्यांत दोघे मित्र माझे, दोघे राक्षसही खरे. ९८

**कराल** व **मारीच**— ( **पिंगल** व **काश्यप** यांप्रत म्ह० ).

**श्लोक.** ( अर्धा ).

या राक्षसांते, सखया, टाक सत्वर मारुनी.

**राम**.— ( क्रोधानें धनुष्यावर बाण चढवितो ).

**काश्यप**— ( राहिलेला अर्धा **श्लोक** म्ह० ).

सख्या **मारी**चमाया ही, कर कार्या विचारुनि. ९९

रामः - ( स्वगतं ) कथमेतत्

एतौ ममप्रियसखाविति तद्गिरैव
जानामि, यौ त्वद्धृदयमीर्ष्यति किंचिदाभ्यां.
यौ राक्षसाविति शरव्यतया भिमन्ये,
दृष्टिस्तयोः पुनरियं वलते दयार्द्रा . ७२

( इतिविमृशन् स्थितः )

मारी०- ( स्वगतं ) कथमयं संदिग्धः शरं विमोक्तुमनयोः. आस्तामेतत् ( ध्यानंनाटयति ).

एका० ( पटाक्षेपेण संभ्रांता प्रविशति ) अम्मो, हद्ध्मो ! ( सर्वाःसंभ्रांताः) हला हद्ध्मो कहं अप्पिअं कहइस्सं ?

सर्वाः- किंअप्पिअं ? कहेहि. तंसुणिअ जं कादव्वं तं करेह्म.

प्रविष्टा.—अण्णं किंकहिस्सं ? ( अश्रूणिवर्तयंती ) पत्थिदेण जणअराएण कणा णदिज्ज इत्तिमणिदो दसकंठो,

सर्वाः- ( सोद्वेगं ) तादिजणए किंविअप्पिअं आअरिदं दसकंठेण ?

प्रविष्टा.— (सोद्वेगगद्गदं ) तस्स सरोसं सीसअं हरिअपत्थे आअन्सदिणं हरिदुंससहीअं.

सीताः.- किंकरेह्म किंकरेह्म ( इतिसंभ्रममुत्थायपलायते )

**राम.**— ( मनांत ) हें कसें ब्वा !

## आर्या.

हे माझे मित्र असें यांची वाणीच सांगते मजला;
परि त्दृदया, कैसी रे ईर्षा त्यांचीच वाटते तुजला ? १००
ज्यांनां राक्षस ह्मणुनी माराया बाण लाविला आहे,
त्यांविषयीं दृष्टि, पहा ! माझी करुणार्द्रता कशी लाहे ! १०१

( असा विचार करीत उभा राहतो ).

**मारीच**—( मनांत म्ह० ) काय ! हा **राम** यांच्यावर बाण टाकायास शंका पावत आहे ! बरें असो. ( असें ह्मणून ध्यान करितो ).

**एक सखी.**— ( पडदा एकीकडे सारून घावऱ्या घावऱ्या येते आणि ह्मणते ) अगे बायांनों, घात झाला गे !

( हें ऐकून साऱ्याजणी घाबरतात ).

**आलेली सखी.**— अगे घात झाला ! अप्रिय वार्ता कशी तरी सांगूं!

**साऱ्याजणी.**— कोणती अप्रिय वार्ता असेल ती सांग बाई ! ती ऐकिल्यावर मग जें कर्तव्य असेल तें करूं !

**आलेली सखी.**— दुसरें काय सांगायाचें आहे ? ( डोळ्यांतून अश्रू ढाळून म्ह० ) कन्या मागितली असतांही दिली नाहीं ह्मणून **दश**कंठानें क्रोधाविष्ट होऊन,—

**साऱ्याजणी.**— ( दुःखाच्या आवेशानें म्ह० ) **जनकरावजीं**चा कांहींतरी घात केला असेल !

**आलेली सखी**— ( दुःखानें गहिंवरून म्ह० ) **जनकरावजीं**चें मस्तक कापून घेऊन **जान**कीला सख्यांसुद्धां धरून नेण्याकरितां तो इकडेसच येत आहे !

**माया सीता.**— हायहाय ! मी कसें करूं आतां ! ( असें ह्मणून घावऱ्यां घावऱ्यां उठून पळायास लागते ).

सख्यः- अंज्जाहिदं अज्जाहिदं किंकरेह्म ( इतिसीतामनुद्रवंति )

रामः— ( ससंभ्रममुपसृत्य ) जानकि, नभेतव्यं, नभेतव्यं दशकंठोहरि

ष्यतीति.

निहंतुमेतौ रजनीचरौ मया शरासनेयः समधायिसायकः,

करा०( समयं मारीचं प्रतिजनांतिकं ) किंकरिष्यति क्षत्रियवटुः ?

किमद्यापि प्रतिपत्तव्यं ? विप्रवटू समुद्दिश्य कथितमनेन.

रामः अनेन हन्यामधुना दशाननं विदेहराजेविहितव्यतिक्रमं. ७३

काश्य० कानामसंभावनाविदेहराजेव्यतिक्रमस्य ? यतः

सखायमिति मन्वानो विदेहेंद्रं दशाननः,

कन्यामर्थयितुं नेष्टे, किंपुनः कर्तुमीदृश. ७४

करा० (मारीचंप्रतिजनांतिकं ) सर्वदाविरुद्धवादी हंतव्योयंविप्रवटुः.

मारी० आस्तामेतत्. पश्य, पश्य,

**सख्या.**— अगे बायांनो, हा तर अणखी मोठा घात झाला! हाय-हाय! आतां काय करावें?

( असें बोलून **सीते**च्या पाठोपाठ धांवतात ).

**राम.**— ( धावऱ्यां धावऱ्यां जवळ जाऊन म्ह० ) अगे **जानकी**, भिऊंनको! भिऊंनको! **दशकंठ** धरून नेईल ह्मणून अगदीं देखील भिऊं नको बरें! धीर धर! धीर धर!

## आर्या.

दोघां निशाचरां या छेदाया बाण लाविला धनुर्षी,

**कराल**— ( भयानें **मारी**चाचे कानांत म्ह० ) हा क्षत्रियबटू काय करील कोण जाणे! ( विचार करून म्ह० ) अँः, आतां संशय कशास, या दोघां ब्राह्मणांच्या पोरांस उद्देशूनच हा बोलिला.

## आर्या. ( उत्तरार्ध ).

**राम.**—

येणेंचि मारितों त्या,[1] ज्यानें वधिला **विदेह**राजऋषी. १०२

**काश्यप**-- **विदे**हराजाला वधिलें ही गोष्ट संभवत देखील नाहीं; कां कीं,

## श्लोक.

**दशानन विदेहेंद्रा**[2] मानितो स्वसखा असा,
कन्या न मागवे ज्याला,[3] तो मारील तया[4] कसा? १०३

**कराल**-(**मारी**चाचे कानांत) हा ब्राह्मणाचा पोरटा पहा कसा सर्वदां विरुद्धभाषण करितों तो! त्यालाच मारून टाकिलें पाहिजे.

**मारीच**— असूं दे तें, पहा, पहा!

---

टीप.--१ रावणाला. २ जनकाला. ३ रावणाला. ४ जनकाला.

वज्राङ्कुरतलप्रहारविमुख प्रक्रांतशक्रद्विप-

प्रेंखद्वालविकर्षकेलिदलितावष्टंभनष्टामरे,

देवे, हंत, दशाननेपि सुकरं योसौ वधं मन्यते,

जेतव्यो युधिकेन राघवबटुः सोयं, हतास्मोवयं. ७५

पिंग०- कः संदेहः ?

करालमारीचौ (समयंपश्यतः)

मारीचः- एतौनिशाचरौहंतुंत्वयंतांत्वर्यतांसखे. (इतिध्यानंनाटयति)

काश्य०-

सखे, मारीचमायेयं, कर्त्तव्यंविमृशन्कुरु.

सीता.- एदांस्सि रेण्णअण्णोण्णसंघरिसिदतरुविब्भवसंजणिदे दावाणले-एदं महासिलं आरुहिअ णवपउत्ततादपिपत्तिजादं सोअजादंतस्सि महापुरिसे बलवंतेण अहिणिवेसेण झ्झासअत्तणो अणंगज्जरं उवसमइस्सं (इतिनिष्क्रांता)

पिंगलकाश्य० (स्व०) कथमेतदापतितं मारीच मायाप्रयोगेण !

(प्रकाशं) सखे, मारीचमायेयं कर्तव्यंविमृशन्कुरु.

रामः— किमत्रास्तिविमर्शनीयं ?

शरीरंपातयिष्यंती पावके यदिचिंत्यमां

जानकीप्राह सस्नेहं तन्मेमर्माणिकृंतति. ७६

### श्लोक.

वज्रापरी घायहि जे हतांचे, होतांच, ऐरावत फार काचे,
मागें फिरे तो जंव रे मयानें, ओढी तया रावण शेंपुटानें, १०३
हें पाहुनी देवहि भीत झाले, होऊनियां दीन दरीं लपाले,
त्या रावणाचा वध फार सोपा, ऐसेचि हां मानितसेचि बापा! १०४
रामा रणीं जिंकिल आजि ऐसा, नाहीं त्रिलोकींतहि वीर तैसा,
नाहीं गती नीट पुढें कुलाची, ही जाण बा निश्चित गोष्ट साची. १०५

**पिंगल**—( **काश्यप** वचनावर ह्म० ) यांत काय संशय ?

**कराल व मारीच**— ( भय पावून उगेच पाहतात ).

**मारीच**— या दोघां राक्षसां शीघ्र सखया ठाक मारुनी. (हें श्लोकार्ध ह्मणून ध्यान करितो ).

**काश्यप**— ( श्लोकाचें उत्तरार्ध म्हणतो ).

सख्या, मारीचमाया ही कर कार्या विचारुनी. १०६

**मायासी०**— या वनांत झाडांशीं झाडें घांसून अग्नि पडला आहे तर ह्या मोठ्या शिळेवर चढून त्यांत उडी घालितें. ह्मणजे जनकरावजीचें वर्तमान ऐकून जो शोक झाला आहे, तो, व त्या महापुरुषाचेठायीं अतिशय अभिनिवेश उत्पन्न होऊन ह्रदय केवळ ज्या मदनज्वरानें जाळून टाकिलें, तो मदनज्वर, या दोहींची शांति होईल ! ( असें म्हणून निघून जाते. )

**पिंगल व काश्यप.**—( मनांत म्ह० ) **मारी**चाचे मायाप्रयोगानें ही गोष्ट घडली.

( मोठ्यानें म्ह० ) सख्या, मारीचमाया ही कर कार्या विचारुनी.

**राम.**—येथें विचार तो कसला करायाचा आहे ?

### श्लोक.

प्रेमें स्मरोनि मजला उडी अग्नींत घालितां.
सीता जें बोलिली तें, हो, मन्मर्मा टोंचितें अतां.१

टीप—१ राम

**करा०**— वयस्य, मायाप्रयोगइति प्रलपत्वेषतावत्.

( एतौ निशाचरौ हंतुमितिपुनः पठति. )

**सख्यः**—हला जाणइ, सव्वाणं विअज्ञाणं तादजण अणिमित्त संदावो साहारणो जव्व. कुदो तुमं पुढमं पत्थिदासि ? अणुवट्टंतिओ अम्हे वितुए पडिवालणिज्जाओ. अण्णहाडु तुह विसेसडुःखंविअम्हाणंदूसहं डुविस्सदि. कहं जलणंप्पविठ्ठा एवजाणई ! हासही, जणवत्सले, हा. विदेहकुलमंगलदीविए, ( इत्यर्द्धोक्ते ) किंरोअणेण ? खुइम्मिणाडुःखं पसमीअदि ? ताअह्मे वितत्थे पविसामो, जत्थसासही पविठ्ठा.

( इति निष्कांताः सर्वाः )

**रामः**— कष्टं, मोः कष्टं ! ( शरमुपसंहरन् )

भग्नोमे सहसा मनोरथतरु, र्भग्नं भुवो भूषणं,

भग्नं विश्वसृजो यश स्तनुभृतां भग्नो दृशोरुत्सवः ,

भग्नः पंचशरस्य किंचजगतांजेतुः समस्तोमदो,

वैदेही यदियंपितर्युपरते वन्हिप्रविष्टा शुचा । ७७

**मारी०**— ( स्व० ) रामस्य शोकाग्निमुद्दीपयामि ( प्रकाशं ) कथमियं वन्हिं प्रविष्टेव ! हा देवयजनसंभवे, हा विदेहकुलनंदिनि, हा त्रिभुवनैकसुंदरि, हा राममयैकजीविते, हा जानकि, तवापी

**कराल.**—मित्रा, 'मायाप्रयोग हा मायाप्रयोग हा' असी हा बडबड करितो ती करो, पण

या दोघां राक्षसां शीघ्र, सखया, टाक मारुनी.

( हें श्लोकार्ध पुनः म्हणतो ).

**सख्या.**—(मायासीते प्रत म्ह०) जनकरावर्जींचें दुःख जसें तुला तसेंच आम्हा सर्वांनांही आहे. असें असून आम्हांला टाकून तूंच कशीगे पुढें गेलीस ! थांब थांब, ह्या आलों तुझ्या पाठोपाठ आलों, तर आम्हांला येऊंदेगे ! तूं एकटीनेंच भलती गोष्ट केली तर आ-म्हाला जें आणखी एक विशेष दुःख होईल, तें सोसवणार नाहीं ! अगे हायहाय ! तिनें अग्नींत उडी टाकिली देखील ! हा सखीजन वत्सले, हा विदेहकुलमंगलदीपिके, ( असें अर्धेंच वाक्य बोलून ) अगे आतां रडून काय हें दुःख नाहींसें होतें ? तर ज्या अग्नींत सखीनें उडी घातली, त्याच अग्नींत आपणही उडी घालूं चला.

( असें बोलून सान्या निघून जातात. )

**राम.**—अरेरे ! काय दुःखाची गोष्ट ही ! (धनुष्यावरून बाण काढून) पित्याचे शोकास्तव तिनें असें केलें. त्यामुळेंः

## श्लोक.

झाला मग्न अतां मनोरथ तरू माझा अलंकारही
पृथ्वीचा,[१] नयनोत्सवौघ, विधिची सत्कीर्ति जी कीं मही,
झाला मग्न तसा त्रिलोकजयि जो त्या मन्मथाचा मद,
प्रेष्ठा[२] गेलि जळोनि यास्तव मना कांहीं नसे सौख्यदं.[३] १०८

**मारीच.**—( मनांत ह्मणतो ) रामाचे शोकाग्नीला आणखी पेटवून देतों आतां. ( मोठ्यानें ह्मणतो) काय ! हिनें अग्नींत उडी टाकि-ली कीं ! अरेरे ! हे देवयजनसंभवे, हे विदेहकुलनंदिनि, हे त्रि-भुवनैकसुंदरि, हा राममयैकजीविते, हे जानकि, तुझी आणि

टीप-१ पृथ्वीवरील. २ प्रियतमा. ३ सौख्य देणारें.

यद्दशेति किमुच्यते त्वयिदैवदुर्विलसितं !

( इतिमूर्च्छां नाटयति )

**क्रूरा०**— ( मारीचंप्रति ) काश्यप, समाश्वसिहि.

**रामः**— किं काश्यपएव प्रथमं प्रमुग्धः ! ( सशोकावेगं )

पतामि किमहं गिरेः । किमुविशामि वारांनिधिं ?

तनुंविदलयामिकिं ! कवलयामि किंवा विषं ?

**क्रूरा०**— ( स्व० ) अरेरे क्षत्रियबटो, ताटकां सुबाहुंवापृच्छ. ( प्रकाशं मारीचंप्रति ) काश्यप, कापुनरावयोर्गतिः ?

**मारीचः** ( समाश्वस्य ) यापुनर्वयस्यस्य.

**रामः**— विदेहनृपकन्यकामनुपतामिकिंपावके ?

**मारी०**— ( स्वगतं ) एवंक्रियतां, यदर्थोयमारंभः सर्वोपि. ( प्रकाशं ) वयस्य, नालमिदंतत्प्रेमभराय.

**रामः**— प्रशाम्यति ममान्यथा कथमियं व्यथा मानसी ? ७८

**पिंगलकाश्यपौ** ( जनांतिकं ) हंतहंत ! विस्मयनीयमनयोर्मिथ्याचातुर्यं ! यदावामपि अविश्वसनीयौ वयस्यस्य संपन्नौ ! ( इतिविषादं नाटयतः )

**रामः** ( सशोकाश्चर्यं )

असी दशा व्हावी काय! हा दुर्दैवानें तुजवर कहर केला! अरेरे!
(असें ह्मणून मूर्च्छित होतो.)

**कराल.**— (मारीचाप्रत) काश्यपा, सावध हो, सावध हो!

**राम.**— काय! काश्यपालाच पहिल्यानें मूर्च्छा आली! (शोकाचे आवेशानें).

**श्लोक.**

गिरीवरुनियां पडूं, जलनिधीमधें वा बुडूं
चिरूं कि जड हें वपू, पिउं विषास किंवा कडु,

**कराल.**—(मनांत ह्मणतो) अरे क्षत्रियाचे पोरट्या, काय करूं ह्मणून ताटिकेला व सुबाहूला विचार.) मोठ्यानें मारीचाप्रत) काश्यपा, मग आपली गति कशी रे?

**मारीच.**— (सावध होऊन ह्मणतो) जी मित्राची तीच आपली.

**राम.**—

**श्लोक.** (तृतीयचरण).

अनुव्रजन कीं करूं जनकजेसवें पावकीं,

**मारीच.**—(मनांत म्हणतो) असेंच कर आणि त्वां असेंच करावें म्हणून तर हा सर्व प्रयत्न आहे! (मोठ्यानें ह्मणतो)मित्रा, तुजवर जें तिचें अतिशय प्रेम होतें त्यापुढें हें करणें कांहींच नाहीं।

**राम.**— **श्लोक.** (चतुर्थचरण).

व्यथा ममहि अन्यथा कसि परीहरे, सांग कीं. १०९

**पिंगल व काश्यप.**— (एकमेकांच्या कानाशीं लागून ह्मणतात) अरे! यांचें मायाचातुर्य केवढें अद्भुत आहे पहा, कीं ज्याचे योगानें आह्मी देखील मित्राला अविश्वसनीय झालों. हरहर! काय करावें (असें ह्मणून खिन्न होतात).

**राम.**— (शोकानें व आश्चर्यानें).

अध्यास्य पल्लवमयं शयनं सखीभिः

संभाविता शशिकलेव कृशोज्वलांगी,

या सांप्रतं ममसखीनयनोत्सवोभू.

त्सैवेयमेवमिति शक्य मिदं नसोढुं. ७९

तदेनांनीलां शिलामधिरुह्य यथामनोरथं निर्वर्तयिष्ये. ( इति शिलायां पादमर्पयति )

**पिंगलकाश्यपौ—** (जनांतिकं) अहो राक्षसेनवंचिताः स्मः ! किं. कर्त्तव्य मिदानीं ! कः पुनरिदानीं वक्ष्यति कौशिकाय, यः प्रतिविधातुं व्यापारयिष्यति ( इतिपश्यंतौ तिष्ठतः )

**मारी०—** ( स्व० ) फलितएवमेमनोरथः ! ( हर्षपारवश्यंनाटयन्, प्रकाशं )

सीतानुगतये पादं शिलायामर्पयत्ययं,

कराल दृश्यतां रामस्ताटकावधपातकी. ८०

**करा०—** ( सभ्रूभंगहुंकारं मामेतिशिरोधूननेन संज्ञापयति )

**पिंग०—** ( काश्यपस्यहस्तमास्फालयति )

**काश्य०—** ( रामंप्रति ) श्रुतं भवता भवदीयकाश्यपस्यवचनं.

**रामः** ( साशंकं ) कीदृशमनेनव्याहृतं ? ( इतिपरावर्त्तते )

### श्लोक.

भिजुनि राहे नवपल्लवावरी, सख्याहि सेवा करिती परोपरी,
शशांकलेखे परि सूक्ष्मउज्ज्वला सुलोचना निश्चित भासली मला,
सख्या, अतांची मम लोचनांला दिलें जिनें फारचि उत्सवाला,
तिचा कसा यापरि अंत झाला! अशक्य हें, बा, मज सोसण्याला १०

नर आतां ह्या काळ्या मोर शिळेवर चढून मनांत आल्या प्रमाणें करितों. (असें म्हणून शिळेवर पाय ठेवितो ).

**काश्यप व पिंगल.**—( एकमेकाजवळ ह्म० ) अहो काय करावें राक्षसानें आपणास फसविलें! कौशिक काकांना जर हें वर्तमान कळलें, तर ते याचें निवारण करितील. पण त्यांना हें जाऊन कोण सांगेल आतां ? (असें म्हणून उगेच पाहत राहतात ).

**मारी०**—( मनांत म्ह० ) हाँ आतां आपलें कार्य सिद्ध झालें (हर्षातिशयामुळें भान न राहतां मोठ्यानें ह्मणतो ) अरे **कराला क**राला, पाहतो आहेस ना ?

### आर्या.

सीतानुगमार्थ कसा शिळेवरी देतसे पदा राम,
राक्षसवधपापी हा, गेला सिद्धीस आपुला काम[२]. ११

**कराल.**—(भिवया वांकड्या करून व उहूं उहूं असा शब्द करून असें बोलूं नको ह्मणून डोकें हालवून खुणा करितो ).

**पिंगल.**—( काश्यपाच्या हातावर हात मारून टाळी देतो ).

**काश्यप**—(रामाप्रत ह्म०) तूं तुझ्या **काश्यपाचें** बोलणें ऐकलें ना ?

**राम.**—( शंकित होऊन ह्म०) खरेंच हा काय बोलिला हो ! ( असें ह्मणून मागें फिरतो ).

---

टीप-१ चंद्राची कळा. २ मनोरथ.

**मारी०—** ( करालंप्रति जनांतिकं ) हर्षपरवशास्यमेदग्धमुखादेवंनिः सृतं. कराल, किमतः परं कर वावहे ?

**करा०—** किमन्यदस्तिकर्त्तव्यं ? हरिणप्लुतेनपलायावहे.

( नेपथ्ये )

जयजय, वत्स रामचंद्र, जयजय.

( सर्वेसविस्मयपश्यंति. )

**करालमारीचौ**. ( जनांतिकं )

यस्यामनेनपदमर्पितमेकमेव
सीतांहुताशपतितां सहसानुगंतुं,
सेयंशिला, घनकचा, धृतवल्कलांगी,
पीनस्तनी, मुनिवधूरिव पर्यणंसीत् । ८१

**रामः—** ( कथमेतदिति चिंतयति ) कथमंबा कौश्यल्येव मामंत्रयति!

( ततः प्रविशति मुनिपत्नी )

**मुनिपत्नी.—**

परुषितगृहमेधिदत्तशापा-
मुपलतया धृतदीर्घकाल दैन्यां,
पदकमलपरागपावितां, ते
मनुकुलमंडन, विद्धिमामहल्यां. ८२

**रामः**. (स्वगतं ) असकृदेवाकर्णितेयमस्माभि स्तत्रभवतः कौशिकस्य-मुखात्. ( प्रकाशं) भगवति, दाशरथिरेषरामोऽभिवादयते.

**मारीच.**— ( **कराला**च्या कानाशीं लागून ) काय करूं रे ! जळालें तें माझें तोंड ! हर्षामुळें भान न राहतां मी बेटा फटकन असें बोलून उठलों ! तर **कराला** बापा, आतां कसें करावें रे ?

**कराल.**— दुसरें काय ? हरिणाचे रूपानें पळून जावें हाच आतां उपाय !

( इतक्यांत पडद्या पलीकडे शब्द होतो ).

'वत्सा **रामचंद्रा**. जयजयकार असो, तुझा जयजयकार असो.

( सारे विस्मित होऊन पाहतात ).

**कराल व मारीच.**— ( एकमेकाच्या कानाशीं लागून ह्मणतात ).

### श्लोक.

सीतेपरी हुतभुजीं[1] उडि घालण्यास
येणें जयेवरि समर्पियलें पदास,
ती, रे, शिला घनकचा[2] धृतवल्कला[3] हे
पीनस्तनी[4] मुनिवधूपरि[5] दीसताहे ! ११२

**राम.**— हें काय आहे हो ? ( असें ह्मणून मनांत विचार करून ) काय ! माता **कौस**ल्याच मजप्रत हाक मारीत आहे कीं !

( नंतर मुनिपत्नी **अहल्या** पडद्याचे बाहेर येते ).

**अहल्या**—

### आर्या.

जी क्रुद्धभर्तृशापें[6] शिलात्व पावुनि पडे सुचिर विकलें[7]
ती मीच बा, **अहल्या** झालें त्वत्पदरजेंचि विगतमलें.[8] ११३

**राम.**— ( मनांत म्ह० ) भगवान् **विश्वामित्र**ऋषी यांचे मुखांतून हिचें नाव वारंवार ऐकिलें आहे खरेंच ! (मोठ्यानें म्ह०) हे भगवति, **दशरथा**चा पुत्र जो **राम** तो तुझे चरणाप्रत वंदन करितो.

---

टीप.—१ अग्नींत. २ दाट आहेत केश जिचे. ३ वल्कल नेसलेली. ४ पुष्टस्तनी. ५ मुनिपत्नीसारिखी. ६ कोपयुक्त पतीच्या शापानें. ७ निस्तेज. ८ निष्पाप.



**मुनिपत्नी.**— वत्स, चिरंजीव.

**पिंगलकाश्यपौ**— ( उपसृत्य ) अंब भगवतः शतानंदस्य जन-
नि, तत्र भवतीमावामभिवादयावहे.

**मुनिप०** — वत्सावभिमतेनयुज्येथां.

**रामः**— अंब, कावेतौ ?

**मुनिप०**— पिंगल काश्यपावेव; किंतु.

मारीचोयं, करालोयं; मायया मोहितोययोः

( इतिहस्तेनदर्शयति )

**करालमारीचौ**— ( सभयं मृगरूपेण पलायितुमारभेते. )

**मुनिप०**— वत्स, रघुनंदन,

द्रावप्येतौ मृगी- भूत्वा धावतौ पत्रिणा जहि. ८३

**रामः**— अरेरे दुरात्मानौ, राक्षसापसदौ, क्वयास्यतः ? तिष्ठतं.

( इति निष्क्रांतः )

**पिंगलकाश्यपौ.**— अंब, निष्कलंकज्ञानानुगृहीतप्रपंचस्वरूपतत्वे,
सनातनगुरोर्गौतमस्यधर्मपत्नि,

दिष्ट्या गतासि निजरूपमयंत्वदुक्त्या
दिष्ट्या विदन्निशिचरौ चलितौ निहंतुं;
दिष्ट्यावयोर्गतमुदंचति जीवितंच;
श्रेयः करोतिहि विधिर्जगतोऽनुकूलः । ८४

**अहल्या**— वत्सा, चिरंजीव हो !

**पिंगल व काश्यप**.— हे माते, भगवान् शतानंद याचे जननि, परमपूज्ये, तुजप्रत आह्मी उभयतां वंदन करितों !

**अहल्या**— वत्सांनो, तुमची अभीष्टसिद्धी होवो !

**राम**.— माते, हे दोघे कोण आहेत ?

**अहल्या**—**पिंगल** आणि **काश्यप**च हे खरे; परंतु,

**आर्या**. (पूर्वार्ध).

हा **मारीच कराल**हि हा, ज्यांनीं बा, मोहिलें तुला मायें[1],

(असें ह्मणून हातानें दाखवून देते.)

**कराल व मारीच**-(भय पावून हरिणाच्या रूपानें पळ काढितात).

**अहल्या**.— वत्सा **रघुनंदना**,

**आर्या**. (उत्तरार्ध).

पळती मृगरूपें हे, यांते मारून टाक शरघायें, ११४

**राम**.— अरे दुष्टांनो राक्षसाधमांनो ! उभे रहा, खबरदार !

(असें ह्मणून निघून जातो.)

**पिंगल व काश्यप**.— हे माते, तुझें महत्त्व केवढें आहे ! पहा तुझें ज्ञान अगदीं कलंकरहित आहे ! आणि तुजला प्रपंचाचें वास्तविक स्वरूप समजलें आहे ! व सनातनगुरु जो भगवान् **गौतम** त्याची तूं धर्मपत्नी होस ! तुझा महिमा काय वर्णावा ! आतां पहा कसें झालें तें ?

**श्लोक**.

स्वरूप तुझें तुज लब्ध झालें **रामास** तूं राक्षस दावियेले,
तोही तयांच्या हननास गेला, आह्मासहि जीवितलाभ झाला, ११५
गोष्टी अशा ज्या अजि येथ झाल्या, त्या सर्व दैवेंचि घडोनि आल्या,
ह्मणोनि तें[2] जें अनुकूळ आहे, तेव्हांचि कल्याण मनुष्य लाहे. ११६

---

टीप.—१ मायेंकरून. २ दैव.

**मुनिप०** — युक्तमुक्तंवत्साभ्याम्. (किंचिदग्रतोगत्वा) वत्सौ, पश्यतं.

कौशल्या सुतकर्णजाहृचलितज्यावल्लिचक्रीभव
त्स्फूर्जत्कार्मुककीर्णबाणदलितग्रीवः करालः पतन्,
मुक्तान्यंकुशरीरमंकुरितया मूर्त्या स्वयंतत्क्षणं
राक्षस्या दवदग्धतालनिभयादुग्धेमुदंद्योसदां. ८५

अपिच.

मारीचोमाययाचक्षुमार्गमत्यक्रमीदिति,
चापावरोपितशरोवत्सः प्रतिनिवर्त्तते. ८६

( ततः प्रविशति रामः )

**रामः**— ( अंब, दिष्ट्यावयमनुगृहीतास्मोभवत्या !

**मुनिपत्नी.**— वत्स, कौशल्यानंदन,

त्वत्पादपंकजपरागविधूतपाप्मा भर्तारमार्त्तजनबांधव, रामचंद्र,
शुश्रूषितुं पुनरपि प्रयतापुरेव वांच्छामिगौतमऋषिं; वितराभ्यनुज्ञां.८७

**रामः**— अस्त्येव. नमस्ते, नमस्ते.

**मुनिपत्नी.**—

पद्मबंधुकुलोत्तंस, परिणेष्यसिजानकीं;
जित्वा निशाचरान्सर्वांस्त्रिजगत्पालयिष्यसि. ८८

( इति निष्क्रांता )

**रामः**— ( सानुशयं पिंगलकाश्यपौप्रति. ) वयस्यौ, युवयोर्मुखावलो-
कनायविलज्जे.

**अहल्या**—तुमचें बोलणें यथार्थ आहे. (किंचित् पुढें जाऊन म्हणते) वत्सांनो, पहा, इतक्यांत काय झालें तें ?

**श्लोक.**

करालगल तोडिला प्रभुवरें शरें जेधवां,
धनुष्यरव जाहला श्रुतिकठोर हो तेधवां,
त्यजून मृगरूप तो क्षितिवरी तमालापरी
पडे, तंव निजालयीं[1] बहुत हर्ष केला सुरीं[2]. ११७

अणखी पहा,

**श्लोक.**

मायाबळें दृष्टिपथा क्रमोनी, **मा**रीच गेला दुरि हा पळोनी,
ह्मणोनि चापासहि आवरोनी येतो, पहा, **राम** अतां फिरोनी. ११८

(तदनंतर **राम** पडद्यांतून बाहेर येतो.)

**राम.**— हें मातोश्री, दैव थोर ह्मणून आज त्वां आमच्यावर अनुग्रह केला हा !

**अहल्या**— वत्सा **कौ**सल्यापुत्रा,

**श्लोक.**

रजें पदाच्या तव शुद्ध झालें, संपूर्ण माझे अघशैल[3] गेले,
इच्छा असे, रे, पतिसेवनाची, आज्ञा अतां दे मज जावयाची. ११९

**राम.**—बरें आहे मातोश्री, यावें तर, नमस्कार असो, तुजप्रत नमस्कार असो !

**अहल्या**

**श्लोक.**

हे आदित्यकुलोत्तंसा[4], जानकी पावसी अतां,
जिंकोनि राक्षसां सर्वां होईं त्रिजगपालिता.

(असें म्हणून निघून जाते.)

**राम.**—(अनुताप पावून **पिं**गल व **का**श्यप यांप्रत ह्म०) मित्रांनो, तुमच्या तोंडाकडे पाहायास देखील मला लाज वाटते.

---

टीप–१ स्वर्गास. २देवांनीं-३ पापपर्वत. ४रविकुलभूषणा.

**पिंगलकाश्यपौ.—** अत्रापराध्यति मारीचस्यमाया.

**रामः—** सत्यमेवैतत्.

> आविष्कृता ममपुरोजनकात्मजेति
>
> मायैव तेन जननीवधकोपितेन;
>
> तत्तन्मयानुचरितं परमार्थबुद्ध्या;
>
> नान्यत्र, किंतु भवतोः सुहृदोः समीपं. ८९

तदेतन्नप्रकाशनीयं भवद्भ्यां.

**काश्य॰** एवमेवमनुजमात्रस्य; नपुनस्तातकौशिकस्य; यतः पुनरेवं मायाप्रयोगे प्रतिविधानमुपदेक्ष्यति.

**रामः-** युक्तं भवानाह.

( नेपथ्ये ),

> भोजानीतकुमारयानपदवी मेतां, हतश्वापदां;
>
> कुंतैः कृंतत; रुंधतेवनपथं कंठीरवो भैरवः ;
>
> अग्रेयांतमनुप्रयाति करिणं भीताः करिण्यो भिया;
>
> तूष्णींपश्यत खेलदेणमिथुनं, चंचाट्टहासैरलं. ९०

**रामः—** ( श्रुत्वा ) मामन्विष्यतोमडुपजीविजनस्यायमुद्घोषः. उपपन्नमेवैतत्. यतएवतवानीं.

**पिंगल व काश्य०**— अँः, यांत तुझ्याकडे काय आहे ? हा सर्व अपराध **मारीचाच्या** मायेचा होय !

**राम.**— खरें ह्मणलें !

## आर्या.

मातृवधें कोपुनियां **मारीचें** करुनि राक्षसी माया,
दाविपली **सीता** जी वाटे **इंद्राहि** दुर्लभ **रमायां**.१२०
ती सत्यचि ऐसें मनिं मावुनि केलें असें भियां कांहीं,
तें सर्व पुढें तुमच्या, न जाणिलें तें अणूहि[२] अणिकांहीं[३].१२१

तुह्मांला कळलें तरी चिंता नाहीं, तुह्मी मित्रच आहां, पण इतर कोणापाशीं अक्षर बोलूं नका बरें !

**काश्यप.**—इतर मनुष्यापाशीं न बोलावें हें ठीकच आहे. पण कौशिक काकापाशीं सांगितलेंच पाहिजे. कां कीं, पुढें कधीं असा मायाप्रयोगाचा प्रसंग प्राप्त झाला असतां ते त्याचा प्रतीकार सांगून ठेवतील.

**राम.**— ठीकठीक, असेंच खरें !

(इतक्यांत पडद्यापलीकडे शब्द होतो.)

## आर्या.

मृग पळले मरुनी बहु, येथें यास्तव कुमार मृगयेला
याच पथें हो हातीं सशर धनुष्यास घेउनी गेला, १२२
हें बहुदुर्गम कानन रोधति मार्गास सिंह उग्र कसे !
त्यांना भाले हाणा दुष्टां वधितां न पापलेश असे ; १२३
सिंहभयें गज पळती, त्यांमागें धांवती भयें करिणी,
बोलूं नका उगि पहा, खेळति कैशा पतीसवें हरिणी

**राम.**—परिजनमंडळी माझा शोध करीत करीत निघाली त्यांची ही आरोळी आहे आणि त्यामुळें वनांत कसें झालें आहे पहा,

---

टीप.—१ क्रीडाकरण्यास. २ अणुमात्रही. ३ इतरांनीं.

क्ष्वेलातर्जितसिंहगर्जितभयभ्राम्यद्गजग्रामणी
त्सीत्कारद्रवदक्षदर्शनकृतभ्रूभंगशाखामृगं,
कुंतक्षुण्णतरक्षुवक्षगलितक्षोणीनिषण्णार्भक
प्राणं, व्यापृतरोहिताहितबहूकारं, वनाभ्यंतरं. ९१

**काश्य०—** एवमेवैतत्. अतिक्रामति समयो मृगयाप्रवृत्तस्य वयस्यस्य.

**रामः—** ( सर्वत्रविलोक्य) कथमुज्जृंभितएव दिनयौवनारंभः ! तथाहि.

पांथानां शरणार्थिनीवचरणं छाया तरोः सेवते;
भानुर्दिग्वलयंविलोकितुमिव व्योमाग्रमारोहति,
तृष्यंतीदयितार्पितं किसलयं नावेक्षते कोकिला;
क्लांतांवीजयति प्रियांमधुकरः पक्षानिलेनाधुना. ९२

तदेवमधुनास्कंधावारमेवगच्छामः

( इतिनिष्क्रांताः सर्वे )

## तृतीयोङ्कः ३.

## पद.

पाहारे विपिनीं आतां, कैसी रे गडबड होती. ( ध्रुवपद ).
सैनिक गर्जनेतें करिती, ऐकोनीयां सिंहांनीं ती, स्वयें
हि मेघापरी गर्जती, गगनीं उड्डाणें करिती. पाहारे विपिनीं १
ऐकुनी सिंहाची गर्जना, भीती झाली करिवर यांना
पळोनी जाती दुसऱ्या रानां, पळतां मध्यें अडखळतीं.
पाहारे विपिनीं आतां, कैसी रे गडबड होतो. २
ओरडतां हत्तींतें ऐकुनी, भालुक पळती रानोरानीं, माकडं
त्यांनां अवलोकूनी, भिवया कैसे चढविती. पाहारे वि० ३
रोहितांचीं[१] बाळें तान्हीं घेउनि तरसें[२] पळती विपिनीं, त्यांना
भोंसकतां भाल्यांनीं, बाळें खालीं पडती तीं. पाहारे० ४
निजबाळाला पाहुनि रोहित, जवळी जाऊनिया हुंगित, 'वहू
वहू'[३] या शब्द करित, तेणें वनास गर्जविती. पाहारे विपिनीं
आतां कैसी रे गडबड होती.५ १२५

असा प्रकार ह्या वनांत आतां झाला आहे !

**काश्यप.**—मित्रा, झाला आहे खराच ! यावरून तुझी सेवकमंडळी तुझा शोक करीत येत आहे ही अटकळ खरी आहे. दुसरें, गड्या, मृगयेस निघून तुला वेळही पुष्कळ झाला.

**राम.**—( चोहोंकडे पाहून ) काय ! दुपार भरत आली कीं! कां कीं,

## श्लोक.

छाया वृक्षपदा धरी जणु ह्मणे पांथांस रक्षा असें ;
देखाया चढला जणू रवि नभीं दिक्‌चक्र कैसें दिसे ;
देतो कौकिळ पल्लवा, परि तृषाक्रांता नघे कोकिला;
कांता श्रांत ह्मणूनि घालि पवना भृंग स्वपक्षें तिला. १२६

ह्मणून आतां सैन्याचे तळावरच जाऊं चला .

( असें बोलून सारे निघून जातात. )

## ( तिसरा अंक समाप्त. )

---

टीप.–१ हरिण विशेष.२ पशु विशेष. ३ वहू इत्याकारक शब्द.

( ततः प्रविशति गंधर्वः )

गंधर्वः— संप्रतिहि.

निहत्य युधिताटकां, सह भटैः सुबाहुं तदा

करालमपि राघवो यमपुरीमनैषीद्दिति,

यमप्रहितवाचकं निशमयन् वृषामन्यते

निशाटवधनाटकप्रथमभूमिकोपक्रमम् १.

# जानकीपरिणय नाटक.

## अंक ४.

### पात्रें.

| | |
|---|---|
| गंधर्व, चित्रांगदनामा | इंद्राचा दूत. |
| राक्षसी, उष्ट्रमुखी | मंदोदरीची दासी. |
| रावण. | राक्षसाचा राजा. |
| विद्युज्जिव्ह व सारण | रावणाचे मंत्री. |
| जनकराजा | मिथिलेचा राजा. |
| शतानंद | जनकाचा उपाध्याय. |
| जीमूतक | जनकाचा चोबदार. |
| कौशिक | एक ऋषी. |
| राम व लक्ष्मण | दशरथ राजाचे पुत्र. |
| सीता व ऊर्मिला | जनक राजाच्या कन्या. |
| मांडवी व श्रुतकीर्ति | जनकराजाच्या पुतण्या |

---

( तदनंतर गंधर्व पडद्या बाहेर येतो. )

गंधर्व.— सांप्रत,

श्लोक.

रणीं समर्थ तार्टिका वधुनि रामचंद्रें भले
सुबाहु व कराल हे यमपुरीस ही धाडिले,
यमें कळवितां असें सुरपती ह्मणे मानसीं
निशाटवधनाटकप्रथमभूमिका ही असी. १

टीप-१योध्यासुद्धां. २इंद्र. ३राक्षसवधरूप नाटकाचें पहिलें सोंग.

अतः खल्वनेन परितुष्टेनसमादिष्टोस्मि, निखिलसुरचक्रचूडाम-णिकिरणपुंजकिंजल्कितचरणारविंदेन महाराजमहेंद्रेण अयि, चि-त्रांगद, संप्रतिहि किंप्रतिपद्यते स्वजनविनिपातमाकर्ण्यन्कुंभक-र्णाग्रजइतिलंकां प्रविश्य विचारयेति. ( सवितर्कं )

प्रादुर्भवतिदेवस्य पक्षपातोरघूद्वहे

यावानंतोप्यभ्यधिकं रावणे द्रोहचिंतनं. २

भवत्वेवं मया गृहीतराक्षसवेषेण राजधानीयं सर्वतः परिरक्षितापि-सुप्रवेशासंवृत्ता. ( अग्रतोवलोक्य ) कापुनरियं मांराक्षस्यभिवर्त्त-ते ? अस्याः खलु

उष्ट्रस्येवमुखं, करालकुटिलाः प्रादेशमात्राः कचाः,
कुक्षिर्डिंडिमिरेव, कोपि कुचयोः स्थूलः कशीयान्परः,
बाहूवाहसुदुर्भगौ, गजपतेरंघ्रीयथांघ्रोतथा,
तेनासौ मणिभूषणानि विदधे दुःस्थानशोभ्यादशां. ३

( ततः प्रविशतिराक्षसी )

**राक्षसी—** भेद्द, कोतुमं ? किंकरालो, किंदुअण्णो ?

**गंधर्वः—** ( स्वगतं ) अनया संभाषणस्य स्वयमेवमार्गोदर्शितः. ( प्र-काशं ) करालएव.

वास्तव समस्त देव समुदायाच्या मस्तकावरील रत्नघटित मुकुटां-
चे कांतिकिरण ज्याच्या चरणरूप अरविंदाच्या ठायीं केसररूप
भासतात असा जो महाराज **महेंद्र** यानें संतुष्ट होऊन मला
आज्ञा केली आहे कीं, "अरे **चित्रांगदा**, प्रस्तुत स्वकीय
जनाचा नाश झाल्याचें वर्तमान ऐकून **कुंभ**कर्णाचा अग्रज
जो **रावण** तो काय विचार करीत आहे, ह्या गोष्टीचा **लंके**त
जाऊन शोध करून ये. ( तर्कानें ह्मणतो ).

### श्लोक.

**रामीं** असें **महेंद्रा**चा जितुका स्नेह तो मला,
त्याहूनि **रावणीं** शत्रुभाव फार दिसे मला. २

अहो, ह्या राक्षसाचे राजधानीच्या सर्व बाजूंनीं चौक्या पहारे अ-
सून मोठा कडेकोट बंदोबस्त आहे, त्यामुळें हींत कोणाचाही प्रवेश
होऊं शकत नाहीं. परंतु मी राक्षसाचें रूप घेतलें आहे ह्मणून म-
ला आंत जाण्यास कांहींच अवघड नाहीं. ( पुढें पाहून ह्मणतो )
माझ्या समोरच ही कोण बरें राक्षसी येत आहे? हिचें तर,

### श्लोक.

उंटाचेपरि तोंड, मस्तकिं झिंट्या भीतिप्रदा, पोट रे
मोठी नौबद, लाहनी[१] कुच तिचे, विक्राळ जे कां खरे,
घोड्याचेपरि हात, पाय गजवत्, ऐसेपरी भूषणां
दुस्थानस्थिति[२] लब्ध झालि ह्मणुनी वाईट वाटे मनां. ३

( नंतर ) **राक्षसी** पडद्याबाहेर येते. )

**राक्षसी**.—बाबा कोणरे तूं? **कराल** आहेस किंवा दुसरा कोणी आहेस?

**गंधर्व**.—(मनांत ह्म०) उत्तर काय द्यावें याचा मार्ग हिनेंच दाखवून
दिला ! ( मोठ्यानें ह्म० ) होय **कराल**च आहें.

टीप.—१ लहनी नौबद. २ वाईट ठिकाणीं वास.

**राक्षसी—** ( सविस्मयं ) [2]जं पासाणो विअतुमं चिट्ठसि, तुहघरिणी गिद्धमुही उणरुअं तीणं मज्झवट्ठिणी मइ णाहो रामसरेण णिह- दोत्ति उरं ताड अंती अज्जवि रोअणं ण मुंचइ.

**गंधर्वः—** ( स्वगतं ) करालस्यभार्यासा. तदुपपन्नमेव. ( प्रकाशं ) के- नैतदुक्तमेतस्यै ?

**राक्षसी—** [3]अज्जमारीओ लंकेसुरं अप्पेक्खंतो पहट्ठंकहिअ जणणी वहेण णिव्विणो गोकण्णखेत्ते तवं काढुंगओ. तदोसव्वे हिंएसोवु- त्तंतो जाणिदो.

**गंधर्वः—** किमत्रपुरे नास्तिलंकेश्वरः ?

**राक्षसी—**[4]णत्थि णत्थिअदोजेव्वदेवीए मंदोदरीए विद्युज्जीहस्स घरं ग- दुअ अज्जउत्तो कहि पत्थिदोत्ति जाणिअ आअछेत्ति अहं पेसिदह्मि मए वितत्थगदाए विद्युज्जिहेण दिट्ठो, तस्सउणजाआए मायावदी- ए एव्वं किंवि कहिदं.

**गंधर्वः—** किंतत्कथय ?

**राक्षसी.—** ( स्वगतं ) गोवणिज्जं खुतंकहं कइस्सं, अहवा णखु एत्थ णअरेजणअरा अपक्खवादी दीवंतरे समावीअदि; तासु- कएव्वं कहिदुं ( प्रकाशं ) सुणादु हि दाव. कोसिअवेसेण विद्यु- ज्जिहेण, लक्खणवेसेण सारणेण, मायाए रामवेसंकरिअ लंकेसुरो- जाणईपाणिग्गहणत्थं जणअराअं वंचेदुं गओ.

**राक्षसी.**—( विस्मयानें ह्म० ) तूं तर पाषाणासारिखा आहेस, तुला कांहीं भंगही नाहीं ! आणि तुझी बायको गृध्रमुखी तर रडते आहे, आणि 'हायहाय ! माझा पती रामाचा बाण लागून मेलागे! काय करूं"! असें ह्मणून ऊर बडवीत आहे, ती अजून उगी राहत नाहीं. तशा तिच्या भोवतीं राक्षसिणी मिळाल्या आहेत, त्यांनींही रडारड मांडली आहे.

**गंधर्व.**—( मनांत ह्म०) हाँ ! ती करालाची बायको ! मग हें ठीकच आहे. (मोठ्यानें ह्म०) हें असें वर्तमान तिला कोणी सांगितलें बरें?

**राक्षसी.**— आज मारीच आला त्याची व रावणमहाराजांची गांठ पडली नाहीं ह्मणून तो काय सांगायाचें तें प्रहस्तालाच सांगून, आई मरण पावली ह्या दुःखानें व्याकुल होऊन गोकर्ण क्षेत्रीं तप करायास गेला. तेव्हां अवघ्यांना हें वर्तमान कळलें.

**गंधर्व.**-असें काय? तर मग रावणमहाराज लंकेंत नाहींत असें झालें.

**राक्षसी.**—होय, रे नाहींत. ह्मणून तर मंदोदरी साहेबांनीं विद्युज्जिव्हाच्या घरीं जाऊन, स्वामी आज कोठें गेले हें विचारून ये, ह्मणून मला पाठविलें. त्याप्रमाणें मी विद्युज्जिव्हाच्या घरीं गेलें, पण तोही घरीं नव्हता. परंतु त्याची बायको मायावती हिनें मला कांहींएक वर्तमान सांगितलें.

**गंधर्व.**—काय वर्तमान तें मला सांग बरें.

**राक्षसी.**— ( मनांत ह्म०) तें तर फार गुह्य आहे. तेव्हां कसें सांगूं बरें ? अथवा येथें द्वीपांतरीं लंकेंत ह्मटलें ह्मणजे जनकराजाचा पक्षपाती कोणी असण्याचें संभवत नाहीं. मग सांगण्यास काय चिंता आहे ? ( मोठ्यानें ह्म०) सांगतें ऐक. कौशिकाचा वेष विद्युज्जिव्हानें घ्यावा, लक्ष्मणाचा वेष सारणानें घ्यावा, व आपण स्वतां राम व्हावें, असा विचार करून रावणमहाराज जनकराजाला ठकवून सीतेला वरण्याकरितां गेले आहेत.

**गंधर्वः**— युज्यतएवैतत्. लोकनिरूढो रामेभिलाषो जानक्याः.

**राक्षसी.**— ( सहर्षं ) जइ तुमं करालो, तदो पुढमं एव्वंगदुअ गिद्धमुहिए सोहणं भणिअ वारितोसिअं गेण्हिस्सं.

**गंधर्वः**— अस्थानेकोयमानंदः ? न करालोहमन्यएव.

**राक्षसी.**— ( सनिर्वेदं ) कँहं तह संवुत्तो सोकरालो. ?

**गंधर्वः**— अत्रापि किमस्तिसंशयः ?

**राक्षसी.**— भग्गो मह मणोरहो. तुमं उणको ?

**गंधर्वः**— बिभीषणानुचरः

**राक्षसी.**— होदु .एव्वंदेवीए मंदोदरीए णिओअं कहिदुं पवट्टिणी होम्हि.

( इति निष्कांता )

**गंधर्वः**— अहमपि दशाननवृत्तांतं प्रथमं जनकराजाय निवेद्य, पश्चान्महाराजमहेंद्राय निवेदयिष्ये ( इति निष्कांतः )

( मिश्रविष्कंभकः )

ततः प्रविशतिजनकः शतानंदश्च )

**जनकः —**

यावन्नयाचति निशाचरचक्रवर्त्ती
कन्यामतः प्रथममेवरघूद्वहाय
देयेयमित्यभिमतं कुशिकात्मजोमे
निर्वर्तयिष्यति नवेति चिरायदूये.४

**गंधर्व.**— तूं ह्मणतेस, तें जुळतें. **रामा**च्या ठिकाणीं **सीते**चा प्रेमा अतिशय आहे ही गोष्ट लोकांत प्रसिद्ध आहे खरी.

**राक्षसी.**— ( हर्षानें म्ह० ) अरे, तूं **कराल** आहेस तर मी आतां पहिल्याप्रथम सर्वांचे आधीं जाऊन **गृध्रमुखी**ला हें तूं आल्याचें शुभवर्तमान सांगून तिजपासून कांहीं तरी बक्षीस उपटतें.

**गंधर्व.**— अगे, उगीच इतका आनंद कसला करितेस ? मी कांहीं **कराल** नव्हे, दुसराच कोणी आहें.

**राक्षसी.**—(खिन्न होऊन ह्मणते) काय ! शेवटीं **कराल** मेलाच ना !

**गंधर्व.**— त्याविषयीं अजून संशयच आहे कीं काय ?

**राक्षसी.**— अरेरे ! तर मग माझी मोठी निराशा झाली ! असो पण तूं **कराल** नाहींस तर कोण आहेस ?

**गंधर्व.**— **बिभीषणा**चा सेवक आहें.

**राक्षसी.**— बरें असो. **मंदोदरी** साहेबांस हें वर्तमान निवेदन करायास जातें.

( असें ह्मणून निघून जाते ).

**गंधर्व.**— आपणही हें **रावणा**कडील वर्तमान प्रथम **जनक**राजाला कळवून नंतर महाराज **महेंद्र** यांप्रत निवेदन करायास जावें. ( असें ह्मणून निघून जातो ).

( ही पूर्वोत्तर कथेची संगति ).

(तदनंतर **जनक**राजा व **शतानंद** हे दोघे पडद्याबाहेर येतात ).

**जनक**—

**श्लोक.**

यावन्निशाचरपती[1] मम कन्यकेला
मागे न, तोंचि तिस द्यावि रघूद्वहाला,
ऐसें मनीं, परि मुनींद्र[2] करूं शके हें
किंवा न, हाचि बहु धाक मनांत आहे.

---

टीप.—१ रावण. २ कौशिक.

शतानंदः— राजन्नलंविचारेण. किन्नजानीमहे महर्षेर्भगवतः कु-
शिककुलजलधिपारिजातस्य प्रभावमेतस्य ।

निष्प्रत्यूहतपःप्रसिद्धहुतभुग्ज्वालाभितप्तद्रुत
क्षात्राकारसुवर्णपिंडरचितब्राह्मण्यभूषोज्वलः,
यःस्वर्गांतरसर्गसाहसरसच्छेदार्थसार्थीभव
द्गीर्वाणांजलिपद्मकुड्मलशशीनालोकिलोकेनकिं । ५

अतः खलुनिर्वृत्तेपिसीतारामयोः पाणिग्रहणे लंकेश्वरः किंकरिष्य-
तीतिनशंकितव्यमस्माभिः. यतः खल्वयं

कृत्वारामं कुशिकतनयोजृंभकाद्यस्त्रमंत्र
ग्रामादेशप्रगुणितदुराधर्षवीर्यप्रकर्षं
शश्वद्विश्वत्रितयविजयोचंडदोःखंडमाजो
रक्षोनेतुः क्षपणनिपुणं कर्तुमेव क्षमेत. ६

( ततःप्रविशति कौशिकलक्ष्मणवेषाभ्यां विद्युज्जिह्वसारणाभ्यां
सह रामवेषो दशाननः )

**शतानंद**— राजा, हा धाक बाळगण्याची कांहींच गरज नाहीं. **कुशिक**वंशरूप समुद्रामध्यें कल्पवृक्षा प्रमाणेंच जो उत्पन्न झाला, त्या भगवान् **कौशिक**ऋषीचें सामर्थ्य आपणास ठाऊक नाहीं कीं काय?

## ओंव्या.

तपार्जेका परम दारुण, करिता झाला निर्विघ्न,
तोचि धगधगील कृशान[१], ज्वालामुक्त प्रचंड.
ऐशा तपोवन्ही करोन, आटिलें क्षात्ररूप सुवर्ण[२],
त्याचें ब्राह्मण्यरूप भूषण, करोनियां जो लेइला.
जो प्रतिस्वर्गसर्गसाहसी, गीर्वाणांच्या[३] अंजलिपद्मांशी
मुकुलित करणार शशी, सर्व जगाशी ठाउका.

ह्मणून **सीता** व **राम** यांचें लग्न झाल्यावरही **लंकेश्वर** काय करील कोण जाणे, असी आपणास शंका देखील घेणें नको. कारण कीं,

## श्लोक.

आर्श्रीच सांगोनि सुबीजमंत्रा देईल हा जृंभकमुख्य अस्त्रां,
होईल तेणें बहु शक्तिवृद्धि, वाढेल त्याची[४] अतिसूक्ष्मबुद्धी.
त्रैलोक्यजेता **दशकंठ** आहे, तयासही मारिल हाच पाहे,
ऐसें यया क्षत्रियबाळकातें[५] करील हा घोर मुनी स्वहातें.

( तदनंतर **कौशिका**च्या वेषानें **विद्युज्जिव्ह**, **लक्ष्मण**ाच्या वेषानें **सारण**, व **रामा**च्या वेषानें **रावण** असे तिघे पडद्या बाहेर येतात ).

---

टीप–१ अग्नि. २ क्षत्रियजातिरूपसुवर्ण. ३ देवाच्या. ४ रामाची. ५ रामातें.

दशाननः—

सुबाहुमारीचसुकेतुकन्यकाः
कुर्युर्मया यत्करणीयमुक्तं,
तथापि पाणिग्रहणायतन्व्या
धृतेनृवेषेप्यधृतं मनोमे. ७

विद्यु०— महाराज, कथमकांडेभवतः कातर्यं. १

त्वां दृष्ट्वा नवनीलनीरदनिभच्छायं, दधानंधनु-
र्बाणौ पाणियुगेन, पंकजदलस्निग्धेक्षणं, जानकी
दूर्वापल्लवगारुडाश्मघटनाकिर्मीरहारश्रियं,
रामोसाविति मोक्ष्यतेप्रमुदिता कंठेमधूकस्रजं. ८

दशाननः— नतावदहमभ्यर्थये; किंतु.

वेणी विलोकितैका, करकमलं हेममुद्रितं दृष्टं,
वांछा ममवामदृशो गात्रं द्रष्टव्यमन्यदखिलमपि. ९

सारणः—

सौंदर्यनिंदितरतिं, तवसन्निधाने
तामागतां, वरणमाल्यधरां, वरीतुं
आपादचूडमवलोक्यकृतार्थयद्वे
नेत्रे, गृहं निजमवाप्यतु विशतिंच. १०

दशाननः— (सदृष्टिक्षेपं) वयमेतेमैथिलावसथं प्राप्ताःस्मः.

रावण.— **आर्या.**

जें कां म्या सांगितलें, सुबाहु मारीच ताटिका यांस,
करितील तीं त्या कार्या, तद्विषयीं त्यां नसेचि आयास.
सीताहरणार्थ मियां, धारण केलें स्वरूप रामाचें,
परिमच्चित्त न धरितें धैर्या, वास्तव खराच मी काचें[१].

बिद्युज्जिव्ह— महाराज, भलत्याच वेळीं धैर्य टाकणें हें काय ?

**श्लोक.**

अभिनवजलदापरि[२] हे द्युती, करयुगीं शरचाप विराजती,
नयन सुंदर पंकज कीं जसें, मुखहि पूर्ण निशाकरसें दिसे,
ऐसें तुह्मांपाहुनि हाचि राम, मानील सीता मनिं पूर्ण काम;
दूर्वांकुरीं युक्त मधूकमाला[३] घालील कंठीं वरण्या तुह्मांला.

रावण.— दुसरें कांहीं मी मागत नाहीं. एक

**आर्या.**

वेणीच पाहिली म्यां, करहि तिचा हेममुद्रिका[४] सहित,
आतां इतरांगेंही देखाया चित्त होतसे तृषित.

सारण—

**श्लोक.**

रूपानें रतिहूनि सुंदर वधू माला करीं घेउनी,
जेव्हां येइल ती समीप तुमच्या उत्तुंग[५] पीनस्तनी,
तेव्हां पाहुनि पादमस्तकवरी दोहीं कृतार्थाकरा
नेत्रां आज विसांसही मग तुह्मी जाऊन लंकापुरा.

रावण.—( पाहून ह्म०) अहो आपण जनकराजा उतरला आहे ते-थें आलों ?

टीप-१ भितों. २ नूतन मेघाप्रमाणें. ३ मोहाच्या फुलांची माळ. ४ सोन्याच्या अंगठ्या. ५ उंच.

सुवर्णकेतकीवर्णसवर्णा यत्र वर्तते,

शंकरस्य जटाजूटे चंद्रलेखेव जानकी. ११

( प्रविश्य प्रतीहारी )

**प्रतीहारी.—** महाराज, विजयीभव.

**जनकः—** जीमूतक, विज्ञापय विज्ञापयितव्यं.

**प्रतीहारी.—** रामलक्ष्मणाभ्यां साकमत्रभवान्कुशिकनंदनः प्रतीहारभूमिंसंप्राप्तः.

**जनकः** ( सहर्षसप्रश्रयंच, ) भगवन्गौतमनंदनं, तत्रभवता कृतार्घ्यो भगवानानुषंगिकत्रैशंकवलोकनूतनपरमेष्ठी ककुत्स्थकुमाराभ्यां रामलक्ष्मणाभ्यां सहैवप्रवेशयितव्यः

**शता०—** तथेति. ( निष्क्रांतः )

**जनकः—**

कथ मिदंन्हृदयं मम कौशिके गृहमुपेयुषि राघव संगते,

शफरघट्टितनाल मिवांबुजं तरलतामुपयाति, करोमिकिं ११२

**शता०** ( ततः प्रविश्य शतानंदोजनकराजाय कौशिकादयइति विद्युजिव्हादीन्दर्शयति. )

**जनकः—** ( आसनादुत्थाय ) भगवन् वैदेहः सीरध्वजोहमभिवादये.

### अभंग.

सुवर्ण केतकी परी जीचा वर्ण, ऐसी सीता पूर्ण जेथें आहे.
शिवाच्या जटेंत जैसी चंद्रलेखा, तैसी असे देखा मनोहरा.

**चोबदार.**— ( आंत येऊन ह्म० ) महाराजांचा जयजयकार असो

**जनक**—अरे जीमूतका, काय जें निवेदन करायाचें असेल तें बोल.

**चोबदार.**— परमपूज्य जे कौशिकऋषि ते रामलक्ष्मणांसहवर्तमान दरवाज्यापाशीं प्राप्त झाले आहेत महाराज.

**जनक**—( हर्षानें व नम्रतेनें ) भगवन् गौतमनंदन, त्रिशंकुराजा करितां साहजिकपणें स्वतंत्र लोक निर्माण करण्याविषयीं नूतन ब्रह्मदेवच असा भगवान् कौशिकऋषि दारीं आला आहे, तर त्यास अर्घ्य समर्पण करून, रघुकुमार रामलक्ष्मण यांसहवर्तमान आंत घेऊन यावें.

**शतानंद**—उत्तम आहे. ( असें ह्मणून निघून जातो ).

**जनक**—

### श्लोक.

माझ्या घरीं कुशिकनंदन[1] राघवाला
घेवोनियां परमपूज्य मुनींद्र आला,
ऐसें असोनि मन कांपत फार कैसें ?
नालासें[2] मत्स्य झगडे तंव पद्म जैसें.

( तदनंतर )

**शतानंद**—( आंत येतो आणि विद्युज्जिव्हादिकों राक्षसांकडे बोट दाखवून जनकास म्हणतो) राजन्, हे कौशिकऋषी आणि रामलक्ष्मण आले आहेत.

**जनक**—( आसनावरून उठून ह्म० ) भगवन्, विदेहदेशींचा राजा सीरध्वज हा चरणाप्रत वंदन करितो.

---

टीप.- १ कौशिक. २ कमळाचे देठास.

**विद्यु०**— स्वस्तिभवते महाराजजनकाय.

**सारणः**— ( अपवार्य दशाननंप्रति )

राजन्नस्मै नरेंद्राय स्वतः स्वस्तिभवेन्नकिं ?

जानकीं परिणीयत्वं जामाता भवितासि यत्. १३

**दशा०**— ( सहर्ष ) एवमेवैतत्.

**विद्यु०**— ( भ्रूसंज्ञया दशाननं जनकाभिवादनायचोदयति. )

**दशा०**— ( अपवार्य, सारणंप्रति )

यस्य प्रणामसमयं प्रतिपालयंति नाथादिशामपि, तथाप्रणयापराधे मंदोदरीमपिनयः सहतेप्रणंतुं, सोहं किमेनमभिवादयितुंनलज्जे? १४

**सारणः**— ( स्वगतं ) नूनमस्यदुरहंकारग्रथितत्हृदयस्य जानकीलाभोपि ननिश्चयकोटिमालंबते. ( प्रकाशं ) महाराज, नयुक्तं भवतः प्रस्तुतं प्रतीपमाचरितुं.

**दशा०**— तात, दाशरथिरभिवादये.

**सारणः**— तदेवपठति.

**जनकः**— वत्सौ, दीर्घायुषौ भूयास्तां.

**शता०**— भगवन्गाधिसूनो,

**विद्युज्जिह्व**— **जनक**राज, अस्तु ते कल्याणम् !

**सारण**.— ( **रावणा**कडे हळूच ह्मणतो ).

**श्लोक.**

> **जनका**लागि कल्याण होईलचि स्वयें तरी,
> **सीते**ला वरुनी तुह्मी[1] जांवई व्हाल हो जरी.

**रावण**— ( ईर्षानें ह्म० ) होय. हें वास्तविकच आहे.

**विद्युज्जिह्व**— ( **जन**काप्रत वंदन करण्याविषयीं **रावणाला** डोळ्यानें खुणवितो ).

**रावण**.— ( **सारणा**कडे वळून हळूच ह्मणतो ).

**श्लोक.**

> दिक्पालही नमति ज्या धरुनी भयास,
> **मंदोदरी** प्रणयकोपित झालि यास,
> तीतेंहि जो नति कदापि करीत नाहीं,
> त्याला[2] नरास नमणें ! बहु लाज, बा, ही.

**सारण**— ( मनांत ह्म० ) काय ह्याच्या मनांत दुरहंकार भरला आहे पहा ! **जानकी** आपणाला मिळतेच असा कांहीं ह्याच्या मनाचा अजूनही निश्चय होत नाहीं ! ( मोठ्यानें ह्म० ) महाराज, प्रस्तुत आपण जो मार्ग धरिला आहे, त्याला विरुद्ध करणें आतां उचित नाहीं.

**रावण**— **जनक**रावजी, मी **दशरथ**पुत्र चरणाप्रत वंदन करितों !

**सारण**— ( तसेंच ह्मणून नमस्कार करितो ).

**जनक**— वत्सांनो, दीर्घायुषी व्हा बरें !

**शता**०— ( **विद्युज्जिह्वा**प्रत ह्मणतो ) भगवन् **कौशिक**,

---

टीप—१ रावण. २ त्या रावणाला.

परस्परसमावेतौ, प्रमाणेंगितचेष्टयोः

अनयोः कतरोरामो लक्ष्मणः कतरोनयोः ? १५

**विद्यु०**— ( स्व० ) नकश्चिदपि; किंतुरावणसारणौ. ( प्रकाशं )

नवांबुदश्यामलएषरामो वात्सल्यकुञ्चितष्ठतियः कनिष्ठे,

सौमित्रिरेषद्रुतहेमकांतिर्यः प्रश्रितो ज्यायसिवर्तनेन. १६

**दशा०**— ( अपवार्य सारणंप्रति ) कुतोविलंबते जनकः कन्या-

मानेतुं ?

**सारणः**— ( स्वगतं ) अहो, मूर्खजनमूर्द्धन्यस्य कीदृशमौत्सु-

क्यं ! नन्विदानीमेव जनकदर्शनमेतस्य. ( प्रकाशमपवार्य ) म-

हाराज, क्षम्यतां क्षणमात्रं.

**दशा०**— ( अपवार्य सामर्ष सारणं,

मन्येहंतापसेतस्मिन्मारीचेन त्रिमातिते

असौ कौशिकशब्देन ब्राह्मण्यादाश्रयीकृतः. १७

**सार०**— ( अपवार्य ) तदस्यापाणिग्रहणं जानक्याः.

श्लोक.

दोघे हे सारिखे मानें वयें आचरणें तसे,
यांत **लक्ष्मण** तो कोण ? **राम**ही कोण हो असे ?

**विद्युज्जिव्ह**— ( मनांत ह्मणतो ) यांत त्यांतून एक देखील नाहीं. हे **रावण** व **सारण** आहेत. ( मोठ्यानें ह्म० )

श्लोक.

नवांबुदश्यामल[1] **राम** जाण, प्रेमा जयाचा अनुजीं[2] सुपूर्ण,
**सौमित्रि** हा तप्तसुवर्णकांती[3], ज्येष्ठा[4] अतिश्रेष्ठ गणी स्वचित्तीं.

**रावण**— ( एकीकडे वळून हळूच **सारणा**प्रत ह्म० ) अरे ! कन्येला आणायास **जनक** आतां उगाच उशीर करितो हें काय ?

**सारण**— ( आपल्याशीं ह्म० ) अरे मूर्खशिरोमणी नव्हे हा ? नुकती **जन**काची भेट झाली न झाली, तोंच ह्याला पहा काय घाई झाली आहे ती ? उतावळा नवरा आणि ढोंपराला बाशिंग असें करितो, याला काय ह्मणावें ? ( **रावणा**स हळूच ह्म० ) महाराज, क्षणभर धीर धरा धीर धरा ! इतकी घाई काय करितां ?

**रावण**— ( क्रोधानें **सारणा**स हळूच ह्म० ).

आर्या.

वधिला मुनि[5] **मारीचें**, ह्मणूनि तद्वाचिशब्द[6] जो वहिला
**कौशिक** हा, त्यार्णेची, वाटे मज, हाचि आज आश्रयिला.

**सारण**— ( **रावणा**स हळूच ह्म० ) तेंही **जान**कीचें पाणिग्रहण होईपर्यंत, पुढें नव्हे.

---

टीप.—१ नूतन मेघाप्रमाणें श्याम. २लक्ष्मणाच्या ठिकाणीं. ३तापलेल्या सोन्या प्रमाणें ज्याची कांति. ४रामाला. ५कौशिक. ६तद्वाचक शब्द.

शता०—

पुत्रार्थंचरतस्तपो दशरथादेतावतानेहसा
कृच्छ्रेणव्यतिलंघितेषुवयसां षष्ठौसहस्रेष्वपि
चत्वारोजनिताः सुतास्त्रिभुवनालंकारभूतागुणै-
र्दिष्ट्यापादयिता विभांडकसुतेनातिप्रमोदामहे. १८

विद्यु०—( स्व० ) अयंखल्वहल्यासुतः

मारीचेनहतंश्रुत्वा मध्येपदविराघवं
दुःखंचलप्स्यते तावद्यावान्मोदोस्यजन्मनि. १९

( प्र ) नकेवलं भवतां प्रमोदः, अपितु जगन्मात्रस्य.

दशाननः— ( अपवार्य ) सारण, जानकीपाणिग्रहणमित्यमृत मयान्यक्षराणि श्रावयसि. ममतु ताटकया सानुचरस्य कौशिकस्य पुनरागमनप्रत्यूहः सुकरोवानवेतिपारिप्लवंमनः १

( विमृश्य )

वत्स, व्याम्रियसे वृथा परिमितायुष्यैर्मनुष्यैः समं,
योद्धुं युद्धमदोस्ति तेयदि सुरैर्योद्धव्यमोजस्विभिः
इत्युक्तोपिसुरार्षिणायदिपुरा हन्यामजस्यात्मजं,
रामोयं क्रमवे १ दिदेहतनयारागः क्वाजृंभतां १२०

शतानंद- **श्लोक.**

झालेसाठसहस्र वत्सर वया, नाना प्रयत्नीं तसे,
केलें पंक्तिरथें[1], परंतु फल तें नाहींच झालें असे.
केली इष्टि जईं विभांडकसुतें[2], झाले तईं पुत्र हो,
चाऱ्ही भूषणभूत सर्व जगतां, आनंद आम्हां अहो.

**विद्युज्जिव्ह**—( मनांत ह्म०) हाँ! हा अहल्येचा पुत्र ना?

**आर्या.**

मारीचें रामाला वधिलें मार्गांत यास ऐकुनियां
होईल दुःख तितुकें, जितुका आनंद सर्वजन्मिं[3] यया.

( मोठ्यानें ह्म०) अहो, तुह्मालाच आनंद झाला असें नाहीं; सर्व जगालाही आनंद झाला आहे.

**रावण**—( सारणाला हळूच ह्म० ) सारणा, " जानकीचें पाणिग्रहण " हीं अमृतमय अक्षरें तूं मला ऐकवितोस खरा, पण माझें ह्रदय स्थिर नाहीं! कारण परिवारांसुद्धां कौशिक अयोध्येहून येत आहे, त्याच्या येण्यास प्रतिबंध करावा ह्मणून ताटिकेला तिकडेस योजिलें. पण तिच्यानें तें कार्य होईल कीं नाहीं हा मला मोठा संशय आहे! काय करावें?

( मागील स्मरण करून ह्म० ) तेव्हांच गोष्ट चुकली!

**श्लोक.**

वत्सा, व्यर्थ तुझें नरांसह रण[4], स्वल्पायुषी हे खरे,
आहे कंडु तुझे भुजांत, तरि तूं देवांसवें मांड, रे,
ऐसें नारदवाक्य नाइकुनि मी राजो[5] जरी मारितों
कैंचा तैं सुत राम, तद्गत[6] तसा सीतानुरागौघ[7] तो.

टीप.—१ दशरथें. २ ऋष्यशृंगानें. ३ सर्व जन्मांत. ४ मनुष्यांबरोबर युद्ध. ५ दशरथराजाला. ६ रामगत. ७ सीतेची प्रीति.

**सारणः**—( अपवार्य ) नारदगिरा मनुष्यैरयुध्यमानेन भवता दशरथो विमुक्त इतीदमुपपन्नं. शृणु तावत्

अत्युद्दामतपःप्रसादितपुरारातिप्रतिष्ठापितं
ज्योतीरूपमहास्त्रमंत्रपटलीनिर्व्यूढदोर्विक्रमः,
दैतेयाहवदर्शितौजसमसौ कस्मादजस्यात्मजं
सर्वक्षत्रियकंठकर्तनपरो वीरो जहौ भार्गवः १ २१

**दशा०**—( अपवार्य सामर्षोत्साहं ) सम्यगनुस्मारितोस्मि. नन्वनेनैव प्रियसुहृद्दापातयिष्यामि सहसूनुम्.

**सारणः**—( अपवार्य ) यदि ताटकादिभिरनिहतौ रामकौशिकौ भवेतां.

**जनकः**— भगवन्कुशिकनंदन,

अजात्मजसुतोदयः श्रवणयोरभूदुत्सवो,
दृशोरपि च सांप्रतं मुहुरवेक्ष्यमाणाविह,
घटेत दुहितुः पुनः परिणयश्च रामेण चे
त्तदा न मम केवलं, निमिकुलस्य नित्योत्सवः. २२

तदत्र भवतो भवत्वद्यैव यज्ञदीक्षाप्रवेशः ; वयमपि वत्साया विवाहमंगलार्थं मारभामहे.

**सारणः**— ( अपवार्य दशाननंप्रति ) परिणयः स्वामिना चेदितोपि नित्योत्सवः

**दशा०** — कः संदेहः १

**सारण**— ( **रावण**ास हळूच ह्मणतो ) **नार**दानें सांगितल्यावरून आपण मनुष्यांशीं युद्ध करणें टाकिलें, तेव्हां आपले हातून **दश-रथ** हा अर्थात् सुटला. हें तर नीटच आहे; पण हें आश्चर्य पहा!

### श्लोक.

**सां**बाला करुनी प्रसन्न परमें उग्रें तपें आपणा,
साधी जो विविधास्त्रमंत्रपटला, उद्युक्त जो मारणा
सर्व क्षात्रकुलास, **भार्गव**[१] असा वीर प्रतापी मही[२]
त्यानें सोडियलें कसें **दशरथा** जो[३] मारि दैत्यांसही.

**रावण**— ( क्रोधानें व उत्साहानें **सार**णास हळूच ह्म० ) होय, बरें स्मरण दिलें! **भार्गव** तर माझा परम मित्र आहे. त्याचे हातानें पुत्रांसुद्धां **दशर**थाचें कांडात काढीन.

**सारण**— ( **रावण**ाला हळूच ह्मणतो ) अहो जर **ताटका** व **मारीच** यांनीं **राम** व **कौशिक** यांना न मारिलें तरची ही गोष्ट कीं नव्हे?

**जनक**— भगवंता **कुशिकनंदना**,

### श्लोक.

सुपुत्र बहुतां दिनीं **दशर**थास जाले, मनीं
प्रमोद तइं ऐकुनी, अजि तयांस हो पाहुनी;
मदीयतनये सर्वे जरि विवाह याचा घडे,
मलाचि न सुयोग हा **निमि**कुलास[४] ही आवडे.

तर अहो मुनीश्वर, आपण आतां यज्ञास आरंभ करून दीक्षित व्हावें. आह्मींही वत्सेचे विवाहमंगलास प्रारंभ करितों.

**सारण**.— ( हळूच **रावण**ाप्रत ) महाराजांबरोबर कन्येचा विवाह होईल तर मग तो उत्साह याहूनही अधिक चिरस्थायी घडेल.

**रावण**.— यांत काय संशय?

टीप.—१ परशुरामानें. २ पृथ्वीवर. ३ दशरथ. ४ निमिवंशास.

**विद्यु०**— ( स्व० ) इदंकथंमापतितं. भवतुकोदोषः ? यदिकौशिको निशाचरेण निहतःस्यात्सर्वंघटेत. नैवंचेदंतर्धातव्यमस्माभिः.

( प्रकाशं ) तथैवमेतद्दयं.

**शता०**— राजन्नूर्मिलापि लक्ष्मणायदातव्या.

**विद्यु०**— ( अपवार्य ) सारण, तवाप्यागमनस्यफलं भविष्यति. मम तुनिष्फल मागमनं.

**सारणः**— ( अ० ) मामैवं.

कौशिकस्यसुतैः, शिष्यै र्घटोध्नीभिश्चधेनुभिः,

सहैवगृहिणीयज्ञे गृहिणीते भविष्यति.२३

**विद्यु०**— ( अ० ) सारण, कुतोजरठजानीकरेण मामुपहससि ?

**जनक**— भगवन्गौतमनंदन, नतावदेवं, अपितु ममानुजः कुशध्वजो मिथिलानगरात्

भरताय प्रदातव्या शत्रुघ्नाय तथेतिच

मांडवींश्रुतकीर्तिंच प्रास्थापयदिहात्मजे. २४

**दशाननः**— ( अपवार्य ) सारण, पुनरपि भरतशत्रुघ्नवेषाभ्यां द्वाभ्यां सहैवनागतं मयाजाल्मेन.

**विद्युज्जिव्ह**.— ( मनांत ह्मणतो ) अरे हें यज्ञदीक्षेचें लचांड कोठून उभें राहिलें ? बरें असो काय चिंता आहे ? जर आपले राक्षसांनीं **कौशि**काला मारून टाकलें असलें तर मग सर्व यथास्थित साधून घेतां येईल. नाहीं तर मग गुप्त होऊन जावें लागेल. ( मोठ्यानें **जन**कास ह्म० ) होय, माझेही मनांत तसेंच आहे.

**शतानंद**— राजन्, आपली **उर्मिला** आहे तीही परती **लक्ष्म**णाला द्यावी.

**विद्युज्जिव्ह**.— ( एकीकडे वळून **सारण**ास ह्मणतो ) **सारणा**, तुझ्याही येण्याचें फळ होणारसें दिसतें. एक माझी मात्र यातायात फुकट गेली.

**सारण**— ( हळूच म्हणतो ) फुकट कशानें ?

**श्लोक.**

शिष्ये तसे पुत्रही **कौशि**काचे धेनू सवत्सा पशुही तयाचे
भार्येसह प्राप्त तुलाच सारे, खेदा करीसी मग तूं कसा रे ?

**विद्युज्जिव्ह**— ( एकीकडे **सारण**ास हळूच ) **कौशि**काची स्त्री मला देऊन मग " थेरड्या बायकोचा दादला, थेरड्या बायकोचा दादला " असी माझी फजीतीच करायाची कीं नव्हे ?

**जनक**—भगवन् **गौतमनंदना**, **उर्मिला लक्ष्मण**ास द्यायाची इतकेंच नाहीं, तर माझा धाकटा बंधु जो **कुशध्वज** यानें **मि**थिलेहून,

**श्लोक.**

**भरता** आणि **शत्रुघ्ना** द्याव्या तुह्मी ह्मणूनियां
**मांडवीश्रुतकीर्ती**यां दिधले पाठवूनियां.

**रावण**.—(**सारणा**कडे वळून हळूच) **सारणा**, मी पहा कसा मूर्ख कीं, **भरतशत्रुघ्नांचीं** रूपें देऊन अणखी दोघेजण बरोबर आणिले नाहींत !

**सारण.**— ( अपवार्य ) आगतोपि कौशिकवेषेणहतो विद्युज्जिव्हश्चे. त्किंवक्ष्ये ?

**शता०**— भगवन्कौशिक, किंदशरथो भरतशत्रुघ्नाभ्यां सहनानीतः ?

**सारणः**— ( अपवार्य दशाननंप्रति ) प्रागेवहिमयोक्तं, सपुत्रदारं दशरथमुपनिमंत्रयितुंकौशिकोगतइति. विद्युज्जिव्हेनतुतदनुरूपो मंत्रोनकृतः

**दशा०**— ( अपवार्य ) सारण, भवत्वेवं. जानकीदर्शनाययतितव्यमिदानीं.

**विद्यु०**— सपरिवारो दशरथः पथिविश्रम्यविलंबते.

**जनकः**— कः कोत्रभोः ?

**प्रतीहारी**— ( प्रविश्य ) आज्ञापयतुदेवः

**जनकः**— भगवतः कौशिकस्य पादवंदनाय कन्याजनः समानीयतां

**प्रतीहारी**— ( तथेतिनिष्कांतः )

**दशा०**— ( अपवार्य ) सारण, दैवेनैव मयिपक्षपातः कृतः. ( सोत्कंठं )

इदानीमानीतायदिरघुकुमारेणसदृशीं
दृशामेपश्यंती तनुमवनिकन्याविकिरतु
प्रसादोत्कर्षेण प्रणयरसनिष्पंदपिशुना-
स्कटाक्षानुन्मीलत्कमलवनसौभाग्यजयिनः २५

**सारण.**— ( हळूच ) अहो, **विद्युज्जिव्ह** तर आला आहेना ? पण तो **कौशिक** वेषानें ओळला गेला ! मग मी तरी काय सांगावें?

**शतानंद.**— ( **विद्युज्जिव्हा**प्रत म्ह० ) अहो मुनींद्र, आपण **भरत शत्रुघ्नां** सहवर्तमान **दशरथ** राजाला आणिलें नाहीं का?

**सारण.**—( हळूच **रावणा**स म्ह० ) मी महाराज, पहिल्यानेंच नाहीं सांगितलें कीं, बायकांमुलांसुद्धां **दशरथरा**जाला येण्याविषयीं **कौशिक** हा निमंत्रण करायास **अयोध्ये**प्रत गेला आहे म्हणून ? पण **विद्युज्जिव्हा**नें त्याप्रमाणें बेत ठेविला नाहीं, त्याला काय करावें !

**रावण**— ( हळूच ) **सारणा**, जें झालें तें बरेंच झालें ! पण आतां **जानकी** दृष्टीस पडेल असा यत्न चालीव.

**विद्युज्जिव्ह**— ( **शतानंदा**स म्ह० ) नाहीं कसा ? त्याला सर्व परिवारासुद्धां आणिलें आहे. पण मार्गी विश्रांती घेण्यामुळें त्याला विलंब लागला.

**जनक**— अरे तेथें कोण आहे रे !

**चोबदार.**— ( आंत येऊन म्ह० ) महाराज, काय आज्ञा आहे ?

**जनक**— भगवान **कौशिक**ऋषि आले आहेत. यांचें पादवंदन करण्याकरितां मुलींना घेऊन ये बरें.

**चोबदार**— आज्ञा महाराज, ( असें म्हणून निघून जातो ).

**रावण**— ( **सारणा**ला हळूच ) **सारणा**, दैवानेंच माझा पक्ष धरिला खरा. ( उत्कंठित होऊन म्हणतो ).

**श्लोक.**

अतां माझी रामापरि तनु विलोकूनि तनया
विदेहाची वर्षू मजवरि कटाक्षां गतभया,
जयांच्या योगानें प्रणयरस हा सूचित असे,
प्रफुल्लाब्जश्रींतें यदमलसुशोभा[1] हरितसे.

---

टीप—१ ज्यांची ( कटाक्षांची ) विमलकांति.

( नेपथ्ये )

विद्युज्जिव्होविदधतिवपुर्माययागाधिसूनो-

र्यस्सौमित्रेर्वहतितदिदं सारणो, राक्षसेंद्रः,

रामोभूत्वा, जनक, भवतः कन्यकांवोढुमाभ्यां

संप्राप्तोसा, वितिकथयत, द्वारि येत्वस्य संति. २६

( सर्वे आकर्णयंति )

**दशा०**—( सभयकंपं, सोद्वेगं, विद्युज्जिव्हंप्रति. ) केनायमस्मद्वृत्तांतः जनकाय निवेद्यते ? नह्ययं केनाप्यन्येनविज्ञातः .

**विद्यु०**— ( अपवार्य सभयकंपं ) महाराज, किंब्रवीम्येतदाश्चर्यं. मम- गृहिणीमंतरेण वृत्तांतोयं केनापि नशक्यो विज्ञातुं.

**सारणः**— ( स्वगतं ) केनचिद्दुरात्मनामम्मोयमस्मत्संरंभः. ( प्रका- शं ) शतानंद, विचारणीयं कोयमाघोषयतीति.

**शता०**— ( स्व० ) कथमेतत् ! रावणसारणविद्युज्जिव्हारामल- क्ष्मणकौशिकवेषाः समागताः ! ( प्रकाशं ) लक्ष्मण, विचार- यिष्यामः.

**जनकः**— ( सविचारं स्वगतं )

असौ घटयितुं प्राप्तः कौशिको मेमनोरथं

इति स्थितमुदाऽस्माभि रन्यथेदं प्रवर्त्तते ! २७

( इतक्यांत पडद्यापलीकडे शब्द होतो. )

### श्लोक.

**विद्युज्जिव्ह**चि जाहला **कुशिकज** प्रख्यात, **सौमित्रि** हा
झाला **सारण**, राक्षसेंद्र[1] हि तसा **राम**स्वरूपी पहा,
आले हे ठकवूं तुह्मां, **जनकजे** हारावया इच्छिती,
सांगावें **जनका**स त्यांनिच असें, जे देहली[2] राखिती.

( सारे कान देऊन ऐकतात. )

**रावण**—(भयानें सकंप होऊन **विद्युज्जिव्हा**स हळूच ह्मणतो) अरे, हें आपलें गुप्त वर्तमान **जन**कास कोण बरें कळवीत आहे ? ह्मटलें ह्मणजे आपणाखेरीज इतर कोणाला ही गोष्ट ठाऊक नाहीं.

**विद्युज्जिव्ह**— ( भीतीनें सकंप होऊन **रावण**ाला हळूच ह्मणतो ) महाराज, काय ह्मणावें आतां ? ही तर आश्चर्या सारिखी गोष्ट आहे ! माझ्या स्त्रीला मात्र हें ठाऊक होतें. तिजशिवाय दुसरे कोणालाही कळलें नाहीं !

**सारण**.— ( हळूच ह्म० ) कोणी तरी दुष्टानें ही आपली मसलत बिघडून टाकिली ! ( उघडपणें ह्मणतो ) अहो **शतानंद**, ही कोणी आरोळी दिली याचा शोध करावा बरें ?

**शतानंद**— ( मनांत ह्म० ) हें कसें झालें ? **रावण**, **सारण**, व **विद्युज्जिव्ह** हे तिघे **रामलक्ष्मण** व **कौशिक** यांचीं रूपें घेऊन आले आहेत ह्मणजे काय ? ( मोठ्यानें **सारण**ास ह्म० ) **लक्ष्मणा**, शोध करवितों.

**जनक**.— ( विचारपूर्वक मनांत ह्म० ).

### अभंग.

माझा मनोरथ साधोनी द्यायाला, कौशिक हा आला येथें आतां
ह्मणूनीयां हर्षयुक्त माझें चित्त, परी विपरीत प्राप्त झालें.

---

टीप.—१ रावण, २ देवडी.

(प्रकाशं) कः कोत्रभोः ?

प्रतिहारी०— (प्रविश्य) आज्ञापयतुमहाराजः.

जन०- केनैवमुक्तमिति विचार्यतां.

प्रतिहारी०— राजन्, किमन्यद्विचारणीयं. ?

गिरमेवमुदीर्यकोपि दिव्यः
पुरुषोस्मान्दिवमुत्पतन्प्रयाति,
उपसर्पति रामलक्ष्मणाभ्या-
मपराभ्यामपरश्चगाधिसूनुः ! २८

जन०— भगवन्शतानंद, कथमेतत् ?

शता०— (अपवार्य जनकंप्रति) इंद्रदूतेनेदमुक्तंस्यात्. किंच प्रविष्टानां प्रवेक्ष्यतांच रूपनिर्धारणं क्रमेण कुर्मः. (प्रकाशं, विद्युज्जिव्हंप्रति) भगवन्कुशिकनंदन, किमेतत् ?

विद्यु०— (स्वगतं) चौराइवकौशिकेन यामिकेन निरुद्धाःस्मः ! (प्रकाशं) आगच्छंत्वस्मद्वेषभाजोराक्षसाः. वयंत्वन्यत्रगच्छामः.

दृशा०— (अपवार्य सारणंप्रति) किंक्षत्रियबटुनाताटकादयो हतामवेयुः ?

सार०— (अपवार्य) नैतत्संभाव्यते.

ताटकां यदिमारीचं सुबाहुमपिराघवः
शक्नोतिहंतुं, हन्याच्च सर्वानपिनिशाचरान्. २९

( मोठ्यानें बोलतो ) कोण आहे रे तिकडे ?

**चोबदार.**— ( आंत येऊन ह्म० ) आज्ञा महाराज.

**जनक.**— आतां हे कोणी आरोळी मारून सांगीतलें याचा शोध करून इकडे कळीव.

**चोबदार.**— महाराज, शोध करण्याजोगें कांहीं नाहीं.

## आर्या.

स्वर्गी उडून गेला दिव्यपुरुष एक बोलुनी ऐसें;
आले द्वारीं दुसरे **कौशिक, सौमित्र, राम** हेहि तसे.

**जनक.**— भगवंता **शतानंदा**, हें काय आहे ?

**शतानंद**— ( एकीकडे वळून **जन**काप्रत हळूच ह्म० ) **इंद्रा**चे दूतानें हें सांगितलें असेल असें वाटतें ! असो आतां आलेले आणि येणारे यांतून सत्य कोणते याची परीक्षा करणें क्रमाक्रमानें करूं. ( उघडपणें **विद्यु**ज्जिव्हाप्रत ह्म० ) भगवंता **कुशिकनंदना**, हें कसें काय आहे ?

**विद्युज्जिव्ह**— ( मनांत ह्म० ) **कौशि**कानें आह्मास गस्तवाल्यानें चोर कोंडावे तसें कोंडून टाकिलें. काय करावें ? ( मोठ्यानें ह्म० ) आमचे द्वेष करणारे जे राक्षस ते येवोत बिचारे ! आह्मी तर, बाबा, आतां येथून जातों.

**रावण**— ( **सारण**ास हळूच ह्म० ) **सारणा**, यावरून त्या क्षत्रियबटूनें **ताटि**कादिकांस मारून टाकिलें असें वाटतें !

**सारण**— ( **रावण**ाला हळूच ह्म० ) अँः; ही गोष्ट संभवत देखील नाहीं ! दुसरें सांगतों.

## श्लोक.

**ताट**केला, **सुबा**हूला, **मारी**चालाहि **राम** हा
मारी तरी मारिल हा सर्वांही राक्षसां पहा.

**दशा०**— ( अपवार्य विद्युज्जिह्वंप्रति ) किंकरणीयमस्माभिः ?

**विद्यु०**— ( अपवार्य दशाननंप्रति ) तिरस्करिणीप्रभावेनात्मनस्तिरोधायसर्वमवेक्षमाणायथोचितं विधास्यामः.

**जन०**— ( अपवार्य शतानंदंप्रति ) यथापरस्परमेतेसमुद्विग्नामंत्रयंते, तथामन्येराक्षसाएवागमिष्यंतीति.

**शता०**— ( अपवार्य ) ममाप्ययमेववितर्कः.

**विद्यु०**— जनकराज, किंविचारेण ? वयमिदानीमन्यत्रगच्छामइत्युक्तमेव. यथोचितंसंभावनीयोदशग्रीवः. मापुनरस्मैकन्यादीयत इतिवादीः.

**जनकः** ( तथेत्युत्थायप्रांजलिः पंथानंदर्शयति )

( दशाननादयउत्थायनिष्क्रांताः, तिरस्कारिणीप्रभावतिरस्कृताकृतयोनातिदूरेप्रविष्टाश्च )

**शता०**— राजन्, यथोचितंकृतार्घ्यानिदानीमागतान्कौशिकादीन्प्रवेशयामि इतिनिष्क्रांतः )

( ततः प्रविशति रामलक्ष्मणाभ्यांसहकौशिकः )

**कौशिकः**— ( स्वगतं )

**रावण**— **विद्युज्जिव्हास** हळूच ह्म० ) आतां आपण कसें करावें बरें ?

**विद्युज्जिव्ह**— ( **रावाणस** हळूच ह्म० ) तिरस्करिणी विद्येच्या बळानें गुप्त होऊन येथें काय होतें तें सर्व पाहून मग जें उचित दिसेल तें करावें, दुसरें काय ?

**जनक**— ( **शतानंदा**कडे वळून हळूच ह्म० ) ज्या पेक्षां हे असे उद्विग्न होऊन आपापल्यांत बोलत आहेत, त्यापेक्षां हे राक्षस नव्हत; तर जे येणारे तेच राक्षस होत असें वाटतें.

**शतानंद**— ( **जनका**कडे वळून हळूच ह्म० ) होय, मलाहि असेंच वाटतें.

**विद्युज्जिव्ह** — **जनक**राजा, आतां विचारांत पडण्याचें कारण नाहीं. आह्मी येथून जातों ह्मणून तुह्माला पूर्वीच सांगितलें. आतां **रावण** येईल, त्याचा सत्कार चांगला करा, त्याविषयीं आमचें सांगणें कांहीं नाहीं. परंतु 'तुला कन्या देतों' असें मात्र बोलूं नका ?

**जनक**— बरें आहे, तसेंच करीन. ( असें म्हणून उठतो व हात जोडून ह्मणतो ) यावें महाराज, हाच मार्ग. ( असें ह्मणून वाट दाखवितो ).

( **रावण**, **विद्युज्जिव्ह** आणि **सारण** हे उठून निघून जातात, आणि तिरस्करिणी विद्येच्या बळानें गुप्त होऊन जवळच उभे राहतात.

**शतानंद**— राजन्, दुसरे **कौशिका**दिक बाहेर आले आहेत. त्यांनाही यथोचित अर्घ्य देऊन आंत घेऊन येतों. ( असें ह्मणून बाहेर जातो ).

( तदनंतर **रामलक्ष्मणां**सहवर्तमान **कौशिक**ऋषी येतो ).

**कौशिक**— ( मनांत ह्म० ).





जानक्या रघुनंदनस्य हृदयं लग्नं दृढं कारितं,

यूनोःकिंनपरस्परप्रणयिनोर्योगः प्रशंसास्पदं ।

दृष्ट्वास्वभगतं रघूद्वहमिमं सीता सखीसेविता

नन्वेपानवपल्लवास्तरगता नक्तंदिवंताम्यति. ३०

किंच अस्माभिः सुविहितमिदानीं जृंभकप्रमुखदिव्यास्त्रमंत्रग्राम-

मुपविशद्भिरेतस्मैसलक्ष्मणायरामाय. यदस्मिन्स्वजनविनिपातेन

सीतापाणिग्रहणेनच जनितामर्षेपि नाक्रमेत पराक्रमस्त्रिभुवनवि-

जयोदग्रतेजसोपि दशग्रीवस्य. अपिच.

मायाविनोरात्रिचरान्विदित्वा

विश्लिष्टवान्पंक्तिमुखेनराज्ञा

निर्विघ्नमुद्वाहकृतेकुमार्याः

स्वस्थानमाप्याद्रुतमागतोस्मि. ३१

(प्रकाशं) वत्सौ रामलक्ष्मणौ, जनकराजंप्रतिभवद्भ्यां प्रश्रिताभ्यां

भवितव्यं. यतः

याज्ञवल्क्याद्दषेरेषप्राप्योपनिषदोगुरोः

तीर्णशोकार्णवः पूज्यःसर्वेषामपियोगिनां.३२

**रामलक्ष्मणौ—** बाढमेवंभवावः.

### श्लोक.

रामीं प्रीति अखंड मी जडविली पृथ्वीसुतेची बरी,
त्यांचा स्तुत्य न योग, हार्द[1] करिती जो एकमेकावरी ।
स्वर्मी पाहुनि राघवास विरहें तया सखीयुक्त कीं
पाल्याचे शयनीं निजे, निशिदिनीं भोगी व्यथा, जानकी.

दुसरें, आम्ही रामलक्ष्मण या उभयतांसही जृंभकादिक दिव्यास्त्रांचे मंत्राचा उपदेश केला, हें ठीकच केलें. कारण, स्वजनाचा नाश झाल्यामुळें आणि सीता व राम यांचें लग्न झाल्यामुळें रावणास मोठा क्रोध जरीं आला, आणि मूळचाही तो त्रिभुवनास जिंकणारा असा मोठा पराक्रमी आहे, तरीं, त्याचें रामापुढें कांहीं चालूं नये, असें या अस्त्रांचे योगानें रामास सामर्थ्य आलें आहे. आणखी,

### आर्या.

मायावी रावण हा याची आणी विदेह राजाची
संगति न होय ऐसी केली यत्नेंचि युक्ति मी साची.
आतां निर्विघ्नपणें विवाह यांचा करोनि द्यायाला
घेउनि आलों सत्वर निजाश्रमीं या नरेंद्रतनयाला.

( मोठ्यानें स० ) वत्सांनो, रामलक्ष्मणांनो, तुह्मी जनकराजाप्रत फार नमून असावें बरें, कांकीं,

### श्लोक.

याज्ञवल्क्योपदेशानें तत्वज्ञानीच जाहला,
गेला शोकार्णवा पार योग्यांही पूज्य तो भला.

**रामलक्ष्मण.**— उत्तम आहे, आम्ही नमूनच असूं.

---

टीप.-१ प्रीति.

**लक्ष्मणः—** भगवन्नेतस्य राज्ञोलांगलोल्लिखितभूमेरुत्थिता सीतानाम तनयेति महदिदमाश्चर्यमाकर्ण्यते.

**कौशिकः—** अथकिं. १

**रामः—** ( स्व० सानुस्मरणं )

तन्वंग्याः पतनं तथाहुतवहे मायेतिनिश्चिन्वतो-
ध्यातंकेनचमन्युनाचहृदयं नोन्मुक्तमद्यापिमे,
मिथ्याभूतमपिव्यतिक्रममिमंस्मृत्वाविदेहाधिपे
पौलस्त्यस्य शिरांसिसंयतिदशाप्युच्छेत्तुमुत्कंठते. ३२

अपिच

वैतानंव्यपदिश्यकर्मवसुधाकन्याविवाहोत्सवं
निर्वोढुंसहसासमानयतिमांसर्वैः समंबंधुभिः
आर्यःश्रीकुशिकात्मजोयमितिमे चेतः कथंवर्तते,
ध्यायत्याश्वसिति, प्रसीदति, तथास्वच्छंदमानंदति. ३३

( प्रकाशं ) भगवन्, इदमन्यदद्भुतमाकर्ण्यते, यत्पुनरनल्पतपसो विदेहाधिपतेरायतने सकलसुरासुरमवीरदुरारोपगुणं, गिरिवरप्रमाणं, भगवतः पुरशातनस्य शरासनमभ्यर्च्यतइति.

**कौशिकः—** ( विहस्य ) अस्त्येतदपि. ( इतिपरिक्रामंति )

( प्रविश्यशतानंदः )

**शतानंदः—** राजन्नेषभगवान्कुशिकनंदनः, एतौचदशरथराजनंदनौ.

**लक्ष्मण**— भगवंता मुनीश्वरा, या राजाला **सीता** म्हणून एक कन्या आहे ती भूमि नांगरीत असतां तीस सांपडली असें ऐकण्यांत आहे. हें तर मोठें आश्चर्य होय !

**कौशिक**—होय, तें खरेंच आहे.

**राम**— ( मागील स्मरण करून मनांत म्हणतो ).

### श्लोक.

गेली अग्निमधें जळूनि तरुणी मायाच ती, हे खरी,
जाणें मी बहु शोकरोपहि तसा सोडी न चित्ता तरीं.
**वैदेहा**[१] वधि राक्षसेंद्र लतिकें हे सर्व जाणोनि रे,
छेदाया दशही शिरें मन कसें झालें असे घाबरें १

आणखी

### श्लोक.

यज्ञाचें मिष दाखवूनि वसुधाकन्या विवाहोत्सवा
आणी येथ मला मुनीश्वर अजी तैसेंचि मद्बांधवां,
**सीताही** मज लब्ध होइल अतां, येतां असी कल्पना,
ध्यानाश्वासनहर्षतोषें इतुक्या होती मनीं भावना.

( मोठ्यानें म्हणतो ) भगवन्, दुसरी एक आश्चर्यकारक गोष्ट ऐकतों, ती ही कीं, सकल सुरासुरांतील महावीरांस देखील ज्याचें गुणारोपण करणें अशक्य, असें पर्वताकार जें त्रिपुरासुरजेता भगवान् **शंकर** याचें धनुष्य, तें या महातपस्वी **जनक**राजाच्या घरीं पूजेंत आहे ।

**कौशिक**— ( हांसून म्ह० ) होय, हीहि गोष्ट खरीच आहे. ( असें बोलून सारे इकडे तिकडे फिरतात ).

**शतानंद**— ( आंत येऊन म्हणतो ) राजन्, हे भगवान् **कौशिक** ऋषी आणि त्यांच्या बरोबर **दशरथ**राजाचे पुत्र असे तिघे आले आहेत.

---

टीप.—१ जनकाला. २ मारिता झाला. ३ रावण. ४ सीता. ५ चित्तांचें.

जनकः— ( स्व० ) एतेहियेषामनुगुणमनेन पुरोधसा निर्दिष्टाः. ( प्र० ) प्रियंनः. ( इतियथोचितमुपचरन्सर्वानासनेषुनिवेशयति. )

शतानंदः — ( स्व० ) संत्वेते राक्षसास्तथाप्येवंवक्ष्ये. (प्र०) दिष्ट्या रामलक्ष्मणाभ्यामत्र भवान्संप्राप्तः.

जनकः—( स्व० ) अहमपिशतानंदमनुसृत्यवक्ष्ये. ( प्रकाशं )

दिष्ट्यानयद्दशरथो गृहमृष्यशृंगं,
दिष्ट्यासएवतमयाजयदृद्धिकामः,
दिष्ट्यासुताः समभवन्पुनरस्यराज्ञो,
दिष्ट्यामनोतिकमिमौभवतापनीतौ. २४

दशा० —विद्युज्जिह्व कथमयं परमार्थबुद्ध्याकथयति ।

विद्यु०—अस्मास्वेवसा जनकस्येति प्रतिभाति.

कौशिकः— एवमेवैतत्. इदंपुनःश्रूयतां शतानंदेन अनेनचसुहृदाजनकराजेन.

उभौ— अवहितौस्वः.

दशा०— किंकथयत्येषदुरात्मा कौशिकापसदः ।

विद्यु०— प्रायेणनिरुद्धतमस्मत्परिजनमतिसंधायागतोस्मीति.

सारण०—कथमन्यथा तदभिसंधानमंतरेणायमागंतुं शक्तःस्यात्. १

**जनक**— ( मनांत ह्मणतो ) ठीकच आहे. यांचे जसे वेष व रूपें आहेत तदनुरूपच आपल्याला उपाध्याय बावांनीं सांगितलें. ( मोठ्यानें ह्मणतो ) फार चांगलें, हें तर आह्मास इष्टच आहे.

( असें ह्मणून सर्वांना यथायोग्य आसनावर बसवितो ).

**शतानंद**— ( मनांत ह्मणतो ) हे राक्षस असले तर असोत. पण आतां असें बोलतो. ( मोठ्यानें **कौशिका**स ) दैव थोर ह्मणून आपण **रामलक्ष्मणां**स घेऊन आलांत.

**जनक**— ( मनांत ह्मणतो ) मीही आतां **शतानंदा**स अनुसरूनच बोलतो. ( मोठ्यानें **कौशिका**स ).

### श्लोक.

आणोनियां **दशरथें** मुनिऋष्यशृंगा,
त्याच्या करें करविलें स्फुट पुत्रयागा,
झाले सुपुत्र, तुमच्या सह येथ आले,
हें सर्व कृत्य विधिनेंच, मुनींद्र, केलें.

**रावण**— **विद्युज्जिव्हा**, हा जें बोलतो तें परमार्थबुद्धीनेंच बोलतो. कीं कसें रे ?

**विद्यु०**— महाराज, **जनका**ची परमार्थबुद्धि ह्मटली ह्मणजे आपणाविषयींच आहे असें मला वाटतें.

**कौशिक**—(**जनकास** ह्म०) होय असेंच खरें. हे **शतानंदा** तूं, हे मित्रा **जनक**राजा तूंही, मी जें वर्तमान सांगतों तें ऐकून घ्यावें.

**जनक** व **शतानंद**-ठीक आहे सांगावें. आह्मी ऐकायास तत्पर आहों.

**रावण**— हा दुष्ट **कौशिक** आतां काय सांगत आहे कोण जाणे ?

**विद्यु०**— **ताटिका**, **मारीच** वगैरे आपल्या राक्षसमंडळीनें आडविलें असतां त्यांना टाळून निघून आलों, हेंच बहुधा सांगेल. दुसरें काय ?

**सारण**— ठीकच आहे, टाळाटाळी केल्याशिवाय **कौशिका**चें येणेंच व्हावयाचें नाहीं.

कौशिकः—

यज्ञोमे भवितेति कोशलपतिर्दारैः सुतैश्चानयन्

रुद्धस्ताटकयास्मिवर्त्मनि रजोवृष्टिं सृजंत्याभृशं

दशा०— ( स्व० ) सम्यगुपक्रांतं अत्रभवत्या.

विद्यु०— तदभिसंधानंतु श्रोतव्यम्.

दशा०— मयापुनर्हर्षपरवशेनाभ्यां रघुशिशुभ्यामस्यमुनेरागमनमेव विस्मृतं.

कौशि० ( तृतीयचरणः )

वत्सौस्त्रीतिपराङ्मुखेप्युदपतद्बाणः स्वयंकार्मुकात्

विद्यु०— कियानस्यमुनिपाशस्य क्षत्रियबटावस्मिन्माहात्म्यमारोपयितुंयत्नः ।

सारणः—( साशंकं ) ततः किंवृत्तं ततुश्शृणुमः.

कौ० ( चतुर्थचरणः )

भिन्नातेन भुजांतरे महति, सा जीवं जहाववशा.३५

जनकः—( अपवार्य शतानंदमभि ) नूनंनिजगृहीतरूपमत्ययदृढी करणार्थमनेनयातुधानेन कथेयंप्रस्तूयते ।

**कौशिक—**

**श्लोक.**

यज्ञाला अणितां सदारतनयां राजास, ती **ताटका**

रोधाया मज धूळिची करितसे वृष्टी पथीं बाधका,

**रावण—** ( मनांत ह्म० ) वाहवा ! तिनें खासें काम चालविलें हें !

**विद्यु०—** तिच्याशीं दाळादाळी कसी केली तो प्रकार आतां ऐकावा.

**रावण—** अरेरे ! तिनें धुळीची वृष्टी केली इतकेंच ऐकून, हर्षांत गरक झालों, यामुळें हा मुनी ह्या पोरास घेऊन आला याचें भानच राहिलें नाहीं !

**कौशिक—**

**श्लोक.**

( तृतीयचरण ).

झाला स्त्री ह्मणुनी पराङ्मुख जईं, तेव्हां तयाच्या शरें

**विद्यु०—** या वेड्या क्षत्रियाच्या पोराचें नसतें महत्व सांगण्याविषयीं या दुष्ट मुनीचा, पहा, केवढा यत्न आहे तो !

**सारण—** ( शंकित होऊन ह्म० ) बरें आतां पुढें हा काय सांगतो कोण जाणे ! तें ऐकावें.

**कौशिक—**

**श्लोक.**

( चतुर्थचरण ).

केली भिन्न भुजांतरींच[२] मग ती प्राणास सोडी त्वरें.

**जनक—** ( शतानंदाकडे वळून हळूच ह्म० ) आपण जीं रूपें घेतलीं आहेत तीं खरीं आहेत असें पक्कें भासावें म्हणून या राक्षसानें ही कथा सांगून बतावणी केली, यांत संशय नाहीं.

---

टीप.—१ स्त्रीपुत्रांसहित. २ हृदयाच्या मध्यभागीं.

**शता॰**— अथवा दैवयोगेन कस्याकिंदुष्करं भवेत् ?

**विद्यु॰**— समर्थयतेऽयमांगिरसहतकः.

**सार॰**—हा ताटके, स्त्रीति विजानतापिनमुक्तासि कथमनेनजाल्मेन.।

**दशा॰**— ( सातंकं ) किंकृतं तदनुचरैर्नजानीमः

**जनकः**— ततःततः ?

**कौशिकः** — ततश्चसुबाहुमारीचप्रभृतयो रजनीचराः वत्समभ्यद्रवन्.

**दशा॰**— कथं ताटकावधंते सहिष्यंते. ?

**सारणः**— कथंतेऽप्याचरितं वीरमानिनाराघवबटुना ?

**कौशि॰**— श्रूयतां. किमन्यत्. ?

सुबाहुतदनीकिनीचरनिशाचरच्छेदिना

रघुप्रवरपत्रिणारणतले तथाक्रीडितं,

नटंतिपरितो यथाहतकबंधतन्मस्तकैः

समंपिशितदर्पिताः सपदिकंकगोमायवः. ३६

**शता॰** —( अपवार्य जनकंप्रति ) एवमपिस्थिते कथमेवुमन्यसे ?

**जनकः**— (अपवार्य ) वत्सा वीर्यशुल्का प्रतिज्ञातव्येति.

**शता०**— ( **जन**कास हळूच म्ह० ) अथवा दैवयोगानें कोणाला काय दुष्कर होणार आहे ? तसेंही होईल.

**विद्यु०**— हा दुष्ट **शतानंद** पहा कसा साधून नेत आहे तें ?

**सारण**— हा **ताटके** ! स्त्री असें समजलें असतांही त्या दुष्टानें तुला सोडिलें नाहीं ना ?

**रावण**—(भय पावून) मग तिच्या सेवकांनीं काय केलें असेल तें असो.

**जनक**— **ताटका** मरण पावल्यावर मग काय झालें महाराज ?

**कौशिक**— मग **सुबाहु** व **मारीच** इत्यादिक राक्षसांनीं **रा**मावर चालून येऊन त्याला वेढून घेतलें.

**रावण**— नीटच आहे ! **ताट**केला मारिलें हें त्यांना कसें बरें सहन होईल !

**सारण**— मग वीरमानी जो **राघव** बटु त्यानें त्यांचें काय केलें असेल तें असो !

**कौशिक**— दुसरें काय ? हें,

### श्लोक.

**सुबाहु** सहिता निशाचरचमू तयांची महा
रघूद्वहशरें रणीं निवर्विली क्षणार्धें पहा.
गिधाड तंव माजती पिशित खाउनीयां नवें,
सृगालगण नाचती मदभरें कबंधांसवें.

**शता०**— ( **जन**कास हळूच म्ह० ) हा पराक्रम ऐकिलातना ? आतां हे खरे आहेत किंवा वेषधारी आहेत व यांना वत्सा द्यावी किंवा नाहीं याविषयीं आपल्या मनांत कसें येतें ?

**जनक**.— ( **शता**नंदास हळूच म्ह० ) तोंडच्या गोष्टी ऐकून उपयोग नाहीं. येथें समक्ष जो पराक्रम करून दाखवील, त्याला वत्सा मिळेल, असी कांहीं प्रतिज्ञा करावी असें मला वाटतें.

**शता०**—( अपवार्य ) कीदृशः पणबंधः ?

**जन०** —( अपवार्य ) शिवचापारोपणमेव.

**शता०**— ( अपवार्य सावज्ञं विहस्य )

निषेवाहे वाक्प्रसृमरसमस्तामरकुलं,

चलन्मेरुप्रायप्रमथगणसाङ्गीकृततटम्,

कराग्रैः कैलासं गिरिमधिनभोनर्त्तितवतः

कियान्रक्षोनेतुर्गिरिशधनुरारोपणविधिः । ३७

**जनकः**—( अपवार्य ) कथयामिते भूतार्थं,-

सिद्धचारणगंधर्वदेवदानवराक्षसैः

दुरारोपमवादीन्मे पुरा चापमिदंहरः. ३८

**शता०**—( अपवार्य ) तर्हिशक्यमिदंप्रतिज्ञातुं.

**विद्यु०**— कथंसर्वेषामाहवधं कौशिकः ?

**सारणः**—सत्यमेवैतत्, नखल्वतिसंधेयाः केनापिमायाविनोमारीचप्रभृतयः

**शता०**— ( हळूच म्ह० ) त्याला तर पण केला पाहिजे. तो कोणता करावा बरें !

**जनक**—( **शतानंदास** हळूच म्ह०) **शिव**चापारोपण करील तोच हिचा पती. हाच, दुसरें काय ?

**शता०**—( अवज्ञापूर्वक हांसून **जनका**प्रत हळूच म्हणतो ) अँः, ही काय प्रतिज्ञा ? **रावणा**ला तर अगदीं सुकर आहे ही;

**श्लोक.**

मिळाले सेवार्थ त्रिदिवपति[1] सारेचि वहिले,
चलन्मेरुप्राय[2] **प्रमथ**गण ही ज्यावरि भले,
अशा **कैलासाला** उडवि गगनीं जो निजकरें,
तया **लंकानाथा** धनु उचलणें काय वद रे ?

**जनक**— ( हळूच म्ह० ) तें खरें पण पूर्वी असें झालें आहे.

**श्लोक.**

सिद्धचारणगंधर्वदेवदानवराक्षसां,
दुरारोपचि[3] हें चाप, सांब हें वदला असा.

**शता०**— ( हळूच **जनकास** म्ह० ) असें आहे काय ? तर मग ही प्रतिज्ञा ठीक आहे.

**विद्यु०**— ( **कौशिक** वाक्यावर म्ह० ) काय ! **कौशिकानें** तर सर्व राक्षस मारून टाकिले म्हणून सांगितलें !

**सारण**— होय ही गोष्ट खरीच असेल. कांकीं **मारीच** प्रमुख राक्षस हे मोठे मायावी आहेत, त्यांशीं टाळाटाळी करून म्हणजे कोणी निभावून येईल असें व्हावयाचें नाहीं. म्हणून ते राक्षस मेले असतील, तेव्हांच हे इकडे आले, मध्यें नाहीं.

---

टीप.—१ त्रिदिवेश ( देव ). २ चालणाऱ्या मेरुपर्वताप्रमाणें मोठाले. ३ गुण चढविण्यास दुःसाध्य.

**लक्ष्मणः-**

भीतोभूदार्यबाणेनदूरादपिदवीयसि

मारितोवाविमुक्तोवामारीचोनप्रतीयते. ३९

**दशा०-** ( सक्रोधनिःश्वासं )

वातोवातुमसौबिभेति, तपनस्तपतुं मदीयेजने,

दग्धुंवादहनश्च, शास्ति भुवनान्यद्यापि लंकेश्वरः,

साकंताटकयासुबाहुमखिलान्प्यस्यहत्वाभवान्

रामोजीवितुमुत्सहेतकिममुं गोपुंचकिंकौशिकः १४०

( इत्युत्थातुमिच्छति. )

**विद्यु०-** ( निवार्य ) क्षम्यतांक्षणमात्रं. दृश्यतांपुरस्तादपि.

**जनकः** ( स्वगतं ) प्रसीदतिमेत्हृदयं. ( प्रकाशं ) कथंमारीचोपि-

निर्धूतोरघुकुमारेण. १

**कौशि०-** अथकिं १

**सारणः-** ( स्वगतं ) हंतहंत. ।

इयंतंकालमेतस्यपुष्टोभुजपराक्रमः १

एकदेशेधुनाभिन्नो, भानुमानिवराहुणा. ४१

**दशा०-** ( दंतैर्दंतान्निष्पीड्य ) नाहंविमोक्ष्यामि क्षत्रबटुं.

**लक्ष्मण—**

श्लोक.

गेला **मारीच रामा**च्या बाणानें अतिदूर रे,
मारिला वा सोडिला वा त्यानें हें नकळे खरें.

**रावण.—** ( क्रोधानें निश्वास टाकून ).

श्लोक.

**वायू, सूर्य, हुताश** पीडण करूं माझ्या जनांला भिती.
त्रैलोक्यास अजून शासन करी निःसीम **लंकापती.**
सर्वी रात्रिचरां[1] **सुबाहु**सहितां मारूनियां **राम** हा
कैसा राहि जिवंत पाहुं, मुनि या रक्षील कैसा अहा !
( असें बोलून उठायास पाहतो. )

**विद्यु०—** ( त्याचें निवारण करून ) महाराज, क्षणभर धीर धरावा; पुढेंही काय होतें तें पहावें, उगीच उतावळी कां करावी ?

**जनक—** ( मनांत म्ह० ) अहो माझ्या ह्रदयाला तर प्रसन्नता भासते ! व्यग्रता अगदीं भासत नाहीं, मग काय असेल तें ईश्वर जाणें ! ( मोठ्यानें म्ह० ) **मारीचालाही रघुकुमारानें** जेर करून पळविलें ना ?

**कौशिक—** होय ! पळविलें तर !

**सारण—** अरेरे !

श्लोक.

एतावत्कालपर्यंत पूर्ण बाहुपराक्रमें
एकदेशीं भिन्न येणें केला सूर्य जसा तमें[2].

**रावण—** ( करकरां दांत खाऊन ) आतां तर मी या क्षत्रियाच्या पोरट्याला सोडणार नाहींच रे नाहींच !

---

टीप.—१ राक्षसांना २ राहूनें.

संन्यस्यापिगृहीतरुद्रगिरयोमेविंशतिर्बाहवो,
दिक्पालस्मयघस्मरेपुघटितोत्संगानिषंगादश,
चंडादंडधरावलेपहृदियं शक्तिर्मयेनार्पिता,
तत्किं ? ब्रूहि, कुतोबिभेमि ? समरेकोमेपुरःस्यास्यति? ४२

**सारण॰**— अंगुलिस्फोटमात्रक्षुद्रकरविनिपातेविमनुष्यपोते कियानयं स्वामिनः संरंभः ।

**शता॰**— महाप्रभावोऽयंरघुकुमारः ।

**लक्ष्मणः**— अतएवखलु.

आर्यायपुनरेतस्मै भगवानेष कौशिकः
मयासहैव दिव्यास्त्रमंत्रग्रामसुपादिशत्. ४३

**विद्यु॰**—श्रुतमिदं स्वामिना लक्ष्मणवचनं ।

**दशा॰**—किमतोनभेतव्यमस्माभिः ?

**सारणः**— प्रथमतःप्रभृति कौशिकएव मुख्यत्यस्मभ्यः

**कौशिकः**— ( स्वगतं ) जनकः शतानंदश्च मामिमावपिवत्सौ अन्यथासंभावयंताविव वर्तेते. तत्किंप्रागेवमायाविभिःकुणपैर्विप्रलब्धौ ? भवत्वेवं ( प्रकाशं ) राजन् जनक, वत्सशतानंद, मांप्रति किमपि वक्तुकामाविवदृश्येते. तत्कथयतं.

श्लोक.

केलासा उचलोनियां धरियलें ते वीस बाहू बरे,
दिक्पालस्मयदेपुधी[1] हि बरवे आहेत दाही खरे,
ही शक्ती दिधली मयें मज यमा जी जीतिला देतसे,
सांगें कोण दिके रणीं मजपुढें ? कोणास मी भीतसें ?

**सारण.**— अहो महाज, आपण नुसती चुटकी वाजविली तर जे प्राण सोडणार, त्या मनुष्याच्या पोरट्या विषयीं एवढा आवेश आणणें आपणास कशास पाहिजे ?

**शता०**— ( लक्ष्मण वाक्यावर बोलतो ) रघुकुमाराचा प्रभाव तर मग अतिशयच थोर होय !

**लक्ष्मण**— ह्मणून तर,

श्लोक.

माङ्क्यासहित आर्याला कौशिकानीं कर्पे पहा,
दिव्यास्त्रमंत्रविद्येचा केलासे उपदेश हा.

**विद्यु०**— लक्ष्मण हें काय बोलिला, ते महाराजांनीं ऐकिलें ना ?

**रावण**— काय ! यापासून आपण भय पावावें कीं ?

**सारण**— महाराज, म्हटलें ह्मणजे हा दुष्ट कौशिक्याच पहिल्या पासून आपणाशीं द्रोह करीत आहे.

**कौशिक**— ( मनांत म्ह० ) हें काय ? शतानंद आणि जनक ह्या उभयतांच्याही मनांत, मी व हीं मुलें यांविषयीं कांहीं संशय उत्पन्न असल्यासारिखें दिसतें ! तेव्हां आमच्या पूर्वीं कोणी मायावी राक्षस येऊन त्यांनीं यांस फसविलें किंवा काय असेल तें असो. ( मोठ्यानें म्ह० ) राजा जनका, वत्सा शतानंदा, मजपाशीं कांहीं बोलावें, असा तुमचा आकार दिसतो. हें खरेंच असलें तर, बोला खुशाल तुमच्या मनांत काय असेल तें.

---

टीप.—१ दिक्पालांनाही विस्मय देणारे भाले. २ रामाला.

जनकः— ( शतानंदं संज्ञापयति ).

शता०—

यः कश्चन त्रिभुवनेयदिराजसूनु
रारोपयिष्यतिशरासनमिंदुमौलेः ,
तस्मैप्रदास्यतिमुदामिथिलाधिपोयं
कन्यामनन्यसुलभेन गुणेन धन्यां. ४४

कौशिकः—अत्रापि तत्रभवतीरनाश्वासः दुर्निवारावलेपेषु मायाबल-सुलभनानारूपेषु निशाचरेषुसत्सु कस्य कस्मिन्भवतिविश्रंभः १ त-दानीयतामारोपणाय शरासनं पुरशासनस्य.

जनकः— भगवन् शतानंद, तत्रभवतैवसंमान्य शांभवंधनुरानीयतां.

शता०— ( तथेति निष्क्रांतः )

दशा०—

भग्नुजैर्धृतकैलासैरपि यद्दुष्करंधनुः,
तदारोपयितुंशंभोः शक्नोति किमयंवटुः ! ४५

विद्यु०— हंतहंत ! किमिदंप्रतिज्ञातमनभिजातेन ! कश्चिदप्यस्ति भुवनेषु नगराजधन्वनश्चापमारोपयितुं १

दशा०—( आकाशे लक्षंबध्वा ) आः ! वराकिजानकि, वराकि-जानकि !

**जनक**— ( शतानंदास खुणावतो ).

**शता०**— **श्लोक.**

जो सांप्रत त्रिभुवनांत नरेंद्रपुत्र
आरोपिल **प्रमथनाथधनू**[1] पवित्र
त्यातें **विदेहनृप**[2] देइल आत्मकन्या,
जी कां अनन्यसुलभस्वगुणेंचि[3] धन्या.

**कौशिक**— याविषयीं देखील तुह्मा उभयतांचा अविश्वासच ना ? ठीकच आहे. फार माजलेले आणि मायेच्या योगानें नाना तऱ्हेचीं रूपें घेणारे असे जे राक्षस, त्यांचा संचार येथें फार, ह्मणून कोणी कोणाचा विश्वास धरीत नाहीं. याजकरितां आतां तोंडच्या गोष्टी नकोतच. भगवान् **पुरशासन** जो **शंकर** त्याचें धनुष्य गुणारोपण करण्याकरितां आणा कसें येथें, उशीर कशाला पाहिजे ?

**जनक**— भगवंता **शतानंदा**, तुह्मी स्वतां जाऊन संभावनापूर्वक तें **शांभव** धनुष्य घेऊन यावें.

**शता०**— उत्तम आहे राजा. ( असें ह्मणून बाहेर जातो ).

**रावण**—

**आर्या.**

उचलिति **कैलासा** जे माझे बाहू, तयांस दुष्कर जें,
तें चापारोपण हा बटुक करिल, गोष्ट ही कसी साजे ?

**विद्यु०**— अरेरे ! ही काय मूर्खानें प्रतिज्ञा केली पहा ! **मेरुपर्वताचें** ही धनुष्य करणारा जो **शंकर** त्याचे धनुष्यास गुणारोपण करील असा एक तरी पुरुष त्रिभुवनांतहि मिळेल काय ?

**रावण**— ( आकाशाकडे पाहून ह्म० ) हे दीने अनाथे **जानकी**,

टीप—१ शिवधनुष्य. २ जनक. ३ दुसऱ्याला दुर्लभ जे स्वगुण तेणेंकरून.

राज्ञोमेसुहृदःसुतेतितरसा नत्वंगृहीता मया,

मर्त्यैकाप्यनुरागिणीतिभवती नायंनृपोयाचितः,

ताद्रूप्यंभजतापि वोढुमधुना शुल्केश्रुते दुष्करे

नप्राप्यासि यथापरैरपितथा ऽनूढैवसंस्थास्यते । ४६

ततः किंब्रवीमि ?

सारणः— महाराजेन तावदिदानीमेनां मुषित्वागंतव्यंसंवृत्तं, यदिइ यमनुकंपनीयास्यात्.

( प्रविश्यशतानंदः )

शतानंदः—राजन्निदमानीतमैंदुशेखरंधनुः ( इत्युपविशति ).

कौशिकः— वत्सरामभद्र, दृश्यतामिदं.

रामः— यदाज्ञापयंतिगुरवः ( इत्युत्थायशरासनमुपसर्पति ).

दशा०— कथमभीतएव इवमसावुपसर्पति । अपिनामैदमयमारोपयेत् ?

सारणः— अपिजानकींच परिणयेत् ?

( ततःप्रविशति प्रतीहारिणा पुरोनातिदूरगतेनानीयमाना, रक्तपटि.
कावगुंठितांगी जानकी तदितराः कन्यकाश्च ).

सीताः— अम्मो महण्यहवो आअदो कोसिअपहूं ( सीमंदणिज्जो अ-
ल्लेहि.

रामः— ( स्वगतं ) कथमेतत् ?

सिंचतिसुधारसंमे श्रवसोरिहकोपिसारिकालापः ।

स्मरयतिचतदनुभूतं मायामयजानकीवचनं । ४७

### श्लोक.

मित्राची तनया ह्मणोनिच मिथी नाहीं बळें हारिली,
भीती एक नरी ह्मणोनिच नृपापाशीं नसे याचिली,
ताडून्या जरि घेतलें पण तरी दुःसाध्य आहे खरा
सर्वांनाहि, ह्मणोनि दुर्मिळ तुला आजन्म गे नोवरा.

असी गोष्ट आहे, तेव्हां मी तरी काय करूं? माझा कांहीं उपाय नाहीं!

**सारण.**— हिच्यावर दयाच करणें असेल तर महाराजांस हिला चोरून नेणें प्राप्त आहे. दुसरा इलाज नाहीं.

**शता०**— ( आंत येऊन ह्म० ) हे राजन्, हें **इंदुशेखराचें** धनुष्य आणिलें. ( असें ह्मणून बसतो ).

**कौशिक**— वत्सा **रामभद्रा**, हूं, आतां काय पहातोस?

**राम.**— आज्ञा गुरूजी. ( असें म्हणून धनुष्याजवळ जातो ).

**रावण.**— काय! हा तर बेधडक धनुष्या जवळ चालला! याचे मनांत शंकेचा लवलेशही नाहीं! तेव्हां हा त्याचें गुणारोपणही करणार?

**सारण.**— आणि **जानकी**सही वरणार?

( तदनंतर तांबडा लाल शेला पांघरलेली असी **सीता** व दुसऱ्या कन्या यांस घेऊन **चोबदार** पडद्या बाहेर येतो ).

**सीता.**— महा समर्थ असे **कौशिक**ऋषी आले आहेत, त्यांचें पादवंदन आपल्याला करावयाचें आहे.

**राम.**— ( मनांत ह्म० ) अरे हें कसें बरें?

### आर्या.

वचनामृतेंचि कर्णा शिंपितसे सारिकाचि[2] हे विमला
पूर्वानुभूतमायासीतावचनस्मृतीस[3] देत मला।

टीप.—१ जन्मपर्यंत. २ साळुंखी. ३ पूर्वीं जी पाहिली मायासीता तिच्या वचनस्मरणास.

**उर्मिला—** सुदंअज्जाए जाणईए वअणं तुम्हेहिं ?

**रामः—** ( दृष्ट्वा स्वगतं ) कथमियं साक्षादिवजानकी ।

श्रीखंडादिसमीरणे शिशिरतां चंद्रेदृशोः सौम्यता

मारामेस्पृहणीयतां, परभृतालापे सुखश्राव्यतां ,

आहारे करणीयतां, रजनिषु क्षिप्रं पुनर्नेयतां,

यामुष्णादनवेक्षिता ममपुरा, सैवाधुनादृश्यते। ४८

तदियंदृढतरभुजाभ्यां बंधनीया. ( विमृश्य )

मर्गचापाधिरोपाख्यप्रतिबंधे त्वतेमया

भुजाभ्यां शक्यते बद्धुंभूकन्येयं, नचान्यथा. ४९

( इतित्वरितमुपसर्पन्धनुः पश्यति )

**मांडवी—** अयेजाणइ, कोसिअमहे सिणाठुवेराअण्णदारआआणीदा सुणीअंदि.

**सीता—** अहइ. ?

**मांडवी—** तोणएको काएविकण्णआए हिअअचोरोहोदित्तिसुणम्हि.

**सीता—** ( सासूयं ) किंभेणसि ? तुहिंआअच्छ.

( इतिलीलाकमलेन ताडयति )

**उर्मिला—** ( विहस्य ) अयिसीदे इमिणाबावारेण मांडवीए कहिदं अत्तणोबरिकितिआणिअं एव्वसच्चीए ?

**ऊर्मिला**—अगे मुलींनो, सीताताई काय ह्मणाली तें तुह्मी ऐकिलें ना!

**राम**—( पाहून मनांत म्ह० ) काय! ही प्रत्यक्ष खरीच सीता आली कीं!

### श्लोक.

श्रीखंडाद्रिसमीरणी[1] शिशिरता चंद्रीं तसी सौम्यता,
आरामीं स्पृहणीयता, परभृतालापीं[3] सुखश्राव्यता,
आहारीं करणीयता, रजनिची जी काय हो अल्पता,
यां[4] चोरी अनवेक्षिता[5] मम, दिसे प्रत्यक्ष ती ही अतां.

सर आतां हिला भुजांनीं बळकट बांधून टाकावें. (विचार करून म्ह०)

### श्लोक.

शिवचापारोपणाख्य बंधास जईं सोडिन,
तईं होईल बद्धा ही, अन्यथा हें घडेल न.

( असें बोलून त्वरेनें चालत होत्साता धनुष्याकडे पहातो ).

**मांडवी**— अगे सीताताई, कौशिकमहर्षि यांनीं दोघे क्षत्रियकुमार बरोबर आणिले आहेत ह्मणून ऐकतें.

**सीता**— होय आणिले आहेत असें ऐकिलें खरेंच.

**मांडवी**— त्या दोघांतून एकया कुमारानें कोण्या एकया कन्यकेचें हृदय चोरिलें आहे असेंही ऐकतें।

**सीता**— ( ईर्षेनें म्ह० ) हें काय भलतेंच बोलतेस गे? खबरदार! उगीच गुपचिप चाल!

( असें ह्मणून तिला लीलाकमलानें मारिते ).

**ऊर्मिला**— (हांसून ह्म०) अगे सीताताई, मांडवी जें बोलिली तें तूं आपल्या अंगावर कां बरें ओढून घेतेस? आपण इतक्याजणी आहों त्यांत तुलाच राग येऊन चिडतेस तेव्हां ही गोष्ट तुलाच लागू होते.

---

टीप.—१ मलयगिरि. २ शैत्य. ३ कोकिलास्वरी. ४ या गोष्टीतें. ५जिला पाहिलें नसतां चोरून नेलें.

**सीता.**— अईउम्मिले, असंबद्धप्पलाविणि, दूरदोअव्वेहि.

**श्रुतकीर्तिः**— अईसीदे, कीसतुमंकुविदाहोसि ? जइएव्वंतुमंभणामि, काउणएदाणं कण्णआणं सिविणएकंवि कंदप्पसुंदरं खत्तिअकुमारं दठ्ठूणधम्मदिअहक्कमस्सुस्संसतप्पवाहा गिरिणईविअदिणे२किसंगीहोदि काए उणणवद्दुद्धकलसःधारा सेअसमअसमुदिअधवलत्तणाइं, त्तत्तकंचण मअसालभंजिअलीला विलासपत्ताइं अंगाइं होंति ? काए उणविहितरमणिज्जे, उज्जाण मज्झभाए, परिणद गुरुफलभारभंगुरविडवमातुलिंगलदाउःप्पवेसंतरे, पच्छाअसिणिद्धमुद्धे, णारिएरवाडिआपरिमंडिदे, माहविडेसरसकिसलअसअणविणिवेसिदतणुलदाए, उसीरचंदणद्दवजंबालिदथ्थण कुंभजुअलणिबिडणिक्खित्तणमेंदुकलाकोमलहारजट्ठिए, पस्सोपविठ्ठसहीजणकरकमलद्धाविदणलिणीदलतालवेंटकंदलिअसीअमदपवणसेविआए, अदिवाहिज्जंदिवासराइं ? अण्णंआपच्चूसपडिबुद्धाकाउणसहिजणस्स एव्वंकहेदि ?

**मांडवी.**— सुदकित्ति, एकहेहि २ कहंकहेदि.?

**साता—** अगे ऊर्मिले, तूंही असें नाहींनाहीं तें बोलतेस तर तूंही मजपासून दूर सर कसी!

**श्रुतकीर्ति—** अगे ताई, तुला कां बरें राग येतो? यांचें बोलणें खोटें असलें तर मी पुसतें याचें उत्तर दे. अगे आपण इतक्या जणी आहों, त्यांतून मी ह्मणतें असी अवस्था कोणतीची झाली होती तें सांग बरें? मदनाप्रमाणें सुंदर असा कोणी एक क्षत्रियकुमार स्वप्नांत पाहून, उन्हाळ्यांत जसा गिरिनदीचा ओघ कृश होत जातो, तशी कोण बरें कृश होऊं लागली? तप्त सुवर्णाचे पुतळीस नवीन दुधाच्या धारांनीं अभिषेक केला असतां जशी शुभ्र दिसूं लागते, तसें कोणतीचें अंग शुभ्र होऊं लागलें बरें? आणखी, रमणीय उद्यानाचे मध्यभागीं महाळुंगीचे झांपचे झांप फळांनीं लवून निघाले आहेत, व तीं फळें पिकून त्यांचे भारानें झाडें लवून गेल्यामुळें ज्यांत शिरतां येत नाहीं, जेथें वृक्षांची सावली दाट व स्निग्ध असून समोंवतीं नारळीचें बन लागून गेलें आहे, त्याच्या मध्यभागीं जाईचा एक मंडप आहे, त्या मंडपांत ओल्या व रसभरित अशा कोमल पल्लवाचे शयनावर जी निजली आहे, भोंवतीं सख्या मिळाल्या आहेत, त्यांतून कोणी सख्यांनीं जिचे स्तनांला वाळा व चंदन यांचे रसाचा दाट लेप दिला आहे, त्या लेपामुळें नवीन चंद्राचे कलेप्रमाणें जिचे गळ्यांतील हार शोभत आहे, व कोणी सख्या हातांत कमलिनीचीं पत्रें घेऊन त्यांचे योगानें तालाचे विंझण्याप्रमाणें मंद व शीतळ असा वारा जिला घालीत आहेत, अशा रीतीनें कोण बरें दिवस काढीत होती? आणखी, जिला प्रातःकाळ होई तों पावेतों देखील झोंप लागत नसून जी सख्यांना असें ह्मणत असे कीं—

**मांडवी—** अगे श्रुतकीर्ति, ती सख्यांना काय ह्मणत असे तें सांग बरें? ऐकूं दे तें.

**श्रुतकीर्तिः**— ( संस्कृतमाश्रित्य )

निद्राजातुयदृच्छयायदि, ममस्वमेतदादृश्यते

रामोनामयुवा, पुरः स तु शनैरभ्यर्णमासीदति.

दासस्तेहमिति ब्रवीति, कुचयोः संव्यानमाकर्षति,

भ्रूभंगेजलिमातनोति, वदनं सव्याजमाजिघ्रति. ५०

इति ( ऊर्मिलामांडव्यौ सीतामुखमवलोकयतः ).

**सीता**.—( सलज्जातिशयं स्वगतं ) [२]परिण्णादो मेसव्वोवुत्तंतो एदाहिं । कागई १ ( प्रकाशं धैर्यमवलंब्य ) णखु दाणिं तुम्हे उवालंभणिज्जाओ; किंदुसाजेव्व परिहाससीलासहीसीलवदी, जाखुसुदकित्ति बालिएत्ति पवारेदुकामा, सीदाउक्कंठिदा, विरहकिसपंडुरंगी, पल्लवसअणसाइणी, एरिसी, तारिसी होदित्ति, अणिसं एव्वं अभिदाईं अणाई मंतअंतीचिट्ठइ.

**मांडवी**.— (पुरोवलोक्य ) [३]केहंएदं पादालविवरपडिबद्धलोहमंजूसगब्भगअं,णिच्चसंकितचंदनविट्ठलंछिदं, ससलंछणसेहरस्ससरासणं एत्थएंव्व आपीदं चिट्ठइ । तस्सएव्वपरिसरेको एसोपेक्खंतो, बालचंदो विअणअणाणंदसंदाइ संदंसणो, कण्णिआरमालिआसण्णद्धमुद्धसिहं

श्रुतकीर्ति—

श्लोक.

निद्रा येतचि नाहिं, येइ जरि ती, स्वप्नांत माझ्या दिसे
रामाख्य स्फुटयौवन[1] प्रकट, तो माझ्याकडे येतसे,
बोले "मी तव दास" ओढि वसना त्यां[2], जें कुचां आवरी,
त्याजें चुंबन घेइ, जोडित करां पाहें कुर्षे मी जरी.

( ऊर्मिला व मांडवी सीतेच्या तोंडाकडे पाहतात ).

सीता— ( फारच लज्जा पावून मनांत ह्म० ) अगे बाई ! माझें सर्व वर्तमान यांना कळलें ! काय करावें आतां ? ( धैर्य धरून मोठ्यानें ह्म० ) अगे बायांनो, मी तुह्मांवर रागें भरत नाहीं. पण या चावट शीलवतीला दुसऱ्याच्या चेष्टा करण्याची फार खोड आहे ह्मणून तिला बोलतें. सीता उत्कंठित झाली आहे; ती विरहामुळें वाळत चालली आहे; ती पांढरी पडली आहे; तिला अन्नपाणी नकोसें झालें आहे; ती पाल्याचे अंथरुणावर निजते; ती असें करिते, ती तसें करिते ! याप्रमाणें मनास वाटतील त्या खोट्या गोष्टी बुद्ध्या श्रुतकीर्तीच्या देखतां वारंवार बोलते. मग श्रुतकीर्ती ही लेंकरूंच, तिला त्या साऱ्या खऱ्याच वाटतात. आणि एखादे वेळेस ती अशी भलत्याच ठिकाणीं बोलून उठते. असें या शीलवतीचें करणें आहे, तें मला अगदीं आवडत नाहीं. ही काय मेली भलतीच थट्टा ?

मांडवी— अगे सदाशिवाचें धनुष्य येथें आणिलें आहे ! हें तर नेहेमीं तळघरांत लोखंडाचे पेटाऱ्यांत असतें. त्याची नित्य पूजा करितात, त्या पूजेच्या गंधाचे ठिपके त्यावर पहा कसे दिसत आहेत ते ! अणखी त्या धनुष्याच्या जवळच बालचंद्राप्रमाणें नेत्रांस आनंदकारक असा तो मुलगा कोणाचा बरें त्याकडे पाहत

टीप.—१ स्पष्ट तारुण्य. २ त्या वसनास.

दमंडणो संझ्झासमअसमुम्मीलिदणी लुप्पलसामलसरीरलछी, क-

ण्णंतविस्संतकमलदलकोमलविपुलरत्तंतणअणजुअलो, करिक-

लभकरदीहतरपीवरभुअदंडो, मंडणभूदो इमाए अस्समभूमिए ल-

स्खी अदि. १

सीता०— ( निर्वर्ण्य स्व० ) केहं एदस्स आकिदी. सिविणअदिहस्स

विअजणस्ससंवादिणी । ताफलिदं मे मणोरहेण. जं एणं उद्दिसिअणि

हीदमणो रहुमंतेलोक्कवीरो विअबलाजणलक्खीकरणसंपन्नद्धकित्ति

अजाणिअपंचसरहदओ सअसारं विमुक्को वाहेइ. चंदो विसाअरग-

ब्भवासस्सुलहं कालकठं कलंकव्ववदेसेण गेण्ही असंवादिइ, मल

अपवणो विदक्किवणदिसापरिचअसंकंतकिअसदारुणत्तणो मह-

वाणावहारं कादुं संचरइ. ( इति सखीभिः सह पश्यंती तिष्ठति )

शतानंद:—राजन्, दृश्यतामयं रघुकुमारः

दृष्टः पश्यति पंचकिंकरशतीव्याकृष्टचक्राष्टक-

केंकुर्वच्छकटोपरिस्फुरदयः पेटीनिविष्टंधनुः,

उभा आहे ! कर्णीकार[1] पुष्पांच्या माळा बांधिल्या आहेत त्यांमुळें त्याचा मुगुट पहा कसा शोभत आहे ! संध्याकाळीं विकास पावणाऱ्या कुवलयाप्रमाणें त्याची अंगकांति पहा कशी नीलवर्ण आहे ती ! कर्णापर्यंत दीर्घ व कमलदलाच्यापरी कोमल, व प्रांतभाग ज्यांचे आरक्त, अशीं त्याचीं नयनें, पहा कशीं सुंदर आहेत तीं ! बालगजाचे शुंडादंडाप्रमाणें त्याचे बाहुदंड, पहा कसे लांब व पुष्ट आहेत ते ! आणि ह्या आश्रमप्रदेशाला तर तो केवळ अलंकाराप्रमाणेंच शोभा देत आहे । असा हा कोण असेल तो असो !

**सीता.**— (निरखून पाहून मनांत स्व०) अगे जो कां मी स्वमांत पाहिला त्याच प्रियजनाच्या प्रमाणें याची आकृति आहे. तेव्हां खचीत माझा मनोरथ फलित झाला. पहा पहा, याची प्राप्ति होण्याविषयीं मी उत्कंठित होऊन राहिलें असतां, दुष्ट जो पंचशर **मदन**, तो त्रैलोक्यांत एकवीर असून, ही अबला, हिजवर मी बाण कसा टाकूं ? हिला प्रहार केला असतां आपली अपकीर्ति होईल, हें कांहींच मनांत न आणितां, तो मजवर शरवृष्टि करून पीडा करूं लागला. समुद्रांत राहिल्यामुळें काळकूट विष सुलभ आहे, तें काळकूट विप कलंकमिषानें घेऊन चंद्रही मला संताप देऊं लागला; तसाच दक्षिण दिशेस राहणें असल्यामुळें **यमाचें** क्रूरत्व ज्यास प्राप्त झालें आहे असा मलयवायुही माझे प्राण हरण करण्या करितां संचार करूं लागला. असी माझी त्यांनीं विपत्ति करून सोडिली, ती याच्याच विरहामुळें होय । ( असें म्हणून सर्व कन्यासहवर्तमान **रामा**कडे पाहत उभी राहते ).

**शता०**— राजन्.

### श्लोक.

गाडा असे एक विशाळ फार, चाकें जया भ्यासुर आठ थोर,
तयावरी आयसपेटिका[2] हे, तिचे मधें शैव धनुष्य पाहे.

---

टीप.—१ वृक्षविशेष, २ लोखंडी पेटी.

**कौशिकः—**

आदत्ते ननुलीलया, भुविसमुन्नम्रातिच,

**लक्ष्मणः—** आलंबते, ज्यामारोपयतेच,

**जनकः—** ( सहर्षाश्चर्यं )

कर्षतिच ।

**शतानंदः—**

किंवक्ष्याम्यमोक्षीदिदं । ५१

**जनकः—** ( आश्चर्यं ! )

कल्पांतध्वनदभ्रविभ्रमकरीजृंभत्ककुत्स्थार्भक—

व्याकृष्टत्रुटितोरुधूर्जटिधनुर्ध्वानोत्थिते: साध्वसात्

मूर्छांमृच्छति, भूयसीं, निपतति मांद्यंदमुत्तिष्ठति,

स्वस्थो विस्मयतेच, किंत्विदमिति प्रायस्त्रिलोकीजनः ५२

**शता०—** ( अपवार्य जनकंप्रति )

एषएवभगवान्समुद्दत्ते, लक्ष्मणोप्ययमसावपिरामः

येपुनः प्रथममागतवंतो राक्षसाइति नकिंविदितास्ते । ५३

## आर्या.

सेवक महाबळी जे, पांच शतें त्यांहि ओढुनी अणिलें
बहुकष्टें, चाकांचा ध्वनि झाला आणितांहि ते[1] थकले.

आतां या रघुकुमाराकडे पहावें, कारण हा

## श्लोक.

हर्षें विलोकित यथा[2],

**कौशिक.**— ( श्लोक पुढें म्हणतो ).

धरितो करानें, दाबी क्षितीवरि,

**लक्ष्मण.**— ( तोच श्लोक पुढें म्हणतो ).

सुबद्ध करी गुणानें[3].

**जनक.**— ( हर्षानें व आश्चर्यानें तोच श्लोक पुढें म्हणतो ).

आकर्षितो सहज दाशरथी कसा हा,

**शता०**— ( श्लोकाची समाप्ति करितो ).

मोडूनि चूर्णहि करी निमिषें, अहाहा।

**जनक**— अहो केवढें आश्चर्य हें ?

## आर्या.

रामानें चाप, गुणा ओढुनि मोडूनि टाकिलें जेव्हां,
कल्पांतकाळमेघापरि भयदशब्द जाहला तेव्हां,
शब्दश्रवणें मूर्छित पडले, मग ते हळू हळू उठले,
हें काय असें विस्मित होउनि म्हणती जन त्रिलोकिंतले.

**शता०**— ( एकीकडे घेऊन हळूच जनकाप्रत म्ह० ).

## श्लोक.

हाचि कौशिक खरा तव मित्र, हेचि वास्तविक पार्थिवपुत्र,
जे अले प्रथम, ते मज वाटे रूप घेउनि निशाचर खोटे.

पण तुम्हांस ते खोटे असें वाटतें कीं नाहीं ?

टीप—१ सेवक. २ धनुष्यातें. ३ दोरीला.

**जनकः** —( अपवार्य ) विदिताएव.

**शता०**— ( अपवार्य ) दिष्ट्या, कुहनार्णवादपिमनोरथार्णवादिवसमु-

त्तीर्णाःस्मः !

**कौशिकः**— जनकराज, श्रूयतां.

भुवनत्साक्षघनुर्विततमृडकोदंडजनिते

कठोरेठात्कारे त्रिभुवनभयायप्रभवति,

वधूसंरक्षायै वहतिमुखमुद्राकमलभूः

सचेशः सव्यांगस्थगनपरसव्येतरभुजः. ५४

**जनकः**— सत्यमेवेदं.

**विद्यु०**— दृढसत्वोयं क्षत्रियबटुः ! तथाहि

प्रागुद्भूतमहाद्भुतांतकपुरी युद्धानुबद्धक्रुधा

देवोयंवशामिमुखैरपिसमंचंडाट्टहासव्यधात्,

दिग्दंतिश्रवणेऽपरंतुदमहारंभेणसंभाव्यते

तुल्यस्तेनककुत्स्थपोतदलितश्रीकंठचापध्वनिः. ५५

**सारण**.— किंवर्ण्यते विद्युज्जिह्वेन ! नन्विदमेवधनुर्भंगो भगवतस्त्र्यापमं

जनकनाममहाराजस्य मनोरथमूलोच्छेदः—

**दशाननः**— ( विद्युज्जिह्वमति सामर्षं विहस्य )

**जनक—** होय, खोटे वाटतात तर ! राक्षसच ते होते असें आतां पक्कें समजलें !

**शता०—** दैव थोर म्हणूनच जसे मनोरथसमुद्र तरून पार झालों, तसेच राक्षसीमायारूपसमुद्रही तरून पार पडलों.

**कौशिक— जनकराज,** श्रवण करावें.

### श्लोक.

गुणातें आकर्षी जंव **रघुकिशोर** प्रबल हा,
धनू झालें भग्न स्वन निपजला दारुण महा ;
वधू[1] तें[2] रक्षाया **अज**[3] नुघडि[4] आस्यें[5] क्षण[6] निजें,
तसा शंभू[7] बावें वपु[8] कवळि सव्येतरभुजें[9].

**जनक.—** हीं वास्तविक गोष्ट होय !

**विद्यु०—** हा क्षत्रियबटू मोठाच बलवान् आहे यांत संशय नाहीं. कारण,

### साक्या.

**यम** नगरीचे सन्निध पूर्वी झालें रण बहु घोर,
दाही वदनीं देवें सिंहध्वनि केला अति थोर,
ऐकुनि ज्यातें दिग्गजकर्णी झाली पीडा चंड,
तत्तुल्यचि हा रव[10] जें **रामें** केलें धनू दुखंड.

**सारण.— विद्युज्जिव्ह** हे केवळ शब्दाचेंच वर्णन काय करितो ? यांत काय आहे ? **मेरुधन्वा** भगवान् **शंकर** त्याचें चाप मोडणें म्हणजे हें महाराजांच्या मनोरथाचें मूलोच्छेदन करणचें होय. यांत संशय नाहीं !

**रावण.—** ( क्रोधानें हांसून **विद्युज्जिव्हा**प्रत हा० ).

टीप—१ स्त्रीतें. २ तेव्हां. ३ ब्रह्मा. ४ उघडीना. ५ मुखें. ६ क्षणमात्र. ७ शिव. ८ डावें अंग. ९ उजव्या हातानें. १० शब्द.

भङ्क्त्वाकार्मुकमैंदुशेखरमसौवोढाविदेहात्मजां,
दातामैथिल, एषकौशिकमुनिस्तस्यानुमंतेतिच,
आगत्यस्वयमात्तमन्यवपुषा लंकेश्वरः केवलं
यत्रासौ पुनरात्मनः कथमिदंजातं कथंमन्यसे ? ५६

**विद्युज्जिह्व.**— ( स्व० ) कुपितोयंराजा. तदेनमनुवर्तिष्ये. ( प्रकाशं ) यदेतत्कालोचितं तन्मया नविज्ञापनीयमभिज्ञाय देवाय,

**दशानन**— तर्हिश्रूयतां.

हंतव्यः प्रथममसौममापराधी
मद्वर्गप्रथमवधेन राजसूनुः
हर्तव्यास्तदनपिप्रमथ्यपश्चा
द्वैदेहं, यदकुरुतैष विप्रलंभं. ५७

**सारण.**— यथेवं

करकलितगदाविभिन्नवक्षः
स्थलमनुपीतनवामिषोपदंशं,
असिदलितविदेहराजकंठ
स्रुतमसृगद्यपिबामि, देव्यनुज्ञां. ५८

**विद्यु०**— ( स्वग० ) कौशिकोपदिष्टसकलास्त्रमंत्रग्रामीयमतिगंभीरमहासत्वस्तवस्य संप्रहारे महाराजोपि नप्रभवति स्थातुं, किंपुनरसौसारणः ?

श्लोक.

चापा मोडुनि जानकी वरिल हा राम, स्वयें तत्पिता[1],
कन्यादान करील कौशिक तयां देईल हा मान्यता,
रामाची तनु घेउनी जनकजालग्नार्थ आलों जरी,
झाला व्यर्थ समग्र यत्न विधिनें, कैसी करावी परी !

**विद्यु०**— ( मनांत म्हणतो ) महाराजांस क्रोध चढला. तर आतां यांचि मर्जीनेंच घ्यावें. ( मोठ्यानें म्हणतो ) आतां मसलत कोणती हें मी महाराजांस काय सांगणार ? महाराज स्वतः बुद्धिमान् व सुज्ञ आहेत.

**रावण**— बरें आहे तर माझी मसलत ऐकावी !

आर्या.

मद्वर्गीय जनाला मारुनि झाला मदीय अपराधी,
त्या ह्या दुष्टा क्षत्रियबटुला मारूनि टाकिजे आधीं,
मग ज्या विदेहराजें मज मित्रालाहि वंचिलें पाही,
मारुनि, मित्र तरि, तया, धरुनि अणावी बळेंचि वैदेही.[2]

**सारण.**— अशीच मसलत आहे तर मग उशीर कशाला पाहिजे ?

श्लोक.

खड्गेंकरोनि बटुच्या हृदया चिरीतों,
त्यांतूनि काढुनि अतां नव मांस घेतों,
त्याच्या[3] सर्वे जनककंठहि तो चिरोन,
सांगाल तुम्हि करितों तरि रक्तपान.

**विद्यु०**— ( मनांत म्ह० ) अहो रामाचें काय सामर्थ्य ! तो केवढा गंभीर व केवढा पराक्रमी ! अणखी त्याला कौशिकानें संपूर्ण अस्त्रमंत्रांचा उपदेश केला आहे. समरांगणीं त्याच्या तडाख्या पुढें प्रत्यक्ष रावणमहाराजांच्यानें देखील उभें राहवणार नाहीं, मग या सारणाची ती कथा काय ?

---

टीप—१ जनक. २ सीता. ३ नवमांसाबरोबर.

( प्रकाशं ) धिङ्मूर्ख, किंप्रलपसि? महाराज, प्रसीद किञ्चिदाकर्ण यितुं.

**दशा०—** विधेयोस्मिमंत्रिजनस्य.

**विद्यु०—**

सहसाविहितंकर्म विशीर्येतापिजातुचित्,
विमर्शपूर्वकंतद्येद्विवध्यान्मंगलंबहु. ५९

तदिदानीं,

यथाघातिष्यतेरामो, यथासीताच लप्स्यते,
माल्यवत्प्रमुखैर्मंत्रं कृत्वाकारिष्यते तथा. ६०

**दशा०—** यद्येवं, पुनर्विमानमारुह्यलंकापुरमेवप्रविशामः. किमनेना-द्यसीतायादर्शनकुतूहलेन? येपाबलाद्गृहीतव्येति निर्धारितं. ( इति राक्षसाभ्यांसह निष्क्रांतः )

**जनकः—** ( सहर्षप्रश्रयं )

मन्मनोरथनिर्वृत्यैमहोद्यमविधायिने,
गाधिवंशाब्धिचंद्राय कौशिकायनमोनमः. ६१

**शतानं०—** भगवन् कुशिकनंदन,

( मोठ्यानें सारणाला ह्म० ) छित् मूर्खा, हें काय व्यर्थ बोलणें? तुला समजत नाहीं. तूं उगाच रहा ! ( रावणाला ह्मणतो ) महाराज, मला थोडी विनंती करायाची आहे· कृपा करून ऐकाल तर बोलतों.

**रावण.—विद्युज्जिव्हा,** बोल काय असेल तें. मंत्रिजनांच्या विचाराबाहेर मी नाहीं.

**विद्यु०—**

### श्लोक.

अविचारें करावें जें कचिन्नाशहि पावतें,
विचारें करितां तेंची होतात बहुतें हितें.

ह्मणून यापुढें आतां

### आर्या

ज्या युक्तीनें राघवनिधन घडे, जानकीहि ये हातां,
तैसी[1] माल्यवदादिक मंत्री मिळवूनि शोधिजे आतां.

**रावण—** असेंच आहे तर आतां विमानांत बसून लंकापुरीस निघून जावें. सीता पाहण्याविषयींची उत्कंठा धरून उपयोग नाहीं। तिला हरण करून न्यावयाची मसलत तर ठरविलीच.

(असें बोलून विद्युज्जिव्ह व सारण यांसहवर्तमान निघून जातो).

**जनक—**( हर्षानें व नम्रतेनें ह्म० ).

### श्लोक.

माझें अभीष्ट साधाया ज्यानें केले महोद्यमा,
नमितों त्या कौशिका, जो गाधिवंशाब्धिचंद्रमा[2]

**शतानंद.—** अहो भगवंता कुशिकनंदना,

---

टीप.—१ तैसी युक्ति. २ गाधिवंशरूप समुद्राला चंद्राप्रमाणेंच.

रामाय दीयते सीता, लक्ष्मणाय तथोर्मिला,

मांडवीश्रुतकीर्तिश्च कनिष्ठाभ्यां तथैतयोः ९२

**कौशिकः**—बाढं, बाढं ।

**सीता**—( स्व० ) कहं[२३] इमिणामणोरहवल्लहेण, खंडपरसुणो कोदंड मदवेतंडकिसोरेण विअइक्खुदंडं तुरिदं भग्गंजादं । अच्चरिअं २ । ( प्र० ) उम्मिले, किएदं ?

**ऊर्मिला.**—हद्धी[२४] हद्धी ! इमिणारहुकुमारेण भग्गस्स भग्गसरासणस्स पलअघण विमुक्कणिलादभीसणेण णिग्घोसेण भीदाहीं अण्णोण्ण बाहुबंधणवेधि अगदीहिंणिमीलिदणअणुप्पलाहीं अम्हेहीं एसो विरलणो कहंवि अविवाहिदोहोदि ।

**मांडवी.**—तोवि कोसिं अमहेसिणो पादवंदणं कदुअ अंतेउरंचरगच्छह्म.

**श्रुतकीर्तिः**— तहकरह्म.

**जनकः**— ( सानंदस्नेहबहुमानं ) एह्येहिवत्सरामभद्र,

दिनकरकुलदीपो, दीप्तबाहुप्रताप

श्चानुरिमपत्मीपश्चीवलालिंगितांग ;,

मधुपजनितसंविद्वारिधेः कर्णधार

स्त्वमसिसमधुतापाः प्राक्तनःपुण्यराशिः ९३

श्लोक.

सीता रामास द्यावयाची, ऊर्मिला लक्ष्मणा मुली,
मांडवी श्रुतकीर्ती त्या देती तदनुजा मुली.

**कौशिक**— फार चांगली गोष्ट आहे, द्याव्या.

**सीता**—( मनांत ह्मणते ) मदमत्त गजबाळक जसा उसाचें कांडें सहज शरीर न लागतां मोडून टाकितो, तसें ह्या माझ्या मनोरथवल्लभानें शिवाचें धनुष्य सहज मोडून टाकिलें कीं। काय बाई आश्चर्य हें! (मोठ्यानें ह्मणते) अगे ऊर्मिले, हें असें काय गे झालें ?

**ऊर्मिला**— अगे ताई, काय अरिष्ट सांगावें हें? ह्या रघुकुमारकानें शिवचाप मोडिलें, तेव्हां प्रळयकाळच्या मेघगर्जने प्रमाणें जो का मोठा भयंकर गडगडाट झाला, तेणेंकरून आम्ही तर बाई अगदीं भिऊन गेलों. तेव्हां गच्च डोळे मिटून घेतले आणि एकमेकींच्या गळ्यांत हात घालून जेथल्या तेथेंच उभ्या राहिलों। एक पाऊल देखील पुढें टाकवेना! अशी आमची वेंगडी वळली! याप्रमाणें ह्या एक क्षण मोठ्या कष्टानें मुठींत जीव धरून काढिला बाई !

**मांडवी**— तात कौशिकऋषी यांचें पादवंदन करून आतां बाई झटकर आपल्या घरीं जाऊं कशा!

**श्रुतकीर्ति**— होय गड्ये, चला तर लौकर लौकर।

**जनक**—( आनंदानें स्नेहानें व बहुमानानें ) ये वत्सा रामभद्रा, ये इकडे आमचे जवळ आतां.

श्लोक.

आदित्याचा दिव्यवंशप्रदीप, वीर्ये ज्याच्या तीव्र बहु प्रताप,
देहीं ज्याचा यौवनारंभ झाला, चातुर्याची खाण वाटे मनाला.

आर्या

मम प्रतिज्ञासागर तरण्याला कर्णधार झाला जो,
सीतापाकनपुण्यचि, ज्याच्या रूपास कामही लाजो

---

टीप— त्यांच्या धाकट्या भावांस (भरतशत्रुघ्नांस).

**रामः** ( मुखमाननयन्कौशिकपार्श्वेउपविशति. )

**प्रतीहारी.**— एषकन्याजनः संप्राप्तः.

**सीता.**—(विलोक्य) [१७] सोएसोखंडपरसुचावखंडणो एत्थ उवविसइ. म-
हपाणिपादाणप्पक्कमंदिसङ्झसेण। (इतिमांडवीपार्श्वेतिरोहितातिष्ठति).

**रामः**— ( स्व० )

कामंरुणद्धिविनयो गुरुसन्निधाने.
कांताविलोकनकुतूहलिनीं दृशंमे,
तत्पादनूपुररवश्रवणोत्सवोयं
कर्णौधिनोति, पदनेननकिंकृतीस्यो १ ६४

**ऊर्मिला.**— ( स्व० ) केहं मिथुजअचावखंडणस्स एदस्स पस्सेतस्स-
कत्तस्सुरगोरत्तुङमारोलस्सणो चिट्ठइ. एणंपेक्खंतीए मह हिअअं स-
रेण पहरंतस्स मअरद्धजस्स कीलामिमसणंगेण्ही अदि । कहं
एदं १ ( इतिजनकसमीपंगच्छति.)

**लक्ष्मणः**— ( स्वगतं ) अस्याःखलु ).

विशालाक्ष्याःकटाक्षेणविकृष्टरश्मिनेवमे
न्हवसं किंकरिष्यामि १ नपुनर्वर्तिवर्तते. ६५

**राम.**— ( संकोचानें खालीं तोंड करून **कौशिका**च्याचें जवळ जाऊन बसतो ).

**चोवदार**— महाराज, या मुली आल्या आहेत.

**सीता**— ( पाहून मनांत ह्म० ) अगे **शिवाचें** चाप मोडून टाक-णारा बाई एथेंच बसला आहे! मला तर त्याचें भय वाटून हात, पाय अगदीं लटपटतात! ( असें ह्मणून **मांडवी**च्या आड लपून उभी राहते ).

**राम**— ( मनांत म्ह० ).

श्लोक.

वाटे मनीं भय मला इस पाहण्यास,
कीं जे वडील बसले बहु आसपास,
ऐकूनि कर्णयुगुलें ध्वनि नूपुरांचा,
होईन धन्य अजि मी क्षण एक साचा.

**ऊर्मिला.**— ( मनांत ह्म० ) शिवचाप मोडणार जो **राम** त्याच्या शेजारीं, तप्तकांचनासारिखा गौरवर्ण व सुकुमार असा हा **लक्ष्मण** बसला आहे. त्याच्याकडेस मी जंव पाहतें तंव **मन्मथ** हा माझ्या ह्रदयास बाण मारितो, त्याच्या कोंडेला तें एक मृगरूपच झालें आहे जसें! हें काय बाई असें होतें! ( असें ह्म-णून **जनका**च्या जवळ जाते ).

**लक्ष्मण.**— ( **ऊर्मिले**ला पाहून मनांत ह्मणतो ).

श्लोक.

रश्मीपरीदीर्घ[1] कटाक्ष जीचा, आकर्षितो चित्त मदीय साचा,
बळें तयाला वळवूं पहातों, फिरे न तें,[2] यत्न निरर्थ होतो।

---

टीप.—१ दोरी प्रमाणें. २ चित्त.

(इतिपराङ्मुखास्तिष्ठंति )

**जनकः**— एषभगवान्कौशिकऋषिः प्रणंतव्योवत्साभिः

**कन्याः**— अहोंपणमामो तादपादाणि.

**कौशिकः**— वत्सा मनोरथेनयुज्यध्वं.

**कन्याः**— किंचिदपक्रम्यतिष्ठंति )

**कौशिकः**— अथैवयज्ञमारप्स्ये. त्वमपिराजराजप्रतिज्ञां निर्वर्तय.

**जनकः**— प्रतीहारिन्, नियुज्यतामधिकारिणः

द्वारिद्वारि निवेशयंतु कदलीस्तंभान्विनम्रान्फलै
र्व्यावल्गंतुसुधानुलेपधवलाभित्तीरगारेषु याः,
मन्द्वालीषुवितानपङ्क्तिषुततिंबध्नंतुपुष्पस्रजा
मालिख्यानिलिखंतु,सन्निधत्तेवत्साविवाहोत्सवः. ६६

**प्रती०**—तथेति (निष्क्रांतः)

( नेपथ्ये )

साकेतादाश्रमाभ्यर्णं संप्राप्तः कोसलेश्वरः,
यतस्तुरंगमातंगैराक्रांतेयममून्मही. ६७

**जनकः**— भगवन्कुशिकनंदन, देवव्रतोब्रवीति. तदेनपुरोधसाशतानंदेन रामलक्ष्मणाभ्यां वत्साभिश्चसहैव चिरप्रपस्मोमहाराजः समश्रयमावाभ्यां प्रत्युद्गमनेनसंभावयितव्यः.

( असें ह्मणून पाठमोरा उभा राहतो. )

**जनक**— अगे मुलीनो, हे भगवान् **कौशिक**महर्षी बसले आहेत, त्यांचें पादवंदन करावें.

**कन्यका.**— ( **कौशिकां**प्रत ह्म० ) महाराज आपल्या चरणा प्रत वंदन करितों !

**कौशिक**— चिंतितमनोरथसिद्धिरस्तु !

**कन्यका.**— ( अम्मळ बाजूस वळून उभ्या राहतात. )

**कौशिक**— **जनकराजा**, मी आजच यज्ञास आरंभ करितों. तुह्मी प्रतिज्ञा केल्याप्रमाणें कन्येच्या विवाहमंगलास प्रारंभ करावा.

**जनक.**—अरे भालदार, आपल्या येथें कन्याविवाहोत्सव प्राप्त झाला आहे, याजकरितां कामगार लोकांस जाऊन असी ताकीद दे कीं,

**श्लोक.**

द्वारोद्वारिं उभे करा सुकदलीस्तंभा[1] फलेघांसवें,
भिंती स्वच्छ करा, घरोघरिं सुधारंगास[2] द्या हो नवे,
माळा सुंदर पुष्पगुंफित तसीं बांधा वितानें[3] भलीं,
आला सन्निध कीं विवाह, लिहवा चित्रें बहू चांगलीं.

**चोबदार.**— आज्ञा महाराज, ( असें म्हणून निघून जातो. )

( इतक्यांत पडद्या पलीकडे शब्द होतो. )

**आर्या.**

आश्रमसन्निध राजा **दशरथ** येऊन ठेपला आजी,
म्हणुनि स्यंदन[4] वारण[5] दिसती येथें तसेचि बहु वाजी[6]

**जनक.**—अहो भगवंता **कुशिकनंदना**, हे **देव**व्रत सांगतो बरें. तर आपण, मी व हे उपाध्याय **शतानंद**, ह्यांनी **राम**, **लक्ष्मण**,व या कन्यका, ह्यांसहवर्तमान आमचा वृद्धमित्र जो **दशरथ**राजा याला आदरपूर्वक सामोरें जाऊन संभवना केली पाहिजे.

---

टीप–१ चांगल्या केळींचे खांब. २ चुन्याच्या रंगास. ३ छतें. ४ रथ. ५ हत्ती. ६ घोडे.

**कौशिकः**— एवंभवतु.

**जनकः**— देवव्रत, कोसलेश्वरस्यसावरोधजनस्यच संभावनार्थं अंतः पुरिकाजनमप्यन्वगुपस्थापयेति.

( इतिनिष्क्रांताः सर्वे )

इतिचतुर्थोंकः ४.

---

**कौशिक.**— बहुत उत्तम आहे.

**जनक.**— देवव्रता, दशरथराजा बरोबर त्याची बायकामंडळी आली आहे. त्यांच्या संभावनार्थ आपल्याही बायकामंडळीस लौकर पाठवून दे बरें. आम्ही तर हे चालते झालों.

( असें बोलून सारे निघून जातात. )

( चौथा अंक समाप्त. )

( ततः प्रविशति विराधः )

विराधः—

श्रुत्वाजनस्थानजुषामृषीणां

त्राणायरक्षोहननेप्रतिज्ञां,

संप्राप्तकोपः सखरः सहायं

मांप्राहिणोद्दाशरथेर्वधाय. १

( सगर्वस्मितं )

रक्षसांबलवान्राजा, ततोपिप्रथितः खरः,

ततोपिलवणस्तस्मादप्यहं, कोस्तिमेसमः १२

## जानकीपरिणय नाटक.

### अंक ५.

#### पात्रें.

विराध, राक्षस . . . रामाच्या वधार्थ खरानें पाठविलेला.
शूर्पणखा, राक्षसी. रावणाची बहीण.
राम . . . . . . . दशरथराजाचा पुत्र.
सीता . . . . . . रामाची स्त्री.
लक्ष्मण . . . . रामाचा धाकटा भाऊ.
जटायू ( गृध्रजातीचा पक्षी ) दशरथराजाचा मित्र.

---

( तदनंतर विराधनामा राक्षस पडद्याबाहेर येतो. )

विराध.—

श्लोक.

जनस्थानवासी ऋषी राखण्याची,
प्रतिज्ञा तसी राक्षसां मारण्याची,
मनीं ऐकुनी कोप आला खरातें.
मला धाडि तो मारण्या राघवातें.

( गर्वानें हासून ह्मणतो. )

अभंग.

रावण राक्षसांमाजी बळवान, त्याहूनियां जाण खर बळी,
खराहूनी लवणाख्य निशाचर, त्याहूनीयां थोर बलाढ्य मी.
म्हणुनीयां मजसारीखा समर्थ, नसे हाची अर्थ सिद्ध असे.

परंतु केकसीसूनुरितिलंकाराज्येदशग्रीवोभिमतोस्माकं. (विचिंत्य) हंत, हंत ।

किंवक्ष्ये राजपुत्रस्य धैर्यंहिमगिरेरिव,
यस्यप्रतिज्ञाकुरुते रक्षोमात्रमभर्पणं । २

तदिदानीं खरवचनाद्दतेपिमयायमनुशासनीयः. दृष्टश्चमयायमवलंबितपरपुष्टरूपेण, यएषसीतयासहसंलपन्समुन्नतगिरितटगतं, विविक्तरमणीयं, प्रवृद्धमुकुलगुरुभिर्बकुलतरुभिः प्रच्छायशीतलशिलातलंअधिवसति. लक्ष्मणश्च पर्णकुटिद्वारदेशे पाटीरतरुवाटीपरिसरेनिवेशितनिषंगशरासनकांडोमंडलाग्रमवकृष्यकोशगर्भान्निर्मरमवलोकयति धारापथं. अहोकीदृगस्यगांभीर्यं ! कीदृशमिदंधीरोद्धतमवस्थानंच. ! ( सवैक्लव्यं )

जेतुंक्षमः किमयमद्भुतबाहुसत्वः
सौमित्रिरेवसमः दाशरथौ कथाका ३
तज्जानकीं रघुशिशोरथलंब्धरूपं
देशेदवीयसिहरन्विहरेयथेष्टं. ४
अस्यावियोगात्प्रियस्यारामोहास्यतिजीवितं,
सौमित्रिरपिचभ्रातुः, खरस्येष्टंचसिध्यति. ५

असें असून रावणालाच जें लंकेच्या सिंहासनावर आम्ही बसविलें तें केवळ तो ककसीचा पुत्र एवढ्याच हेतूनें होय, दुसरें कांहींनाहीं. ( विचार करून म्हणतो ) अरेरे ! काय करावें !

**श्लोक.**

धैर्य ह्या राजपुत्राचें हिमालयगिरीपरी,
ज्याची प्रतिज्ञा सकलां राक्षसांतें भया करी

तर खरानें सांगितलें नसतें तरीही मला यास शिक्षा करणें अवश्यच होतें. असो, तर मी नुकताच कोकिलाचें रूप घेऊन येथें त्याचा शोध केला. तेव्हां या उंच पर्वताच्या तटावर मोठमोठ्या व फुलांनीं भरून गेलेल्या बकुलवृक्षांच्या दाट व शीतल छायेंत एका रमणीय व एकांतस्थळीं एके शिलातलावर सीता व राम उभयतां गोष्टी सांगत बसलेलीं मी पाहिलीं, तसेंच पर्णशाळेच्या द्वारापुढें चंदनवृक्षांच्या वनांत लक्ष्मणाही आपला भाता व धनुष्यबाण हीं ठेवून कोशांतून खड्ग उपसून त्याची धार कशी काय आहे हें मोठें लक्ष्य देऊन पाहत बसला होता हेंही पाहिलें. अरे त्या लक्ष्मणाच्या अंगीं केंवढा गंभीरपणा व त्याचें बसण्याचें अवसान कसें धीरपणाचें व बेपरवाईचें होतें ! ( खेद पावून म्हणतो ).

**श्लोक.**

सौमित्रि हाच बलवान् मज दुर्निवार,
रामप्रणाशनकथा तंव फार दूर.
रूपास यास्तव धरोनि रघूद्वहाचे,
सीतेस घेउनि, गमे, पळणेंच साचें.
जानकीच्या वियोगानें राम सोडिल जीवित,
रामाच्या लक्ष्मण तसा, साधेलहि खरेप्सित.

टीप.–१रामाची मारणकथा.२रामाच्या वियोगानें.३खराचें इष्टकार्य.

तदेकाकिन्या जनककन्यकाया बहिर्निष्क्रमणं प्रतीक्षमाणो नाति-दूरेऽस्मिन्कोविदारवने स्थास्यामि. न ह्यत्र जटायुर्दृश्यते; नूनमसौ संपातिमग्रजमभिवादयितुं प्रस्थितः, (पुरोवलोक्य) कथमियं लंकाद्वीपादिह शूर्पणखा संप्राप्ता. भवतु. पृच्छामि महाराजलंकेश्वरस्य कुशलप्रवृत्तिं (इतिपरिक्रामति.)

(ततः प्रविशति शूर्पणखा)

**शूर्पणखा**— अहं खु पंचवडीकिदकुडीरस्स रहुराअउत्तस्स कलत्तं जाणई मण्णिमित्तं आहरेत्ति अग्गजेण महाराअलंकेसरेण अणुप्पेसिदम्हि. दिठ्ठा खु सा मत्तुणो परसवट्टिणी गिहीवण्णचूसरूपाए मए कहं उण आहरिस्सं त्ति चिंतेमि. अहवा चिठ्ठदु एदं.

कंदप्पसुंदरे तस्सिं कंदोट्टदलसामले
रामे दिठ्ठिपहं पत्ते कामेण हरिदं मणे ६

तदाणिं जाणईरूवं अवलंबिअ दूरदो रामं एआइणं णिग्गअं गेण्हिअ हेमऊडसेलप्पदेसे इमिणा अहमणोरहं विहरिस्सं (इति परिक्रामति)

**विराधः**— अयि शूर्पणखे, स्वागतं भवत्याः.

**शूर्प०**—कहं विराहो ? अज्ज, अवि णाम कुसली होसि ?

**विराधः**— अपि कुशलं महाराजलंकेश्वरस्य ?

तर आतां **जानकी** एकटी केव्हां बाहेर पडेल त्याची वाट पाहत, एथून जवळच कोविदारे[1] वृक्षांचें वन आहे, त्या वनांत जाऊन दडून बसतों. **जटायूही** येथें कोठें दिसत नाहीं. तेव्हां तो आपल्या ज्येष्ठ बंधूचें पादवंदन करण्याकरितां गेला असेल असें वाटतें. ( पुढें पाहून ह्मणतो ) काय ! **लंकापुरी**पासून येथें **शूर्पणखा** प्राप्त झाली ! बरें तर हिला महाराज **लंकेश्वर** यांचें कुशळ वर्तमान विचारावें. ( असें म्हणून इकडे तिकडे फिरतो ).

(इतक्यांत **शूर्पणखा** पडद्या बाहेर येते. )

**शूर्प०—रघुकुमार** हा पंचवटीमध्यें पर्णकुटी बांधून तेथें राहत आहे. त्याची स्त्री **जानकी** हिला "मज साठीं हरणकरून आण" असें सांगून माझा वडील भाऊ जो महाराज **लंकेश्वर**, यानें मला येथें पाठविलें. ती **जानकी** आपला भर्ता जो **राम** त्याच्या जवळ बसली आहे. ती मी एका प्रकारच्या पक्ष्याच्या रूपानें जवळ जाऊन पाहिली. आतां तिचें हरण कसें करावें, हाच मला विचार पडला आहे. अथवा हरण करण्याचा तरी विचार कशाला करावा ?

## श्लोक.

आकार ज्याचा मदना[2] समान, नीलोत्पलाचे परि नीलवर्ण,
तो पाहिला आज वनांत **राम**, तेणें मना मोह करीत कामें.

तर आतां **जानकीचें** रूप घ्यावें, आणि **राम** हा एकटाच बाहेर निघाला ह्मणजे त्याला गांठून **हेमकूट** पर्वताच्या प्रदेशीं घेऊन जावें, व तेथें त्याजबरोबर यथेच्छ विहार करावा. ( असें बोलून इकडे तिकडे फिरते ).

**विराध**— अगे **शूर्पणखे**, बरी आहेस ना !

**शूर्प०**-काय ! **विराध** कीं ? **विराधा**, बाबा तूं खुशाल आहेस ना!

**विराध**.— महाराज **लंकेश्वर** कुशल आहे कीं ?

---

टीप.— १ वृक्षविशेष. २ मदन.

**शूर्प०**— कुसलं[3] हुविस्सदि, जइ णिव्विआरो वट्टिस्सदि.

**विराधः**— ( स्वगतं ) कइवास्यविचारः ( प्रकाशं ) अपिश्रुता महाराजेन रजनीचरेषु वधप्रतिज्ञा दाशरथेः ?

**शूर्प०**— सुदं[4] अ इदो कादव्वं अमच्चेहिं मंतिदं. चारणेण खरस्स किवि अविण्णादं अण्णेहिं संदिट्ठं असी.

**विराधः**— ( स्वगतं ) अतएवाहंखरेण सबहुमानमाहूय प्रस्थापितोस्मि. ( प्रकाशं ) कथं राक्षसशिक्षार्थमेव जनस्थानमागताविमौ क्षत्रियकुमारौ ?

**शूर्प०**— सुणोदु अज्जो. अज्जमहाराएण किदं अणत्थसंविहाणं.

**विराधः**— सादरमवहितोस्मि.

**शूर्प०**— अत्थि जणअणामराएसी.

**विराधः**— जानामि, यः खलु माहेश्वर इति महाराजस्य मैत्रीपदं.

**शूर्प०**— तस्स कण्णअं सीदं रामाणुरत्तेति रामवेसं कदुअ परिणेदुं गओ महाराओ.

**विराधः**— ( स्वगतं ) ममैवैतस्यापितस्यां मनः संवृत्तं भवेत्. ( प्रकाशं ) ततस्ततः ?

**शूर्प०**— विचार मसलत करण्याची गरज नसती, तर मग तो कुशळ च असता

**विराध.**—( मनांत ह्मणतो ) त्याला विचार तो कोणता येऊन पडला असावा बरें ? ( मोठ्यानें ह्मणतो ) यावद्राक्षस मारून टाकण्याची **दशरथ**पुत्रानें प्रतिज्ञा केली आहे ती महाराजांच्या कानावर गेली काय ?

**शूर्प०**— होय, ती त्याच्या कानावर जाऊन अणखी पुढें कसें काय कर्तव्य याचाही विचार अमात्यांनीं मिळून ठरविला. **चारणा**नें इतर कोणाला ठाऊक नाहीं असा **खरा**ला गुप्त निरोप पाठविला आहे.

**विराध**—( मनांत ह्मणतो ) हाँ। ह्मणूनच **खरा**नें मोठ्या सन्मानानें मला बोलावून इकडे पाठवून दिलें। ( मोठ्यानें ह्म० ) हे दोघे क्षत्रियकुमार जे **जनस्थाना**स आले आहेत, तेच काय राक्षसांस मारण्याच्याच बेतानें आले आहेत ?

**शूर्पणखा**— **लंकेश्वरा**नें एक अनर्थकारक कृत्य करण्याचा उपक्रम केला तो प्रकार सांगतें ऐक.

**विराध.**—ठीक आहे, सांगावें. मी एकाग्रचित्त करून सादरपणें ऐकतों.

**शूर्प०**—**जनक** या नांवेंकरून एक राजर्षि आहे.

**विराध.**—होय तो मला ठाऊक आहे. तोही मोठा **शिव**भक्त ह्मणून **लंकेश्वर** हा त्याबरोबर फार मैत्रीनें वागतो.

**शूर्पणखा.**— त्याला **सीता** या नांवाची एक कन्या आहे. तिची प्रीति **रामा**च्या ठिकाणीं फार ह्मणून **रामा**चा वेष घेऊन महाराज **लंकेश्वर** तिला वरण्याकरितां गेला.

**विराध.**— ( मनांत ह्म० ) जसें माझें मन तिजवर जडलें आहे, तसें त्याचेंही जडलें असेल. असो. ( मोठ्यानें ह्म० ) बरें वरण्याकरितां गेला, पुढें ?

**शूर्प०**— तदो जणएण संकरसरासणारोवणं दुहिदाए परिणअस्स पणीकिदं.

**विराधः**— तत्सुदुष्करं महाराजस्य.

**शूर्प०**— तदो एव्व राअउत्तेण सीदा परिणीदा.

**विराधः**— ततस्ततः

**शूर्प०**— तदो दुण्णिवारा मरिसरोसलज्जाणुराअपरवसेण मह भादुणा लंकाउरं पविसिअ मल्लवंतप्पमुहेहिं अमच्चेहिं मंतिअ किंपि णिच्चिदं आसी.

**विराधः**— ततस्ततः ?

**शू०**— तदो संकरसरासणभंगणिवेदणरोसाविदो माहेसुरो भारगवरामो रामोवरि संपेसिदो.

**विरा०**— सखलु निखिलक्षत्रियवधप्रतिज्ञापारदृश्वा पारश्वधिकः. ततस्ततः ?

**शू०**— तदो सोवि तेण राहवेण महुरिमुच्चाविणं सह गिहीदसत्ती पुण्णलोअगइणिरोहेण मग्गमदो किदो.

**विरा०**— ( सविषादाद्भुतं )

> कार्त्तवीर्यस्य दोर्वीर्यग्रस्तपौलस्त्यतेजसः
>
> हतापि येन जितो, हंत, रामेण त्रिजगज्जितम् ॥ ७

ततस्ततः ?

**शूर्प०**—पुढे, शंकराच्या धनुष्यास दोरी जो लावील, त्याला कन्या प्राप्त होईल, असा **जनकानें** पण केला.

**विराध.**—हा पण तर आपल्या महाराजांस पार पाडण्यास अशक्य.

**शूर्प०**— तेव्हां त्या राजपुत्रानें ती दोरी लावून तात्काल **सीतेला** वरिलें.

**विराध.**— बरें मग काय झालें ?

**शूर्पणखा**— तेव्हां माझ्या भावाला हेवा, राग, लज्जा हे सर्व मनोविकार अनिवार उत्पन्न झाल्यामुळें, तो त्यांच्याच स्वाधीन होऊन गेला. मग **लंकापुरीस** येऊन **माल्यवान्** इत्यादिक मंत्री लोकांस मिळवून कांहीं एक मसलत ठरविली.

**विराध.**— पुढें ?

**शूर्प०**— पुढें **भार्गवराम** हा महाशैव म्हणून त्याला **शिव**धनुष्य मोडल्याचें वर्तमान सांगून रागास चढवून **रामावर** पाठविलें.

**विराध.**—ठीक। तो तर परशुकरून सर्व क्षत्रिय मारून टाकण्याची प्रतिज्ञा पार करण्याविषयीं समर्थ होय. असो त्याचें काय झालें ?

**शूर्पणखा**—मग त्या **भार्गवरामापासून दाशरथि रामानें** त्याच्या शक्तीसहवर्तमान **वैष्णव**चाप हिसकून घेतलें, आणि त्याची उत्तमलोकाप्रत जाण्याची गति कुंठित केली. अशा प्रकारें त्याचा गर्व उतरला.

**विराध**—( खेदानें व आश्चर्यानें हा० ).

## आर्या

**अर्जुनें दशकंठाला** जिंकी, त्याला[1] वधी **परशुराम**;
त्यालाहि जरी जिंकी, तरि जिंकिल तो त्रिलोकिंही **राम**,
बरें पुढें काय झालें ?

---

टीप—१ सहस्रार्जुन राजा. २ रावणाला. ३ कार्तवीर्याला.

शू०— तदो महाराएण पहिदेहीं मअविद्युज्जीहसारणेहीं आविद्धो, मं-
घरा केकईदसरहावि.

विरा०— ततस्ततः ?

शू०— तदो मंधराए रामस्स वणेणिवासं भरदस्स रज्जाहिआरं भट्टा-
पुव्वदिण्णेण वरजुअलेण पत्थिदव्वोत्ति अणुबंधिअमाणा केक-
ई तहेत्ति कोट्ठागारं पविट्ठा.

वि०— निश्चितमन्यत् ; ततस्तयाप्रार्थितस्तथा राजा वृद्धोपि तरुणी-
कामुकः पुत्रं वनं प्रापितवान्.

शू०— तदो लक्खणो सीदाअ वणं पत्थिदं रामं अणुगदा. पच्छा द-
सरहेण रक्खसावेसविमुक्कदेहेण पुत्तविवासणं जाणिअ पुत्तसि-
णेहेण पाणा विमुक्का.

वि०— अथ मारितो दशरथो महाराजेन. । ततस्ततः ?

शू०— तदो कणिट्ठभाउणा अणुचिदं रज्जं तज्जता भरदेण वणं आअदे-
ण पत्थिदो रामो.

**शूर्पणखा—** पुढें, महाराज लंकेश्वरानें **मय, विद्युज्जिह्व** आणि **सारण** या तिघांस पाठविल्यावरून त्यांनीं **मंथरा, कैकेयी** व **दशरथ** या तिघांच्या शरीरांत संचार केला,

**विराध—** मग ?

**शूर्पणखा—** मग पुढें **दशरथ**राजानें दोन वर देण्याचें कबूल केलें होतें त्या दोहोंतून एक वरानें **रामा**ला वनांत पाठवून द्यावें, आणि दुसऱ्या वरानें **भरत**ाला राज्य द्यावें, याप्रमाणें राजापासून हट्टानें मागून घे, असें **मंथरेनें कैकेयी**ला चिथावून दिल्यावरून बरें आहे, तसें मागून घेतें, असें म्हणून ती राजावर रुसून क्रोधमंदिरांत जाऊन निजली.

**विराध—** पुढचें वर्तमान काय झालें तें तुझ्या सांगण्यापूर्वींच माझ्या ध्यानांत येऊन चुकलें. तिनें त्या म्हातारे भ्रतारापाशीं या दोन वरांचा हट्ट घेतला असेल. मग राजा तर काय सांगावें तरुणीकामुकच, त्यानें तिच्या मागण्यास रुकार देऊन पुत्राला वनांत पाठविलें असेल, असेंच झालें कीं नव्हे ?

**शूर्पणखा—** होय असेंच झालें. जेव्हां **राम** वनांत जाऊं लागला तेव्हां **लक्ष्मण** व **सीता** हीं दोघेंही त्याच्या बरोबर वनांत गेलीं. नंतर **दशरथ** राजाचे अंगांत राक्षसानें संचार केला होता तो निघून गेल्यावर पाहतो तों पुत्रास वनांत पाठविलें, असें जाणून पुत्राचे प्रीतीस्तव मोठा शोक करून त्यानें आपले प्राण सोडिले.

**विराध—** एकून आपल्या महाराजानेंच अशा युक्तीनें **दशरथा**ला मारविलें ! बरें असो. पुढें काय झालें ?

**शूर्पणखा—** पुढें मी धाकटा भाऊ, मला राज्याधिकार योग्य नाहीं असें मनांत आणून **भरत**ही वनांत **रामा**पाशीं गेला; आणि परत येण्याविषयीं बहुत प्रार्थना करूं लागला. परंतु तो न ऐकतां

पादुके पडिणिहीकरिअ भरदो अओज्झं पाविदो.

वि०—विदितो वृत्तांतः, कः पुनरिहार्थः? ननु महाराजेन प्रनमातात्य रामस्य प्रभुशक्तिरपनीता. तदभावे च कः पुनः प्रसंगो मंत्रोत्साहयो-रिति निपुणमुपक्रांतं. त्वंपुनः किमर्थमिदानीमागता?

शू०—जाणई ओहरिदव्वेत्ति लंकेसुरेण पेसिदह्मि.

वि०—(स्व०) सेयं विराधेन स्वीकरिष्यते. (प्र०) अशक्यमिदं मवस्याः.

शू०—(स्व०) मैहं खु जाणइए वेसेण रामं गेण्हिअ विहरिस्स इति ववसाओ. होदु. एवं भणिस्सं (प्र०) अदो जेव्व लंकाउरं पत्थिदह्मि.

वि०—(सहर्षस्व०) मम खलु मत्कृतकार्ये सिद्धो महान्मसुहृ. (प्र०) तथाक्रियतां.

शू०—तुमं उण कीस रामसमीवं आअदोसि?

विरा०—रामो हंतव्य इति खरेण प्रहितोस्मि.

शू०—(स्व०) हंदास, महवल्लहं मारिडुं आअद तुए. अवेहि अवेहि. (प्रकाशं) तुहरि एवं ण सक्कं होदि.

**रामानें** त्याला आपल्या पादुका प्रतिनिधित्वेंकरून राज्यावर बसविण्यास देऊन परत **अयोध्येप्रत** पाठविलें.

**विराध**— झालें. हें तूं वर्तमान सांगितलें तें कळलें, पण यांत अनर्थ तो कोणता ? अगे, **रामाला** वनांत घालवूनं दिलें, येणेंकरून **रावण** महाराजानें त्याची प्रभुशक्ति[1] नष्ट केली. प्रभुशक्तिच नष्ट झाली, मग त्याच्या अंगीं मंत्रशक्ति व उत्साहशक्ति कोठून राहणार ? यावरून **लंकेश्वरानें** हा उत्तम विचार केला. यांत कांहीं वावगें केलें असें नाहीं. असो, पण तूं येथें कशाकरितां आली आहेस ?

**शूर्पणखा**— **जानकीला** हरण करून आणावें ह्मणून **लंकेश्वरानें** मला पाठविलें आहे.

**विराध**— ( मनांत ह्मणतो ) अँः तिला तर अस्मादिक घेणार ! ( मोठ्यानें ह्म० ) हें कार्य तुला होणें अशक्य दिसतें.

**शूर्पणखा**— ( मनांत ह्मणते ) मी तें कोठें करितें आहें ? **जानकीचें** रूप घेऊन **रामाला** दूर फसवून न्यावें आणि त्याबरोबर यथेष्ट क्रीडा करावी या खटपटींत मी आहें। असो. पण याजवळ असें सांगावें.(मोठ्यानें ह्म०)ह्मणून तर मी परत **लंकेस** जात आहें.

**विराध**—( हर्षित होऊन मनांत ह्मणतो ) माझ्या ह्या प्रस्तुत कार्यांत ह्या बाईचें मोठेंच विघ्न आलें होतें. पण तें एकदाचें टळलें. ( मोठ्यानें ह्मणतो ) ठीक आहे. जा तर लौकर.

**शूर्पणखा**— बरें तूंही **रामाच्या** सन्निध काय ह्मणून आलास ?

**विराध**—**रामाला** मारण्याकरितां ह्मणून मला **खरानें** पाठविलें आहे.

**शूर्प**०— ( आपल्याशीं ह्म० ) हा मेल्या, माझ्या प्राणवल्लभाला मारायास आलास काय ? जा कसा येथून निघून, चल. ( मोठ्यानें ह्म० ) हें कार्यही तुला व्हायास अशक्यच आहे.

---

टीप.— १ प्रभाव, उत्साह व मंत्र, या तीन शक्ति राजास असतात, असें नीतिशास्त्रांत वर्णिलें आहे.

**विरा०**—(स्व० )किमेतेन ? यदहं जानकीं गृहीत्वा गंतुमिच्छामि मव त्वेवं वक्ष्यामि.(प्र०) अतएव यथादृष्टं निवेदयितुं खरस्य समीपं ग मिष्यामि.

**शू०**— ( स्व० ) मेहे खु पत्तुदकज्जे दिठ्ठिआ डुरिअं णिउत्त ! ( प्र० ) तह गच्छेहि जहा समीहिदं काडुं. ( इत्युभौ निष्क्रांतौ )

( मिश्रविष्कंभकः )

( ततः प्रविशति यथानिर्दिष्टौ रामः सीता च )

**रामः**— अयि प्रेयसि जानकि,

चंद्रार्द्धशेखरशरासनमद्रिसारं
मीनध्वजस्य मयि चापविकर्षणं च
शौर्यस्मयं भृगुपतेश्च समापयंती
लब्धासि, सुंदरि, मया लघुनोद्यमेन. ८

**सीता०**— सस्मितवदनातिष्ठति.

**रामः**—

परभृतनिनदेन भाषितौ दौरवस्थ्यं
सुखय किमपि कर्णौ, सुंदरि, व्याहृतेन,
ननु वहति मुखं ते पुंडरीकस्य लक्ष्मीं,
न पुनरिदमुदंचच्चंचरीकारवस्य. ९

**सीता०**—(सप्रणयं) अज्जउत्त, अहं खु दाणिं तुए किदं अणण्णडुक्करं सरगचावस्स भरगबडुरवलेवस्स भंगं

**विराध**—(मनांत ह्म०) मी कोठें त्याच्या पाठीस जातों आहें? जानकीला घ्यावी आणि निघून जावें इतकाच माझा बेत आहे. असो हिच्याशीं असें बोलावें. (मोठ्यानें ह्म० ) अशक्य आहे ह्मणून तर जें काय पाहण्यांत आलें तें निवेदन करायाकरितां **खराकडे** जातों.

**शूर्पणखा**—( मनांत म्हणते ) जातोस तर बरें झालें. माझ्या प्रस्तुत कार्यांत हें एक दुरितच आलें होतें, तें दैवानें दूर झालें. ( मोठ्यानें ह्मणते ) बरें आहे. जा तर लौकर. (असें बोलून दोघें निघून जातात ).

( ही पूर्वोत्तर कथेची संगति. )

( तदनंतर सांगितल्या प्रमाणें **राम** व **सीता** हीं दोघें पडद्याबाहेर येतात ).

**राम**—अगे प्रिये **जानकी**,

### आर्या.

गिरिवच्छिवधनु[1] मदनप्रहार अणि **जामदग्न्य**गर्व, तसा
यांतें संपविती तूं, यत्न करुनि मिळविली प्रिया लघुसा.

**सीता**.—( गालांत हांसून उगीच बसते. )

**राम**.—

### श्लोक.

कोकिलध्वनिस फार ऐकतां कर्ण हे व्यथित जाहले अतां,
त्यांस वाणि मधुरा सुधेपरी सौख्य देउ, दयिते, तुझी बरी;
तुझें आस्य हें फुल्ल पद्मापरी गे, मदीया मनाला बहू गोड लागे,
परी पद्मगर्भीं जसा षट्पदांचा[2], तसा मंजुल ध्वान[3] येथें न साचा.

**सीता**.—( स्नेहानें ह्म० )अहो प्राणनाथ, **भर्गचाप** आणि **भार्गव**गर्व यांचा आपण भंग केला. हें कर्म इतर कोणाच्यानें व्हावयाचें नाहीं.

---

टीप— १ पर्वतासारिखें शिवचाप. २ भ्रमरांचा. ३ शब्द.

सुमरिअविलअत्थइद हिअअंसि. ता खणमेत्तं पसीद.

रामः— कथमितरवत्प्रसादमभ्यर्थते भवती ! न किंचिदस्ति कोपका रणं. किंतु शृणु तावत्;

हस्तप्राप्तमुपास्य यद्गुरुगिरा राज्यं वने प्रस्थितं,
रामेति स्मरता च यद्विमनसा तातेन यातं दिवि,
भीमश्वापदराक्षसैकभवने यच्चोष्यते कानने,
शोकं तं निखिलं प्रमार्ष्टि, सुमुखि, त्वत्साहचर्यं मम. १०

सीता०— णाह, तुह सण्णिहाणं अरण्णेवि महणअरादोवि सुहं संपा देदि.

रामः— एवमेव, पश्यतां.

संगीतं क्व मृगीदृशां मधुलिहामग्रे कलं कूजताम्,
आरण्यद्विपकर्णतालनिनदैरातोद्यमुत्सार्यते,
नातिक्रामति हंसतूलशयनं किं पल्लवास्तरो ?
भुक्त्या वन्यफलैर्विपाकमधुरैः पौरी च विस्मार्यते. ११

सीता— अज्जउत्त, अह विविसमिअ पक्खिगणजुत्तं एवं रण्णं रोअइ मेहिअअस्स.

रामः— युक्तमाह भवती.

नीपस्कंधे निवसति लसद्बर्हभारो मयूरो,
दीर्घापांगश्चरति च तृणं शाद्वलेयं कुरंगः,
कुंभेनोच्चैः स्पृशति विटपे सल्लकीं कुंजरोऽसौ,
कस्मै नाम, कमलनयने, रोचते ऽरण्यभागः ? १२

ह्या गोष्टीचें स्मरण होऊन माझें चित्त आश्चर्यानें केवळ थक्क झालें आहे याजकरितां क्षणमात्र क्षमा करावी.

**राम.**—हें काय ! ही मजपाशीं क्षमा कसली मागते ? ( सीतेस स्प० ) मला कोप येण्यासारिखें तर तुजपासून कांहींच घडलें नाहीं, परंतु उलटें

### श्लोक.

सोडीनी निजराज्य तातवचनें आलों वनाभ्यंतरीं,
जेथें क्रूर जनावरें वसति, गे, क्रव्याद[1] ही, सुंदरी,
तातानें त्यजिली तनू, मज 'अरे रामा' असें बाहुनी,
या दुःखा निरखला हरी, जनकजे, सान्निध्य तुझें वनीं.

**सीता.**—अहो प्राणनाथ, तुमच्या सन्निधानामुळें मला ह्या अरण्यांत देखील नगरवासापेक्षांही विशेष सुखें होतात.

**राम.**-खरें ह्मणतेस. पहापहा !

### श्लोक.

स्त्रीसंगीतहि[2] तुच्छ या मधुकरध्वानापुढें[3], सुंदरी,
हत्तींचे श्रुतितालें[4] तुच्छ करितो वाद्यांचिया कुसरी[5],
जैसी पल्लवनिर्मिता, तसि नसे शय्या पराचीहि कीं ?
पक्वान्नाशन तुच्छ काननफलाहारापुढें[6], जानकी[7].

**सीता.**—प्राणनाथ, ह्या वनांत मृग व पक्षी यांचे समुदाय फार चित्रविचित्र आहेत ह्मणून हें वन मला फारच आवडतें.

**राम.**— खरी गोष्ट आहे.

### श्लोक.

नीपाग्रावरि[8] मोर हा बसतसे सद्बर्हशाली[9] कसा,
ज्याचें दीर्घ अपांग[10] तो हरिणही येथें चरे हा तसा,
हत्ती हा निज उच्च कुंभयुगुलें ह्या सल्लकीतें[11] शिवे,
शोभा येथिल पाहुनी मन न तें कोण्या नराचें निवे ?

---

टीप.—१ राक्षस. २ स्त्रियांचें गाणें. ३ भ्रमरशब्दा पुढें. ४ कानाचे झटके. ५ कळा. ६ रानांतील फळांच्या आहारापुढें. ७ हे जानकी. ८ कदंबाच्या अग्रावर. ९ चांगल्या पिच्छांचा. १० नेत्रान्त. ११ साळईचें झाड.

## साक्या.

धम्मिल्लाची¹ शोभा धरितो निजबर्ही हा मोर,
हरिणहि धरितो निजनेत्रीं गे, तव दृग्शोभा थोर,
कुचशोभेतें मस्तकरी निजकुंभीं वाहे फार,
ह्मणुनि वनश्री² तव साम्यातें धरिते ही साचार.

**सीता.**—(अनुरक्त होऊन मनांत ह्म०) आतां प्राणनाथ माझेंच वर्णन करायास लागले. तर आतां यांचें लक्ष्य दुसऱ्या विषयाकडे लावावें. (मोठ्यानें ह्म०) अहो प्राणप्रिय, ज्यांच्या दाढा बालचंद्राच्या परी निर्मल व कोमल आहेत, ज्यांचीं मुखें मृदु व कराल आणि विस्तीर्ण आहेत, ज्यांचीं शरीरें पूर्णचंद्रासारिखीं शुभ्र आहेत, असे हे कोणत्या जातीचे मृग क्रीडा करिताहेत बरें ? तसेंच पूर्णचंद्रोदयसमयीं दुग्धसागरास भरती येऊन त्याच्या लाटा एकमेकींवर आदळून जे फेंसाचे राशी उत्पन्न होतात, त्यांसारिखीं पांढरी शुभ्र ज्यांचीं पुच्छें लांबलांब व चंचळ, व अवलोकन समयीं ज्यांचीं बुबळें गरगर फिरतात, असे कित्येक मृग येथें आसमंतात भ्रमण करिताहेत, हेही कोण्या जातीचे मृग आहेत बरें ?

**राम.**— हे जनककुलनंदिनि, जे पहिल्यानें ह्मटले ते सिंहाचे बालक व दुसऱ्यानें ह्मटल्या त्या चमरी ह्मणजे वनगाई होत. हे आपल्याला पाहून इकडे तिकडे पळताहेत. आतां पहा,

## अभंग.

सिंहाचे बाळक येथें क्रीडताती, चमरी पळती पाहोनीया.
दरींतील वाघ महीपा धरोनी, नेताती ओढूनी निजबळें.
डुकरांचे झुंझ लागले उद्धट, झाले एकवट खेळाया जे.

---

टीप—१ बुचडा. २ वनशोभा.

मध्याक्षेपवशावधूतसरघावध्मानव्याकुल-

कोशत्कीशकुलं, फलं नयनयोरेतद्विधत्ते वनम्. १४

**सीता**— ( दृष्ट्वा ) [२६] सहि तिनिसद्दुमविडवेसु लोवंति दाण मत्तमहुम-

क्खिव अप्पउलाई, ण उण सुलहाइँ सरहावाहिदेहिँ वाणरेहिं

**रामः**— अथ किं.

**सीता**— [२७] ऐरिसो अत्थपरत्सप्प आसो, जइ अण्णेण णिक्खिविदं

अण्णो अणुहवदि. जं इमिणा महुमक्खिवआगणेण भरिदं महुणि

उणो माणुसो गेण्हिअ आस्सादेइ.

**रामः**—(स्व०) अर्थपरोर्थं न भवति, किंतु मयि संभावनेयमस्या. (प्र०)

(अन्येन निक्षिप्तमन्योऽनुभवति भाग्यवशात्,) पश्य

अपहसितसुधारसं त्वदीये मधुनि दधाति मनोभवोऽधरोष्ठे,

कथमपि, मिथिलाधिराजकन्ये, पिबति न किं जन एष तद्गृहीत्वा. १५

**सीता**— [२८] अविक्कामइ अज्जउत्तस्स सजण्पिदं. ( इति सलज्जमवाङ्मु-

खी तिष्ठति. )

मधाचीं पोवळीं पाहुनीयां वशा[1], डबिती माशा तेथोनीयां.
तेथोनी उडोनी झोंबती माकडां, डंख नाकातोंडा मारूनीयां.
तया वेदनेनें आरडती फार, उड्डाणेंही थोर मारीताती.
ऐसे नानापरी वनीं चमत्कार, नेत्रां सुख थोर देताती हे.

**सीता.**— (पाहून म्हणते) खरेंच प्राणनाथ, ह्या तिनिशवृक्षांच्या[2] झाडींत मत्तमधुमक्षिकांनीं मोठीं मोठीं मधीचीं पोवळीं घातलीं आहेत तीं पहा कशीं लोंबत आहेत। तेथें वानरांचा इलाज चालत नाहीं. कारण त्यावरील माशा त्यांना डसतात.

**राम.**— खरें आहे.

**सीता.**— जो कोणी केवळ अर्थसंचयपर असतो, त्याच्या त्या अर्थाचा उपभोग समयविशेषीं दुसराच कोणी घेतो, आणि त्याला फुकट आयास मात्र पुरतात. येथेंच पहा! ह्या मधुमक्षिका मोठ्या यत्नानें पोवळ्यांत मध आणून सांठवितात, आणि कोणी एक कुशल मनुष्य येऊन तो तेथील मध काढून तिचा स्वाद आपण घेतो, असी गोष्ट आहे.

**राम.**—( मनांत म्हणतो ) हें भाषण ही कांहीं परमार्थ बुद्धीनें करीत नाहीं. तर मला उद्देशून करिते. असो ( मोठ्यानें म्हणतो ) एकानें संचय केलेल्या वस्तूचा उपभोग दुसऱ्याला जा घडतो तो भाग्यवशें करून घडतो, उगीच घडत नाहीं। पहापहा!

### श्लोक.

सुधेला करी तुच्छ ऐशा मधूतें, त्वदोष्ठीं मनोजात[3] ठेवी, तयातें
धरोनी पितों मी, प्रिये, नित्य, पाहीं सुभाग्याविना लाभ हा होत नाहीं.

**सीता.**—प्राणनाथ आतां मर्यादा सोडून भाषण करूं लागले. ( असें म्हणून लज्जेनें खालीं मुख करून बसते ).

---

टीप.—१ हस्तीण. २ तिवसांचीं झाडें. ३ मदन.

**रामः—** ( स्वगतं ) इदानीमनेन मे वचनेन रमणीयमेषा लज्जते,

उत्पुलकगंडमूलमुद्भिन्नप्रणयपिशुननयनांतं

नमयति न परमियं निजमाननकमलं, मनोऽपि मम, १६

तदन्यद्दर्शयामि. ( प्र० ) पश्य, जानकि,

त्वद्रूपमधूपसेकविमलोऽप्येष स्वयं केसरी,

भव्यान्येवमभिव्यनक्ति कुसुमान्यर्हाणि धर्तुं तव,

एषां दिक्षु विदिक्षु च प्रवहता गंधेन पुष्पंधयाः

श्रेणीभूय विडंबयंति, दयिते, वेणीलतां तावकीम्. १७

**सीता—** ( स्व० ) जेहे जह सिविणएसु संकप्पवसासु अज्जउत्तो चाडुवअणादिहिं वावरेहिं मं अणुप्पउत्तो आसि, तह दाणिं पच्चक्खं अणुहवइत्ति अच्चरिअं अच्चरिअं । ( प्र० ) अज्जउत्त, किं ण पेक्खसि घम्मदिअहावसाणविअंभमाणणवंबुदसामलकोमल- छवीहिं णिरंदरोल्लसिदेहिं गुच्छेहिं अलंकिदो एसो अदसी रुक्खो इमं पवेसं अलंकरदि.

**रामः—** ( स्व० ) निपुणमेतस्या वयमुक्तिप्रत्युक्तिकया विडंबिताः स्मः. ( प्र० ) अपि, वनदर्शनकुतूहलिनि, जानकि,

**राम.**—(मनांतह्मणतो) मी हिला बोलिलों त्यामुळें लज्जा उत्पन्न होऊन जी हिची मुद्रा झाली आहे, ती फारच खुबीदार दिसते. कारण,

**आर्या.**

रोमांच उभे गालीं, स्द्रुत अनुराग दावि नयनांत,
नमवी न आत्ममुखची, परि नमवी ही मदीयही स्वांत[२].

तर आतां हिला दुसरें कांहीं दाखवावें. ( मोठ्यानें म्हणतो ) पहापहा **जानकी,**

**श्लोक.**

स्वांबुवें विपुल कुसुमें येति या केसराला,[३]
शोभायुक्त प्रकट तुजला योग्य जीं धारणाला;
त्यांसीं गंध्यें भ्रमरततिकों[४] येउनी लग्न होती,
वेणी जैसी तव, सखि, दिसे तीपरी[५] शोभताती.

**सीता.**—( मनांत म्हणते ) प्राणनाथ जसें कांहीं माझ्या स्वप्नांत आणि संकल्पदशेंत मधुर भाषणादिक करून माझें मनोधारण करीत असत, तसेच आतां प्रत्यक्षही करितात. हें मोठें आश्चर्य आहे! ( मोठ्यानें म्हणते ) अहो प्राणनाथ, आपण पाहत नाहीं काय ? हा ग्रीष्माच्या अंतीं वृद्धिंगत होणाऱ्या नवीन मेघाचेपरी श्यामवर्ण व विकासयुक्त व निबिड अशा गुच्छांनीं मंडित असा हा अतसी वृक्ष या वनप्रदेशाप्रत कसा अलंकृत करितो तें !

**राम.**—( मनांतह्मणतो ) अरे ! उक्तिप्रयुक्ती करून हिनें तर मला जिंकिलें आतां ! असो. ( मोठ्यानें म्हणतो ) हे वनदर्शनकौतुकशालिनि, **जानकी,**

---

टीप— १ कटाक्ष. २ चित्त. ३ बकुळवृक्षाला. ४ भ्रमरपंक्ति. ५ वेणीसारख्या.

नीलश्वेतपिशंगरक्तहरितच्छायावृता धातवो
दृश्यंतामिह सर्वतो गिरिनदीमुद्बुद्धमुग्धांबुजा,
यस्यां हंसकुलस्य केलिकलहादुद्भ्राम्यतः कूजितै-
र्बाढि, त्वन्मणिमेखलाकलकलो नन्वीषदन्वीयते.

**सीता**— ( सवैलक्ष्यं, स्व० ) जं पुढमं वणं पत्थिदेण अज्जउत्तेण पुणो पुणो याचिदेणवि मह अणुप्पआणं पडिसिद्धं, तए कुविदाए मए सम्भूभंगं अधिक्खिविअ अंतेउरं गंतुं संरंभमुहरमेहलं पउत्तं आसि. तं सुमराबेदिमं अज्जउत्तो. होदु ! एव्वं भणिस्सं. ( प्र० ) णाह, तुह भुअदंडं अस्सिदाए मए एदस्सिं अरण्णे भअं किंकिअम्भुदं पेक्खिदुं ण सक्कीअदि ? जेण रक्खसाणं सआसादो जणट्ठाणणिवासिणं इसीणं अभअं दिण्णं.

**रामः**— ( श्रुत्वा, दूरदत्तदृष्टिः )

व्याघ्राजिनधरः शूलव्यतिषक्तेभमस्तकः,
कोविदाराववीरार्भी कोयं विशति राक्षसः ? ॥१९॥

नैव लक्ष्मणो जानाति.

( ततः प्रविशति लक्ष्मणः )

### अभंग.

पहा झरे येथें कैसे वाहताती, पंकजें फुलती तया माजीं.
नील, श्वेत, रक्त, पिशंगादि वर्ण सभोंवतीं पूर्ण धातू त्याच्या,
ज्यांचे ठायीं हंसकुळें हीं मिळालीं, मांडूं जीं लागलीं क्रीडेसाठीं,
जेव्हां, सीते, तुला राग येतो मनीं मेखळेचे मणी वाजती तें.
तया नादापरी हंसांचे कलहीं ध्वनी होत पाहीं मनोहर.

**सीता.**— ( ओशाळी होऊन मनांत ह्मणते ) प्राणनाथ पहिल्यानेंच जेव्हां वनांत जावयास निघाले, त्या वेळीं मी आपल्या बरोबर येतें, मला घेऊन चलावें, असी मी पुनःपुनः प्रार्थना केली. तरी प्राणनाथांनीं ती ऐकिली नाहीं, माझा निषेधच केला. त्या समयीं मला राग येऊन त्या रागाच्या झपाट्यासरसी कपाळाला आठ्या घालून, बरें आहे तर नका नेऊं बरें असें बोलून झपाट्यानेंच मी अंतःपुरांत जाऊं लागलें, तेव्हां जो काय माझ्या मणिमेखलेचा शब्द झाला, त्या शब्दाचें स्मरण हे आतां प्राणनाथ देत आहेत. असो. ( मोठ्यानें म्हणते ) अहो प्राणनाथ, ज्या तुम्हीं राक्षसांपासून पीडा होऊं देणार नाहीं ह्मणून जनस्थानवासी ऋषींना अभय वचन दिलें, त्या तुमच्या भुजदंडांचा आश्रय मला आहे, त्यापेक्षां या अरण्यांतील अद्भुत व भयंकर असे चमत्कार पाहण्यास मला कांहीं भीति वाटत नाहीं.

**राम.**— ( हें सीतेचें वाक्य ऐकून दूर पाहतो आणि ह्मणतो ).

### अभंग.

कोण हा राक्षस व्याघ्राजीनधर, शूळ हातीं गजशीर ज्याला,
कोविदारवनीं प्रवेश करोनी, काय त्याचे मनीं कार्य असे ?
याला लक्ष्मणानें पाहिलें नाहीं.

( नंतर लक्ष्मण पडद्याबाहेर येतो. )

**लक्ष्मणः**— कोयं कोविदारवनं प्रविशति राक्षसः ? भवतु तमेनं निग्रहीष्यामि. ( इत्यायुधग्रहणं नाटयति. )

**सीता**— ( अन्यतो दृष्ट्वा ) अज्जउत्त, ण खु एसा कोविदाराडवी, किंदु कण्णिआरवणं, ण अ एसो रक्खसो, पेक्ख, दाढाकरालमुही तुंबीफलगुरुणो थणभारादो विसमुण्णदउम्मरणाहिअं जठरं उव्वहंती, दुद्दंसरूवा कावि रक्खसी पविसदि.

**रामः**— कं पश्यसि अत्र किं मयोक्तं ?

**सीता.**—( विलोक्य ) तुमं जेव्व पविससि ण खु रक्खसो.

**रामः**—( कथं राक्षस इति मां निर्दिशति उपहसतीव. ) दृष्ट्वा प्रकाशं साश्चर्यं ) पुनर्दर्शने मद्रूपो राक्षसः संवृत्तः !

**सीता.**—( दृष्ट्वा सविस्मयं ) एसा कण्णिआरवणं पविट्ठा रक्खसी मह आकिदी धारेदि, पेक्खदु अज्जउत्तो.

**रामः**—( दृष्ट्वा सविस्मयं ) किमेतया रूपग्रहणे प्रयोजनं ?

**सीता**— अवदरिअ गिरिसिंगादो पेक्खम्ह.

**रामः**— मामैवं. इहस्थितस्य जनस्य वस्तुजातं योजनमात्रेपि चाक्षुषं भवति,

लक्ष्मण.— अरे! या कोविदारवनांत हा कोण राक्षस प्रवेश करीत आहे बरें? याला आतां मारून टाकितों; काय चिंता आहे? ( असें म्हणून शस्त्र घेतो ).

सीता.— ( दुसरे कडेस पाहून म्ह० ) प्राणनाथ, हें कोविदारवन नव्हे, कर्णिकारवन आहे. आणि हा तेथें जात आहे, तो राक्षस नव्हे, तर कोणी एक राक्षसी आहे. तिचें रूप पहा कसें भयंकर आहे तें! तिच्या तोंडांतील दाढा काय विकराळ आहेत! स्तन तर भोंपळ्यासारिखे मोठाले, पोट नगाऱ्या प्रमाणें व बेंबी उखळा सारिखी, अशी हिची आकृति पाहूनच भीति वाटते बाई!

राम.— अगे प्रिये, मी सांगतों कोणीकडे आणि तूं पाहतेस कोणीकडे? कर्णिकारवनाची का मी गोष्ट सांगत आहे.

सीता— ( कोविदार वनाकडे पाहून ) अहो प्राणनाथ, तो राक्षस कोठला? तुह्मीच तर तेथें प्रवेश करीत आहां!

राम— ( मनांत ह्मणतो ) काय! ही तर मलाच राक्षस ह्मणते व उपहासही करिते! ( पाहून मोठ्यानें ह्मणतो ) अहो हें तर मोठें आश्चर्य होय! मी जो आतां पुनः त्याकडे पाहूं लागलों, तों त्यानें माझें रूप घेतलें खरेंच!

सीता— ( पाहून विस्मयानें ह्मणते ) अहो प्राणनाथ, इकडे या कर्णिकार वनांत जी राक्षसी गेली, तिनेही माझें रूप घेतलें! तें पहावें आपण!

राम— ( पाहून आश्चर्यानें ह्मणतो ) हिला तुझें रूप घेण्याचें काय बरें प्रयोजन?

सीता— या पर्वतशिखरावरून खालीं उतरून पाहूं बरें हें काय आहे तें.

राम— नको खालीं उतरणें. येथें बसलें ह्मणजे आसपास चार कोस पर्यंत काय होतें तें दिसतें.

लक्ष्म०—( पुनर्दृष्ट्वा सविस्मयं ) हंत हंत, निगृहीतुमागतस्य सायुध-स्यापि ममेह समागमो विफलः संवृत्तः. यदयं राक्षसः क्वचिन्निलीनः. यदार्य एव प्रतिश्रुतराक्षसवधो ऽस्यापि वधाय व्यापृत इव प्रतिभाति. तथा हि

करे धनुरदक्षिणे कलितहेमपट्टं वहन्,
परे कनकपुंखसंघटितकंकपत्रं शरं,
प्रसर्पति समर्पयन्नयमितस्ततो लोचने
निलीनवपुषं क्वचिन्निशिचरं विचिन्वन्निव. २०

( सविमर्शं ) क्व पुनरार्या जानकी? नन्वेताभ्यामधिरूढा गिरेरूर्ध्वभूमिरार्याभ्यां. एकएव कथमार्यो ऽवतीर्णः ? ( ऊर्ध्वमवलोक्य सविस्मयं. )

अधिवसति गिरिं रघित्यकायां बकुलतले नववारिदोपमश्रीः
कथमयमचिरद्युतिप्रभांग्या क्षितिसुतया सह भार्यया ऽयमार्यः २१

तदनेन मायाविना गृहीतार्यरूपेण भवितव्यम्. लतावलयनिरंतरेण तिरोहितोऽनुसरन्पश्यामि. ( इति परिक्रामति )

( ततः प्रविशति रामवेषधरो विराधः )

लक्ष्मण— ( पुनः पाहून विस्मयानें ह्मणतो ) अरेरे ! या राक्षसाला मारण्याकरितांच मुद्दाम मी शास्त्र घेऊन आलों, पण माझें येणें विफळ झालें ! कारण राक्षस तर, कोठें जाऊन लपून बसला ! आणि राक्षसवधाची प्रतिज्ञा दादांनीं केली आहे तर तेच त्याही राक्षसास मारण्याच्या उद्योगांत आहेत असें दिसतें. त्यांची पहा कशी तयारी आहे ती ?

## अभंग.

डाव्या हातामधें सोन्याच्या पाटल्यांचें, धनुष्य हें साचें शोभतसे.
उजव्या हातांत सुवर्णाचा पुंख[1], जया ऐसा देख शर आहे.
इकडे तिकडे पाहे निरखूनी, जाणों धुंडी वनीं निशाचरा.
( विचार करून ह्मणतो ) अहो, पण वहिनी कोठें आहे ? दादा व वहिनी दोघें हीं आतां पर्वताचे शिखरावर बसलीं होतीं, आणि तेथून एकटे दादाच कसे खालीं आले ? हें काय ब्वा ( वर पाहून विस्मयानें ह्मणतो. )

## श्लोक.

अभिनवजलवाहा[2] सारिखा श्यामवर्ण,
चपल विजुच जैसी जानकी हेहि पूर्ण,
गिरिवरि बकुळाच्या शीतला सावलींत,
बसुनि करिति गोष्टी प्रीति ज्यांच्या मनांत.

यावरून हे आपले दादा नव्हेत. त्यांचें रूप घेऊन हा कोणी राक्षस चालला आहे ! तर ह्या वेलजाळीचे आडून आडून त्याचे मागें जाऊन हा काय करितो तें पहावें. ( असें ह्मणून इकडे तिकडे फिरतो ).

(इतक्यांत रामाचा वेष धारण करून विराध पडद्याबाहेर येतो).

---

टीप.— १ पिसारा. २ नूतन मेघासारिखा.

**विराधः** — ( दृष्ट्वा ) कथं कर्णिकारवनाच्चंपकवाटिकामागच्छति जानकी । ( उपसृत्य पश्यति. ) ( ततः प्रविशति सीतारूपधारिणी शूर्पणखा )

**शूर्पणखा.** — अहं एत्थ जेव्व वणे चंपअकुसुमाइं अविच्चिणिस्सं. रहुकुमारो वि एत्थ एव्व आअमिस्सदि. (इति कुसुमावचयं नाटयति)

**विराधः** — ( दृष्ट्वा स्व० ) एषा निरतिशयरूपलावण्या जानकी । ( साश्चर्यं ) अपूर्वा खल्वियं वेधसो विरचना. अथवा

> ऊर्ध्वं नीरदवृंदमेवमिदं बिंबं त्वधो निर्मितं,
> व्योम्नः पल्वलचित्रितस्य निहितौ शैलावुपर्युन्नतौ,
> किं चाधः पुलिनोच्चयस्य कदलीकाण्डाववारोपितौ,
> तन्मन्ये चतुरस्य पुष्पधनुषः सर्गोऽयमन्यादृशः ।२२

तदेनां गृहीत्वा कथमपि गमिष्यामि, यावदिह नोपसर्पति रामो लक्ष्मणो वा.

**शूर्प०** — ( दृष्ट्वा ) कहं एसो मह हिअअचोरो इदो ज्जेव्व अहिवट्टइ, जो एसो.

**विराध.**—( पाहून ह्मणतो ) काय१ कर्णिकार वनांतून या चंपकवना प्रतच ही **जानकी** येत आहे कीं ? ( जवळ जाऊन पाहतो. ) नंतर सीतेचें रूप धारण करून **शूर्पणखा** पडद्या बाहेर येते ).

**शूर्पणखा**— मी येथेंच चंपकाचीं फुलें वेंचीत राहतें. **रघुकुमार** ही आतां इकडेस येईल. ( असें ह्मणून फुलें वेंचिते ).

**विराध.**—(तिला पाहून मनांत ह्मणतो) निरतिशयरूपलावण्यवती अशी ही **जानकी** येथें आहे ! ( आश्चर्य पावून ह्मणतो. ) अहो, ही ब्रह्मदेवाची अपूर्वच रचना होय ! अथवा ही त्याचीही रचना नव्हे, तर

**श्लोक.**

*खालीं चंद्र, वरी पयोद, गगनीं सद्वापिका शोभते,
आकाशावर दोन शैल रचिले अत्युन्नत स्पष्ट ते,
तैसें सैकत ऊर्ध्व, खालिं कदलीकांडें, अधोवक्त्र ही
कामें निर्मियली नवी सुचतुरें अन्यादृशी सृष्टि ही.

तर जंव **राम** अथवा **लक्ष्मण** यांतून कोणी येथें आला नाहीं तोंच हिला घेऊन कसें तरी निघून जावें.

**शूर्प०**—( **विराधास** पाहून ह्मणते) काय ! हा माझ्या हृदयाचा चोर इकडे तिकडे समोरच येत आहे कीं ! जो हा,

---

टीप—*चंद्र, पयोद ( मेघ ), गगन, वापिका, शैल, सैकत, कदली कांडें या उपमानवाचकशब्दांहीं तदुपमेयें जीं मुख, केश, मध्य, नाभी, स्तन, जघन, मांड्या, हीं अनुक्रमानें जाणावीं.

१ उफराटी ( खालीं चंद्र, वर मेघ, खालीं आकाश त्यावर दोन शैल इत्यादि वैपरीत्यास्तव विलक्षण सृष्टी ).

सुभअजुवसहस्ससिद्धिआदो, विहिकरकोसलगोअरो विधाओ,

अहअ सअललोअलोअणाणं गिह्दितणूरिव पुव्वपुण्णरासी. २३

ता उवाएण णं गेण्हिअ गमिस्सं. (इति पश्यंती पुष्पाण्यवचिनोति.)

विराधः— ( उपसृत्य ) अयि जनकनंदिनि,

यदि भवति तेऽभिलाषश्चंपककुसुमेषु, चंपकनिभांगि,

विनियोजय पुरतस्ते विहारहासं, श्रमेणालं. २४

शू०— ( सहर्षस्व० ) एसो मं जाणइ एव्व मण्णेदि. हद्धी, हद्धी !

कवलिअमिणालकंदलकलहंसरावीरमंसलसिणिद्धो.

सवणाइं मह सुहाहिं सिंचइ एदस्स कंठसुरो.२५

होदु. इमं णिस्संकं ओहरिदुं एव्व भणिस्सं. (प्र०) अज्जउत्त, इदो

वि एत्थविदूरे पदेसे पुप्फचावप्पदावविडंबीणि विअसिआइं चं-

पअकुसुमाइं. ता तएत्थ गदुअओ चिणम्ह. ( इति दूरे व्रजति)

वि०— ( स्व० )

अभंग.

इजारों हजार सुंदर तरूण करितां निर्माण ब्रह्मदेव,
कौशल्य त्याच्या हातां आलें फार, तेंव्हां हा किशोर केला वाटे.
किंवा सर्वजननेत्रांनीं मिळूनी, संपादिलें पुण्य बहु जन्मीं,
तेंची पुण्य आतां एकत्र मिळालें, रामरूपें आलें जगामाजी.
तर आतां कांहीं एक उपाय करून ह्याला धरून घेऊन जाईन.
( असें ह्मणून पाहत होत्साती फुलें वेंचिते ).

**विराध**—( तिच्या जवळ येऊन ह्मणतो ) हे **जनकनंदिनि**,

आर्या.

चंपकनिभांगि[1], पुष्पें, चंपकतरुचींच पाहिजेत तुला,
तरि मी विहारसेवक, कष्ट, पुरे, तूं नियोग[2] कर मजला.

**शूर्प**०—( हर्ष पावून मनांत ह्मणते. ) हा मला **जानकी**च ही असें मानितो ! अहाहा ! याचा शब्द तरी काय गोड आहे ?

आर्या.

कवलितमृणालकंदलकलहंसगभीरमांसलस्निग्ध[3],
मम कर्णा सुख देतो याचा हा स्वर, मनाहि करि विद्ध.

बरें असो याला निर्वेधपणानें गांठून धरून नेतां यावें, कोणापासून विघ्न होऊं नये ह्मणून आतां याला असें ह्मणतें (उघडपणें बोलते) अहो प्राणनाथ, येथल्यापेक्षांही येथून किंचित् दूर पुष्पचाप जो मदन त्याच्या प्रतापाचाही पराभव करणारीं असीं चंपकपुष्पें फुललीं आहेत तर तेथेंच जाऊन तीं खुडूं ! ( असें ह्मणून दूर जाते ).

**विराध.**—( मनांत ह्म० ).

---

टीप—१ चंपकपुष्पासारिखें अंग जिचें तिचें संबोधन. २ आज्ञा. ३ बिसतंतुखाणारा जो हंस त्याच्या स्वराप्रमाणें गंभीर पुष्ट व स्नेहयुक्त असा याचा स्वर.

सहजमणयार्द्रमार्यपुत्रेत्यमृतास्वादिवचो निशम्य तन्व्याः

कुसुमास्त्रकिरातवागुरायां निपतत्येणकिशोरवन्मनो मे. २६

भवतु. प्रदेशांतरगमनमस्या निःशंकमपहाराय भविष्यति. ( प्र० ) यथा रोचते कल्याण्यै. ( इत्यनुव्रजति )

**लक्ष्मण.**—कथमत्र चंपकवनाभ्यंतरे आर्या जानकी व्याहरति ? भवतु. पश्यामि.

( इति कतिचित्पदानि गत्वा ) कथमेतत् ?

नलिनीदलसंपुटं हरंती ननु हर्तुं कुसुमानि चंपकानां

वनमारुतकंपितांशुकांता व्रजति वने यथाश्रुतेयमार्या.२७

तन्नूनमनया कयाचिद्राक्षस्या भवितव्यं ( इति पश्यन्स्थितः )

**सीता.**— अज्जउत्त, पेक्ख पेक्ख, एसो मह देवरो अंसणिबद्धे तुद्दी, गहिअकोदंडो, करग्गकंपिदमंडलग्गो, इमं रक्खसं तुमंति जाणिअ अणुसरइ.

**राम.**— भद्रे, निगूढ एवायमनुसरति ततो नूनं राक्षस इति जानाति

**विरा०**— ( स्व० ) इयं किल मम पुरतः समुच्चलति जानकी.

## आर्या

हे प्राणनाथ ऐसा अमृतमधुर शब्द कानिं जंव पडतो,
मच्चित्तहरिणशिशु तंव कामाच्या वागुरेंत सांपडतो.

हें बरेंच आहे! येथून दुसरे ठिकाणीं गेलें असतां हिला निःशंकपणें धरून नेण्यास मलाही सोयवार पडेल! ( उघडपणें ह्म० ) ठीक आहे. तुज कल्याणीला जावेंसें वाटतें तर चाल तिकडे जाऊं. ( असें ह्मणून तिच्या मागें मागें चालतो. )

**लक्ष्मण**— काय! ह्या चंपकवनामध्यें आपली वहिनी बोलते कीं! असो काय आहे तें पाहतों.
( असें ह्मणून कित्येक पावलें जाऊन ह्मणतो ) अहो हें काय?

## साकी.

नलिनीदलसंपुटीं घालिले चंपकपुष्पा कैसी,
वायूनें वस्त्रांचल उडतो, दिसते आर्या जैसी!

यावरून ही आपली वहिनी नव्हे. कोणी तरी खचित राक्षसी आहे. ( असें ह्मणून पाहत उभा राहतो. )

**सीता.**—अहो प्राणनाथ, पाठीशीं भाता व एके हातांत धनुष्य आणि एके हातांत खड्ग असें घेऊन हे भाऊजी ह्या राक्षसाला तुह्मीच आहां असें समजून त्याच्या मागेंमागें जात आहेत कसे ते पहा!

**राम.**—अगे, तो लपून जात आहे यावरून राक्षसाला त्यानें खचित ओळखिलें असावें यांत संशय नाहीं.

**विराध**—( मनांत ह्म० ) ही जानकी माझ्या पुढें चालली आहे, अहाहा!

---

टीप—१ जाळ्यांत.

चरणकमलचंचन्नूपुरारावमुख्यैर्,

घनजघनगताया मेखलाया निनादैः

किमपि किमपि चित्तेकुर्वती मामिदानीं

परवशयति गाढं पक्ष्मलाक्षी किमन्यत्

(प्र० ) अयि सुंदरि, कियद्दूरमाक्रम्यते घनांतः ?

शू०— ( स्व० ) जेत्थे विजणे सक्कमए तुमं गेण्हिअ समुप्पविर्दु. (प्र०)

अज्जउत्त, पुरदो एव्व सीपदेसो, ता खणमेत्तं भरिसेदु.

रामः—कथं राक्षसी दूरतो राक्षसं नयतीव दृश्यते.

सीता.— ऊँरंखणोवि नदी एव्व गछदि.

वि०—( स्व० )

आलपति पिकवधूरिव, पश्यति हरिणीव, चलति हंसीव

स्फुरति तडिल्लतिकेव, स्वदते तुहिनांशुलेखेव. २९

तत्कथमेनां गृहीष्यामि. संगमा खलु दूरत एव रामासथात्.

( प्रकाशं )

अवचिनु विकचानि चंपकानामिह कुसुमानि मया सहाननांगि,

व्रजसि कियदिदं वने, यतोयं भवति निशाचरसंचरप्रदेशः. ३०

लक्ष्मणः— कथमेनां सीतेति जानन् राक्षसोयमार्यवेषेण ग्रहीतु मिच्छति.

## आर्या.

चरणीं नूपुर वाजे, घनजघनीं मेखळाहि शब्द करी,
चितो मनीं किमपि हि, परवश केली मदीयवृत्ति खरी

(उघडपणें ह्मणतो) अगे सुंदरि, किती तरी लांब जायाचें आहे?

**शूर्प०**—(मनांत ह्मणते) जेथें कोणी नसल्यामुळें तुला उचलून नेण्यास मला चांगलें साधेल तेथ पर्यंत जायाचें आहे. (मोठ्यानें ह्म०) अहो प्राणनाथ, तें ठिकाण अजून पुढेंच आहे, यास्तव क्षण मात्र क्षमा करावी.

**राम**.—काय! ही राक्षसी त्या राक्षसाला चालवीत चालवीत दूर नेत आहे असें वाटतें.

**सीता**.—भावजी त्यांच्या मागून तिकडेसच चालिले आहेत.

**विराध**.—(मनांत ह्म०).

## अभंग.

कोकिळेचेपरी आलाप करिते, नेत्रानें पाहते मृगी जैसी!
चालतसे जेवीं हंसी मनोहर, चकाकिते फार विजू जैसी,
आल्हादकारक जैसी चंद्रलेखा, तैसीच ही देखा राजबाळा.

तर ही कशी मला धरून न्यावयाला सांपडेल बरें! रामाच्या ठिकाणापासून तर बरीच दूर आली आहे. (मोठ्यानें ह्मणतो.)

## आर्या.

विकसितचंपककुसुमें खुब येथें मजसवेंचि, हे सुभगे,
येवुनि दूर वनीं ते उग्रनिशाचरसमूह फिरती गे.

**लक्ष्मण**—काय! ही सीताच आहे असें मानून हा राक्षस हिला रामवेषानें धरून नेण्यास पाहत आहे।

---

टीप—१ थोर कटीपूर्वभाग.

शू०— ( स्व० ) कीं[41] उण अहं ? णु णिसाचरी होम्हि. ( प्र० ) जं

तुम्हेहिं णिसाअराणं वहो पडिण्णादो, ता तुह पुरदो णत्थि मे भीः

ल० - कथमियंनिशाचरी जानकीव आर्येण सुसंगतं प्रलपति । कि-

फलमस्यारूपग्रहणे ! अथवा अभिरूपमार्यमनुरक्ता विप्रलभ्य विहरि-

ष्यति.

वि० — ( स्व० ) नखल्विदं मया प्रतिज्ञातं, किंतु अयि मुग्धे.

तस्य प्राणानिवादाय त्वां राघवपशोरहं

गमिष्यामि, प्रतिज्ञातं निधनं येन रक्षसां ३१

( प्रकाशं )

बत, का न्यूनता तत्र, वसुधागर्भसंभवे,

न हन्यां किं समं सैन्यैः खरं तमृपिकंटकं ! ३२

लक्ष्मणः — ( सस्मितं ) आर्यइवालपति राक्षसः !

शू० — ( सवेगं स्व. ) एसो[42] मह भादरं तह करिस्सदित्ति वेवइमे

हिअअं ( प्र० )

रावणादोविअहिअंबलवंतो खुररक्खसो

खरोतस्सपडिण्णादोतुएणिः संसअवहो. ३३

**शूर्प०**—( मनांत म्हणते ) अरे, मी तरी दुसरी कोण ? निशाचरीच आहें. ( उघडपणें म्हणते ) अहो प्राणनाथ, तुम्ही निशाचर वधाची प्रतिज्ञा केली आहे, त्यापेक्षां तुम्ही जवळ असतां मला येथें अगदीं भय वाटत नाहीं.

**लक्ष्मण**.—(वहिनी जसी दादाशीं तशी ही राक्षसी या राक्षसाशीं कसें संगतवार बोलत आहे पहा ! बरें हिला वहिनीचें रूप घेण्याचें तरी प्रयोजन काय ? अथवा दादाचें सुंदर रूप पाहून मोहित झाल्यामुळें त्यांना फसवून नेऊन त्यांशीं विहार करावा असें हिचे मनांत असेल.

**विराध**.—( मनांत म्हणतो ) राक्षसवधाची प्रतिज्ञा मी केली नाहीं. तर अगे सुंदरि.

### श्लोक.

प्रतिज्ञा करिता झाला जो मारायास राक्षसां,
तत्प्राणांचेपरि तुला नेतों मी हरुनी असा.

( मोठ्यानें म्हणतो ).

### आर्या

सांगें सत्वर, सुंदरि, जें कांहीं न्यून भासतें तुजला,
सेनेसह ऋषिकंटक **खर** माराया न शक्ति कीं मजला।

**लक्ष्मण**.—( किंचित् हांसून म्ह० ) हा राक्षस थेट आपल्या दादाप्रमाणेंच बोलतो।

**शूर्पणखा**—( दुःखाच्या आवेशानें मनांत म्ह० ) हा माझ्या भावाला मारून टाकील कीं काय ? याच्या भाषणानें माझें ह्रदय थरथर कांपतें. ( मोठ्यानें म्हणते. )

### श्लोक.

**रावणा**हूनि बलवान् आहे हा **खर** राक्षस,
मारीन त्या असा केला पण आपण तामस.

**लक्ष्म०**— परमार्थबुभुत्सयार्यस्य त्वद्वयं पृच्छति, सत्यमिदं राक्षसस्येव.

**सीता.**—[४३]एदे परोप्परमालवंताविव दिसंति.

**रामः**— अथकिं ?

**विरा०**— ( स्व० ) यन्मया राघवः प्रष्टव्यस्तदेव मां पृच्छति. भवत्वेवं वक्ष्यामि. (प्रकाशं) किं न जानासि जामदग्न्यविजयिनो विक्रमं.?

**लक्ष्म०**— उपपन्नमिदं प्रतिवचनं.

**शू०**—(स्व०) [४४]अंदोएव्व तुए सह विहरंतीं वि मं ण कोवि णिअजणो णिग्गहीदुं पहोदित्ति मण्णे. ( प्र० ) जुज्जइ. ( इति पुष्पावचयं नाटयति )

**वि०**— ( स्व० ) अस्याः खलु.

> उत्तानितानतसरोजमुदस्तहस्तम्
>
> उन्नम्रितस्तनमृजूकृतमध्यभागं,
>
> विस्रंसिनीवि, वसुधानिहिताग्रपादं,
>
> चित्ते ममार्पितमिव स्थितमुत्पलाक्ष्याः २४

( प्र० ) अपि प्रेयसि, विरम विरम पुष्पापहरणसाहसात्, यत्नेन नितरां परिश्राम्यसि. ( सस्पृहं ) अथवा

**लक्ष्मण**.—हे वास्तविक आमचे दादाच आहेत असें समजून ही राक्षसी त्याचे मनांतील गोष्ट काढून घेत आहे, यावरून ही खरी-खुरी राक्षसीच आहे, यांत संशय नाहीं.

**सीता**.— हीं दोघें परस्पर बोलताहेत असें दिसतें!

**राम**.—होय बोलताहेत खरींच.

**विराध**—( मनांत ह्म० ) मी जें **रामा**ला पुसावें तेंच ही मला पुसत आहे. असो हिला असें सांगावें. ( मोठ्यानें ह्म० ( **जमदग्नि**-पुत्र जो **परशुराम** त्यालाही जिंकणारा जो मी त्या माझा परा-कम तुला ठाऊक नाहीं कीं काय ?

**लक्ष्मण**—ठीक, हें उत्तर तर बरोबर दिलें।

**शूर्पणखा**—( मनांत ह्मणते ) असें आहे ह्मणून तर तुजबरोबर क्री-डा करूं लागलें असतां स्वजनां पैकीं, कोणत्यानेंही मला शा-सन करवणार नाहीं असी माझ्या मनाची खातरी आहे. ( उघड ह्मणते) योग्य आहे. तो मला ठाऊकच आहे. असें ह्मणून फुलें खुडूं लागते ).

**विराध**—( मनांत ह्मणतो ) फुलें खुडतांना हिचें पहा कसें स्थित्यंत-र होतें तें।

## अभंग.

मुखपद्म वर केलें, हात दोन्ही लांबवीले,
स्तन झाले ऊर्ध्वमुख, मध्यभाग ऋजु देख
नीवी सरकाया पाहे, चौड्यावरी उभी राहे,
जाणो चित्र हीचें ऐसें, चित्ती वाटे काढीलें सें.

( मोठ्यानें ह्मणतो ) हे प्रिये, फुलें खुडण्याचा श्रम आतां पुरे कर पुरे कर. ( सस्पृह होऊन ह्मणतो. )अथवा,

पुनरपि तव भूयादेष पुष्पावचायः,
कलयसि नवलक्ष्मीं कामपि त्वं मुखेंदौ,
मृगमदरचितो यत्कुंकुमांके कपोले
श्रमजलकणिकाभिर्लुप्यते पत्रलेखः. ३४

शू०—(सलज्जस्मितं स्व०) एदस्स रहुकुमारस्स वअणं णिओजेई चिअ मं कीलिदुं. (प्र०) माणद, अहिअं परिस्समंतीए वि अहिलासो बलवंतो खु मह पुप्फावहरणे.

लक्ष्म०—

आर्यां सीतां विदन्नेवं राक्षसो वक्ति राक्षसीं
आर्यबुद्ध्यैतमप्येषा प्रतिवक्ति यथोचितं ३५

वि०—यद्येवं मयावचीयंते कुसुमानीति, कुसुमावचयं नाटयन् अयि विदेहराजतनये,

यत्नेन स्वयमानमय्य विटपं यान्यग्रहीषं प्रिये
धम्मिल्ले कुरु चंपकस्य कुसुमान्येतानि, शातोदरि,
मा विस्रंसय विभ्रमेण कबरीभारं, चकोरेक्षणे,
मा पुष्पाणि च निष्पतंतु परितो विस्रंसमानावितः ३६

शू०—(सहर्षानुरागं स्व०) एसो मणोरहवल्लहो जाणदि त्ति करिअ पडिसेअंतो विअ अब्भत्थेदि जहाहिलसिदं व्वावारं. कहं इमं गेण्हिअ गमिस्सं. (प्रकाशं) अज्जउत्त, इमस्स समुप्पण-





श्लोक.

पुनरपि खुड पुष्पें, जानकी शीघ्र आतां,
अभिनवमुखशोभा देतसे मोद चित्ता.
श्रमजल जव येतें कुंकुमारक्तगालीं[1]
पुसुनि मृगमदाची[2] जातसे पत्रवल्ली.

**शूर्पणखा**—(लाजून किंचित हांसते व आपणाशीं ह्मणते) **रघुकुमाराचें** हें भाषण जसें क्रीडा करण्याविषयीं मला जणुं आज्ञाच करितें. (उघडपणें ह्मणते) अहो प्राणनाथ, फुलें खुडतां खुडतां मी दमलें खरीच. परंतु त्याविषयीं माझी हौस अझून पुरत नाहीं.

**लक्ष्मण**—

श्लोक.

राक्षसीला राक्षस हा बोले **सीताचि** जाणुनी.
तीही दे उत्तरा योग्या ह्याला **रामचि** मानुनी.

**विराध**—असें आहे तर मीही फुलें खुडूं लागतों. असें ह्मणून फुलें खुडतो व ह्मणतो. अगे **विदेहराजतनये,**

श्लोक.

यत्नें ओढुनि डाहळी खुडियलीं म्या जीं फुलें गे बरीं,
घालीं तीं बुचड्यामधें लवकरी, ठेवूं नको, सुंदरी.
बुध्द्या तूं झटकूं नकोंचि कबरीभारा अतां, हे प्रिये,
तैसीं हीं कुसुमें कधीं न पतना पावोत, कांते, स्वयें.

**शूर्पणखा**—(हर्षित व अनुरक्त होऊन मनांत ह्मणते.) हा माझा मनोरथवल्लभ मला जानकी मानून प्रतिषेधपूर्वक अभीष्ट व्यापाराविषयीं जसी प्रार्थनाच करीत आहे. तर याला केव्हां व कशी घेऊन जाईन कोणजाणें. (उघडपणें ह्मणते) अहो प्राणनाथ, हा

---

टीप—१ केशरानें तांबडे झालेल्या गालावर. २ कस्तूरीची.

दस्स चंपअतरुणो अग्गसाहावलंबिआइँ सउमाराइं कुसुमाइं मह

चरमंगं आरुहिअ गिण्हादु भवं, जेसु मे अहिलासो.

**लक्ष्म०**— आर्य इति मत्वा राक्षसी एनं ग्रहीतुमिच्छति.

**वि०**— ( स्व० ) अयम् ममावकाशलाभः ( प्रकाशं )

> चरमांगं समारुह्य, चारुचंद्रमुखि; त्वया
>
> चंपकान्यवचेयानि, चंचलाक्षिन्ययेप्सितं. १७

( इति गात्रं न्यंचति. )

**लक्ष्मणः** आर्येति मत्वा राक्षसश्चैनां हर्तुमिच्छति. अहो, महदिदं कौतुकस्थानं, तदुपर्यपि द्रक्ष्यामि.

**शू०**— ( स्व० ) होदु[४७]. को दोसो ? एदस्स चरमंगं आरुहिअ पादेहिं आवेढिअ एणं गेण्हिअ गगणमग्गेण गमिस्सं. ( इत्यारोहति )

**सीता**— अज्जउत्त, को एसो दूरदो उभअपस्सविलंबिदविथ्यिण्ण मेहराई पव्वदो व्व आअच्छदि ?

**रामः**— जानकि, संपातिमग्रजमभिवाद्य तातजटायुः समापतति.

**सीता**—इदो[४९] पेक्ख, पेक्ख, एसा रक्खसी इमं रक्खसं आरुहिअ चिट्ठइ ।

**रामः**— ( साश्चर्यं ) कथमेतत् ? अयि जानकि, पश्य पश्य.

उंच चंपकवृक्ष दिसतो. याचे शेंड्यावर चांगलीं सुकुमार फुलें आहेत, तीं मला पाहिजेत, पण त्यांना हात पोंचत नाहीं, म्हणून माझ्या पाठीवर उभें राहून आपणच मला काढून द्याल तर बरें होईल.

**लक्ष्मण.—** हे आमचे दादाच आहेत असें मानून ही राक्षसी याला धरावयास पाहत आहे !

**विराध —** ( मनांत ह्मणतो ) होय होय ! बरेंच झालें ! ही मला चांगली संधी मिळाली !

( उघडपणें म्हणतो. )

## श्लोक.

माझ्याच पाठीवरि तूं उभी राहुनियां कसी,
चंपकाचीं फुलें तोडीं, पाहिजेत तुला तसीं.

( असें म्हणून ओणवा होतो. )

**लक्ष्मण—**ही जानकी वहिनीच आहे असें ह्मणून हा राक्षसही हिला उडवायास पाहत आहे. वाहवा ! हा तर मोठाच चमत्कार आहे ! तर पुढेंही पाहूंया काय होतें तें !

**शूर्पणखा.—** (मनांत ह्म०) होईना यांत काय गेलें ? याच्या पाठीवर चढून याला पायांचे आढींत कवटाळून धरून घेऊन जावें ह्मणजे झालें. ( असें ह्मणून विराधाच्या पाठीवर चढते ).

**सीता—**अहो प्राणप्रिय, ज्याच्या दोन्ही बाजूंस मेघपंक्ति लोंबत आहेत असा एकाद्या पर्वताप्रमाणें हा कोण बरें उडत येत आहे ?

**राम.—** अगे जानकि, ज्येष्ठ बंधु संपाती यांचें पादवंदन करून हा तात जटायु आकाशपंथें येत आहे.

**सीता—** अहो प्राणनाथ, प्राणनाथ, लौकर इकडे पाहा ! ही राक्षसी या राक्षसाच्या पाठीवर चढून कसी उभी राहिली आहे ती !

**राम—**( आश्चर्य पावून ह्म०) पहा पहा जानकी, हें कसें झालें तें!

मद्रूपो रजनीचरोयमहह त्वद्रूपिणीं राक्षसीं
बिभ्राणश्चरमांगके दिवि जवादुच्चैः समुज्जृंभते;
एषोपि त्वरमाणपक्षपवनव्याधूतजीमूतया
गत्या तातजटायुरस्य पुरतो रुन्धन्निवासीदति ।

**सीता**—(विहस्य) अच्चरिअं अच्चरिअं ! इदो कहं पहविस्सदित्ति ण जाणिअदि.

**लक्ष्मणः**—. कथं जानकीरूपां राक्षसीमार्यरूपधरो राक्षसोगृहीत्वा समुत्पतत एव ! (ऊर्ध्वमवलोक्य) तातजटायुः सन्निपतति किंच कथमेनं ब्रवीति.

**जटायुः**—. कस्त्वं रामस्य रूपेण गृहीत्वा तां प्रधावसि ?

तिष्ठ, तिष्ठ पुरस्तान्मे. जीवितं दुर्लभं तवेति. ३९

**लक्ष्मणः**—. सत्यमेतत्. तात एनां राक्षसीं परमार्थतः सीतां मन्यते.

**सीता**. — एदे इमं जडाउं दट्ठूण सङ्क्सेण झत्ति गगणादो भूदले जेव णिपडिदा होंति.

**रामः**—. वत्सलक्ष्मणोप्येतयोरग्रे करविधुतखड्गः समुत्सर्पति.

**शू०**—(सविषादस्व०) अण्णो जेव्व एसो रहुकुमाररूवेण मं मोहेदि. अण्णहा कहं ईरिसस्स इरिसो उप्पदणवेगो भवे ? (प्र०) को तुमं मं गेण्हिअ उप्पदिदो ?

**वि०**—(स्व०) कथमसौ सीतापहारस्य जरठः श्यैनहतकः प्रत्यूहः संवृत्तः अथवा नेयं सीता, अन्यथा कथमनया समुत्पतितुमिच्छन्महसावेष्ट्य.

श्लोक.

मद्रूपी रजनीचर प्रकट हा, त्वद्रूपिणी राक्षसी,
जीतें पृष्ठतळीं धरोनि गगनीं मारी उडी हा कसी।
हा येतो इकडे स्वपक्षजनितें वातें घना सोदकी
सारोनी परतें, जटायु जणु हा रोधी तयां कामुकां.

**सीता**.—( गदगद हांसून ह्मणते ) हें काय बाई आश्चर्य तरी! आ-
तां या जटायु मामांजीच्या पुढें यांचें कसें होईल तें कोण जाणे?

**लक्ष्मण**— काय हो हें? सीतारूप राक्षसीला रामरूपी राक्षस हा
घेऊन उडून गेला कीं रे? ( वरतीं पाहून ह्मणतो ) अरे! तात
जटायु हा यांना आडवा होऊन त्यांशीं बोलतही आहे?

( पडद्यापलीकडे जटायु बोलतो. )

श्लोक.

कोण तूं रामरूपानें घेवोनी पळसी हिला.
उभा उभा, पुढें माझ्या दुर्लभ प्राण हे तुला.

**लक्ष्मण**— खरेंच! तात जटायु हिला वास्तविक सीताच आहे
असें समजतो.

**सीता**— तात जटायूला पाहून हीं दोघें भयानें आकाशांतून परत
खालीं येऊन पडलीं!

**राम** — वत्स लक्ष्मणही खड्ग परजितच त्यांच्या जवळ चालला!

**शूर्पण**०—( विषाद पावून आपल्या मनांत ह्मणते ) हा बाई रघु-
कुमार नव्हे, तर त्याचें रूप घेऊन दुसराच कोणी मला मोह
घालीत आहे। वास्तविक रघुकुमार असता तर त्याच्यानें अशा
वेगानें मला घेऊन उडवलें नसतें. ( मोठ्यानें ह्मणते ) कोणरे
तूं मला घेऊन उडालास?

**विराध** —( जटायूविषयीं मनांत ह्मणतो ) हा बेटा दुष्ट पक्षी पहा
कसा मध्येंच विघ्न आला तो? नाहीं तर मी या सीतेला निर्वेध

टीप.—१ पाण्यानें भरलेला अशा.

मानपादयुगलया गगनतलं जवेन नीतास्यां ? ( प्र० ) का त्वं मां गृहीत्वा पादाभ्यामुत्पतसि ?

**लक्ष्मणः**— ( उपसृत्य ) उभावपि युवां राक्षसो राक्षसी च परस्परं वंचितौ स्थः !

**शू०**— ( सानुस्मरणं ) कैहं तुमं विराहो ?

**वि०**— ( विचिन्त्य ) कथं त्वं शूर्पणखा ?

**लक्ष्मणः**— दुरात्मन्परदारचोर, विराध, गृहीतोसि.

( इति विराधं हस्ते गृण्हाति. )

**विरा०**— ( सरोषं ) मुंच मुंच. ( इति हस्तमाछिद्य स्वेन रूपेण शूलं भ्रामयति. )

**शू०**—(स्वेन रूपेण प्रविश्य सवेगं ) अंहो पमादो, एसो विराहो एकदो लक्खणेन अवरदो गिध्धराएण अहिजुत्तो दीसइ। (प्रविश्य जटायुः)

**जटायुः**—(स्व०) नन्वेषा शूर्पणखा, या जानकीरूपमवलंब्य स्थिता. ( प्र० ) वत्स लक्ष्मण, नमुंचैनं ऋषिकंटकं विराधं.

**सीता**— कहं एसो रक्खसी रक्खसो अ पच्चासण्णणिअरूवो भोदि। वत्सलक्खणोहिं तादजडाइं अहिजुत्तो।

घेऊन चालिलों होतों. अरे पण ही सीताच खचित असेल असें वाटत नाहीं. कारण हिला घेऊन मी उडी मारणार तों हिनेंच मला पायांचे आडींत धरून ही माझ्यासुद्धां आकाशांत उडून गेली. तेव्हां ही शक्ति खऱ्या सीतेची नव्हे. ( उघडपणें ह्मणतो ) कोण गे तूं मला पायांच्या आडींत धरून उडालीस ?

**लक्ष्मण.**—( जवळ जाऊन म्ह० ) अरे, तुम्ही दोघेंही राक्षस आहां आणि तुम्हीच एकमेकांचे हातून फसलीं गेलां ?

**शूर्प०**—(पूर्वीचें स्मरण करून म्हणते ) काय ! तूं विराध कीं ?

**विराध.**—( विचार करून ह्म० ) अगे तूं शूर्पणखा कीं काय ?

**लक्ष्मण.**— अरे दुरात्म्या, परदारचोरा विराधा, धरिलें तुला कोठें जातोस आतां ?

( असें ह्मणून विराधास हातानें धरितो ).

**विराध.**—( क्रोधानें म्ह०) हांहां सोड सोड. (असें म्हणून हात हिसकून आपलें राक्षसरूप प्रकट करून शूळ उगारितो ).

**शूर्प०**—( आपलें राक्षसरूप घेऊन येते आणि दुःखाच्या आवेशानें म्हणते ) हायहाय ! घात झाला कीं ! या विराधाला एकीकडून लक्ष्मणानें व दुसरेकडून गृध्रराजानें घेरून युद्ध आरंभिलें ! आतां कसें करावें !

**जटायु.**—( पर्वत्या बाहेर येतो व मनांत म्हणतो ) अरे, जिनें जानकीचें रूप घेतलें होतें ती एकून शूर्पणखाच होय बरें ! ( मोठ्यानें म्हणतो ) वत्सा लक्ष्मणा, या दुष्टा विराधाला कदापि सोडूंनको. हा ऋषींना केवळ कंटकाप्रमाणें पीडा देणारा आहे.

**सीता.**— काय ! ह्या राक्षसानें व राक्षसीनें आपलें स्वकीय राक्षसरूप धारण केलें आतां ! लक्ष्मण भाऊजी व जटायु मामंजी या उभयतांनीं त्यांस रोधून युद्ध मांडिलें आहे !

रामः—देवि, दिष्ट्या वर्द्धामहे।

> द्वैधीकृत्य यदस्य हस्ततुलितं शूलं शितेनेषुणा,
> खड्गेनोज्वलकांतिना कठिनयोश्छित्वा भुजावंसयोः;
> किंचैनं विनिपात्य कुंजरमिव क्वाप्येष गर्तांतरे
> सौमित्रिः पिदधाति पादपलतामूर्त्पिबलोष्ठोपलैः. ४०

सीता.— पिअं णो पिअं णो।

शू०—(सशोकावेगं) हाँ विराह, खरस्स मे भादुणो पिअसह, खरवअणे ण रहुकुमारवहत्थं आअदोवि तुमं मिएण विअ सद्दूलो मारिदोसिलक्खणेण. मएवि दसग्गीवेण णिजुत्ताए ण जाणई ओहरिदा, एसोवि रहुकुमारो अहिलसिदोवि जाणईरूवं वहंतीए चोरिअ कीलाए हेमऊवसिहरं ण पाविदो, किंदु केवलं तुह णिहणं दठ्ठूणं बाहासारेहिं अंताणि सिंचंतीए दुज्जंतहिअआए रोअणं जेव्वसरणं करीअदि. (इतिरोदिति).

जटायुः— वत्सलक्ष्मण, श्रुतमेतस्या वचनं? वत्स रामचंद्रमति क्रमितुमित एवागतो हत एष विराधः

लक्ष्मणः— एषा आर्या जानकीमुपहर्त्तुं दशग्रीवेण महिता मया विरूपयितव्या (इति गृण्हाति)

**राम** — हे देवी, दैवानें आपलाच उदयकाळ आहे. ह्या वत्सा **लक्ष्मणानें**

### श्लोक.

केला शूळ दुखंड उग्रकरिचा अत्यंत तीक्ष्णें शरें,
स्कंधापासुनि तोडिलें भुजयुग दीर्घा सुखड्गें त्वरें,
त्याला मारुनि पाडिलें करिपरी[1], मृत्पिंड[2] काष्ठादिकीं,
गर्तेमाजि पुरून टाकित असे, पाहा, अगे **जान**की.

**सीता.**— फार चांगलें झालें. फार चांगलें झालें !

**शूर्प०**— (शोकाच्या आवेशानें म्हणते.) अरे **विराधा** ! माझा बंधु जो **खर**, त्याचा तूं प्रियसखा असून त्याच्या वचनावरून तूं **रघुकुमारा**च्या वधार्थ आलास कीं! पण सिंहाला हरिणानें मारावें त्या प्रमाणें **लक्ष्मणा**नेंच तुला मारिलें. हाय हाय ! ही कसी विपरीत गोष्ट झाली ! **दशग्रीवा**च्या आज्ञेप्रमाणें माझ्या हातून **जान**कीचेंही हरण झालें नाहीं ! ह्या **रघुकु**माराविषयीं सकाम झालें म्हणून **जान**कीचें रूप घेऊन चोरून क्रीडा करण्याकरितां त्याला **हेम**कूट शिखरावर नेणार होतें, तेंही घडलें नाहीं ! तर केवळ तुझें मरण पाहून बाष्पाचे योगानें आंतश्वास सिपीत दग्धत्हृदय होत्साती मला रुदन करणेंच प्राप्त झालें. दुसरा उपायच राहिला नाहीं ! आतां काय करूं रे ! (असें म्हणून रडूं लागते.)

**जटायु.**— वत्सा **लक्ष्मण**ा, ही काय बोलिली तें ऐकिलें ना ! वत्सा **रामचंद्रा**ला मारण्याकरितांच **विराध** येथें आला होता, त्याला त्वां मारिलें. ठीक झालें.

**लक्ष्मण.**— वहिनीचें हरण करण्याकरितां **रावणा**नें या **शूर्पणखे**स पाठविलें आहे, तर हिलाही विरूप करून टाकिलें पाहिजे. (असें म्हणून तिला हातांत धरितो.)

---

टीप— १ हत्तीप्रमाणें. २ ढेकळें.

**रामः**— पश्य, जानकि, पश्य,

> हृतश्रवणनासिका सपदि लक्ष्मणेनासिना
>
> विनद्य रुदती भृशं व्रजति राक्षसीयं दिवि,
>
> अमी रुधिरबिंदवो भुवि पतंति यस्याः स्तनात्
>
> नवांबुदकदंबकान्तिबिडम्बिन्द्रगोपा इव. ४१

तदवतरावो गिरितटादस्मादभिवादयितुमार्यै तातजाटयुषं, संभावयितुं विजयिनं वत्सं सौमित्रिं च.

**सीता.**— जैंह रोअइ अज्जउत्तस्स. ( इत्युभाववतरणं नाटयतः )

**लक्ष्मणः**— तातगृध्रराज, गिरितटादार्योयमार्यया सीतया सममवतरति. तदावामपि पर्णशालाद्वारमेव गच्छावः.

**जटायुः**— यथा रोचते वत्साय. ( इति परिक्रामतः )

**रामः**— अयि प्रेयसि,

> हस्तेन हस्तमवलंब्य निजेन मे त्वं
>
> निःशंकमेहि, भवत विषमः प्रदेशः,
>
> एतासु मा स्खल शिलासु, विलंघ्य निम्न-
>
> मायाहि, कंटकमवेक्ष्य पदं निधेहि. ४२

**सीता.**— अज्जउत्त तादजडाऊ वच्छलक्खणो अ पण्णसालादुवारं आअच्छंति.

**रामः**— मान्यत्रदृष्टिं निक्षिप.

**राम—** अगे जानकी, पहा पहा वत्सानें काय केलें तें !

**श्लोक.**

असीकरुनि कापिले श्रवण, नासिकाही तसी,
म्हणोनि गगनीं उडे करित रोदना फारसी ;
नवीन जलदांतुनी निबिड इंद्रगोपापरी[2]
कुचावरुनि वाहती क्षतजबिंदु[3] भूमीवरी.

असो आतां तात **जटायु** प्राप्त झाला आहे, त्याचें वंदन करण्या करितां व विजयी झालेला जो वत्स **सौमित्रि** याची संभावना करण्याकरितां ह्या पर्वतशिखरावरून खालीं जाऊं चला.

**सीता.—**ठीक आहे, जसी प्राणनाथाची मर्जी असेल तसें.

( असें बोलून दोघे उतरत आहो असें दाखवितात ).

**लक्ष्मण.—** तातगृध्रराज, वहिनीला बरोबर घेऊन हे दादा पर्वतावरून खालीं येत आहेत तर आपणही आतां पर्णशाळेचे दारीं जाऊं चला.

**जटायु—** बरें आहे वत्सा, तुझ्या मनांत आहे तर चला तिकडे जाऊं. ( असें म्हणून चालतात ).

**राम.—**अगे प्रिये,

**श्लोक.**

माझ्या हातास धरुनी चल सावकाश
निःशंक तूं जरि असे विषमप्रदेश
पाषाण येथ बहु, लंघुनि ये लवोनी,
कांट्यास पाहिं, मग ठेंवि पदा जपोनी.

**सीता—** अहो प्राणनाथ, जटायु मामंजी व लक्ष्मण भाऊजी हे दोघे पर्णशाळेच्या दाराकडेसच येत आहेत.

**राम—** अगे प्रिये, इकडे तिकडे पाहूं नको.

---

टीप.-१ खड्गंकरून. २ इंद्रगोपकिड्याप्रमाणें. ३ रक्तबिंदु.

पंथाः पंकिल एष तत्कुटिलमप्याक्राम मार्गांतरं,

जंघाभ्यां कियदुत्क्षिपाशुकमसावुल्लंघ्यते निर्झरः,

मौलिं न्यंचय, मा स्पृशंतु वदनं वानीरशाखा नताः,

सक्तं मोचय मातुलिंगविटपे, सीते, दुकूलांचलम्. ४३

**सीता.**— ( तथा कृत्वा राममनुसरति. )

**जटायुः**— एते खलु

गुर्वर्थी, सदयेन, वत्स, भवता लूनप्रसूनाः शनै-

र्वैदेहीकरपल्लवात्तकलशीधारांबुसंवर्द्धिताः,

पर्यंते रुचिरैर्विलासहरिणैः केलीमयूरैर्वृताः

प्रायः पर्णकुटीरनीवतरवः प्रीतिं प्रयच्छंति नः ४४

**रामः**— श्रांतासि शैलशिखरादवतीर्यमाणा

नन्वन्यथा प्रविदमाननपंकजं ते

घर्मोदबिंदुकमनीयकपोलमेति

साम्यं सुधाकणमुचा शशिमंडलेन. ४५

तदिह वनदीर्घिकापरिसरे मंजरीपुंजपरिष्कृतजालसहकारतरुप-

च्छायशीतले क्षणं स्थीयतां विश्रामाय.

**सीता.**— अज्जउत्त, सणिअं गच्छ, जं पत्तो तादो अ वडिपालइज्ज

दो आअमणं.

श्लोक.

पंथा *पंकिल हा ह्मणोनि कुठिले मार्गांतरानें¹ चला,
ओंचे खोंचि वरी, वर्लोहि जपुनी ह्या निर्झराच्य जला.
शीर्षा नम्र करीं, न वंजुललता लागोत त्याला अशा,
काढीं सत्वर मातुलिंगविटपा ज्या गुंतल्या गे दशा.

**सीता.**—(सांगितल्या प्रमाणें करून रामाच्याच मागेमागें चालते ).

**जटायु**—( लक्ष्मणास म्हणतो ).

श्लोक.

तूं ज्यांचीं खुडितोस रम्य सुमनें गुर्वर्थ अत्यादरें,
सीतेनें जलसेचनें प्रतिदिनीं जे वाढवीले बरे,
ज्यांच्या भोंवति हिंडती वनपशू क्रीडार्थ जे पाळिले,
ते हे पर्णकुटीसमीप दिसती, वत्सा, तरू चांगले.

**राम.**—(सीतेप्रत ह्मणतो ).

श्लोक.

दमलिस बहु सीते डोंगराहूनि येतां,
वदनकमल तूझें शोभतें फार आतां,
श्रमजल कणिका ह्या गालिं कीं शोभताती,
अमृतकण जसे कां चंद्रबिंबीं रहाती.

तर आतां येथें ही, पहा, सुंदर वापिका आहे. तिच्या भोंवतीं मोहरानें भरून निघालेल्या व शोभायमान अशा आम्रवृक्षांची दाट व शीतळ छाया आहे तर या छायेंत बसून क्षणभर विसावा घे.

**सीता.**— अहो प्राणनाथ. विसावा कशाला ? आतां हळूहळू चलावें-च थांबूं नये. कांकीं लक्ष्मण भाऊजी व जटायुमामंजी हे दोघे पर्णशाळेच्या दारीं येऊन आपली वाट पाहत बसले आहेत.

---

*पंकिल=चिखलानें भरलेला.       टीप.—१ अन्यमार्गानें.

**रामः—** तर्ह्यनेन पथा गंतव्यं. यत्र खलु

प्रवहति शीतलवृष्टिः, प्रमुषितकल्हारशीतलामोदः,

पवनः परितो विकिरन्मदकलकारंडवक्कणितं. ४६

( इति परिक्रम्यावलोक्य ) तात गृध्रराज, तत्रभवंतमेष दाशरथि-रभिवादयते.

**जटा०—** वत्स, चिरंजीव.

**सीता.—** अज्ज, णमो दे.

**जटा०—** वत्से, वीरप्रसवा भव.

**रामः—** ( लक्ष्मणमालिंग्य ) दिष्ट्या विजयिनं त्वां पश्यामि.

**लक्ष्मणः—** सर्वमस्य तातगृध्रराजस्य प्रभावात्.

**जटा०—** वत्सेन वत्सस्य विजयो दृष्ट एव.

**रामः—** शैलशिखरस्थिताभ्यामावाभ्यां सर्वो दृष्ट एव.

**सीता.—** किंदु तस्स रक्खसस्स, ताए रक्खसीए णाम ण मए जाणीअदि.

**जटा०—** जनस्थानचरो विराधो नाम,

चतुर्दशसहस्राणि राक्षसास्तत्पतिः खरः,

एकतस्तापसद्रोही, विराधोऽप्ययमेकतः. ४७

सा च खरस्यानुजा राक्षसी शूर्पणखा नाम.

राम.—बरें तर याच वाटेनें जावें. जेथें

### आर्या.

कमलवनांतुनि येतो वायू सौगंध्यशालि अतिशीत,
कारंडव[1] कलशब्दां करिती कैसे सुरम्य मदभरित.

( असें म्हणून चालतो व पाहून बोलतो ) तात गृध्रराज, हा **दशरथ**पुत्र आपणांस वंदन करितो.

**जटायु.**— वत्सा चिरकालपर्यंत यांच बरें ।

**सीता.**— मामंजी, मी पायां पडतें.

**जटायु.**—वत्से, वीरमाता होसील बरें ।

**राम.** — ( **लक्ष्मणा**ला आलिंगून म्हणतो ) वत्सा, दैव थोर कीं तूं विजयी होऊन आलास, आणि मला भेटलास.

**लक्ष्मण.**—हें सर्व तात गृध्रराज यांच्या प्रभावाचे योगानेंच घडलें, मी कांहीं केलें नाहीं.

**जटायु.**—वत्सा **रामचंद्रा**, वत्स **लक्ष्मणा**नें कसा पराक्रम केला, तो त्वां पाहिलाच असेल.

**राम.** — होय, आह्मी अभयतां पर्वतशिखरावर बसलों होतों, तेथून सर्व दृष्टीस पडलें.

**सीता.**— पण त्या राक्षसाचें व राक्षसीचें नांव काय तें मला ठाऊक नाहीं.

**जटायु.**—राक्षसाचें नांव **विराध**, तो या **जनस्थानां**त राहत असे.

### अभंग.

चवदा सहस्र राक्षसां सहित **खर** हा निश्चित एकीकडे,
आणि एकीकडे **विराध** एकला, ऋषी दोहीं भला सुविख्यात.

आणि राक्षसीचें नाव **शूर्पणखा**. ती **खरा**ची बहीण होय.

---

टीप.—१ पक्षिविशेष.

**रामः**— विराध एव किं वत्सेन हतः ? ( इति सस्नेहबहुमानं लक्ष्मणं पश्यति )

**लक्ष्मणः**— ( अवाङ्मुखस्तिष्ठति. )

**जटा०**— अथ किं.

**रामः**— अन्ये सर्वेऽपि वध्या ममैवांशा निर्धारिताः.

**जटा०** — शूर्पणखावैरूप्यदर्शनमुहूर्तमात्रादभिषेणयिष्यति, वत्स, भवन्तं खरः क्रोधेन.

**रामः**— ( सोत्साहं ) भवतु, का हानिः ?

**जटा०**—इच्छाम्यहमधुना कुंजवतो गिरेः शिखरमधिरुह्य विश्रमितुं.

**रामः**— यथा रोचते ताताय.

**जटा०**—इतः परमप्रमत्तेन भवितव्यं वत्सेन (इति जटायुर्निष्क्रांतः )

( नेपथ्ये )

भाभो शूर्पणखां विरूपितवलद्व्यापानभामुख्यकैः
कंदंतीमुपसांत्व्य भूमिपतिनामाध्मातकोपः खरः
योद्धुं प्रस्थित एव दाशरथिना योधैरशेषैः समं,
द्रक्ष्यामो रणमत्र खेचरकुले येषां ममेव स्पृहा. ४८

**लक्ष्मणः**— समरकुतूहलिनः स्वयंभुसंभवस्य वैणिकस्य मुनेरयमालापः, तत्सन्नद्धव्यमस्माभिः.

**रामः**— सन्नद्ध एवास्मि, यन्मया तातजटायुषः सन्निधौ ससैनिकस्य वधो ममांशो निर्णीतः. वत्स, तज्जानकीमानीय

**राम.**—एकून वत्सानें हा विराध मारिला तर ? ( असें ह्मणून प्रीतीनें व बहुमानानें लक्ष्मणाकडे पाहतो ).

**लक्ष्मण.**—( संकुचित होऊन खालचे मानेनें उभा राहतो ).

**जटा॰.**—होय वत्सानें विराधच मारिला.

**राम.**— तर मग बाकी राहिलेले सर्व राक्षस मारून टाकणें हा वांटा माझा होय.

**जटायु.** —वत्सा रामा, शूर्पणखेला विरूप केलेली पाहतांच क्रोधाविष्ट होऊन खर राक्षस हा तुजबरोबर युद्धार्थ येईल.

**राम.**—( उत्साहानें ह्मणतो ) येऊंद्या, काय चिंता आहे ?

**जटायु.**— मी तर आतां विश्रांति घेण्याकरितां कुंजवान् पर्वताचर जातों.

**राम.**—बरें आहे. जसी तातांची मरजी असेल तसें करावें.

**जटायु.**— वत्सा, इतःपर बहुत सावधगिरीनें रहा बरें. (असें ह्मणून निघून जातो ).

( इतक्यांत पडद्याच्या पलीकडे शब्द होतो. )

## श्लोक.

आली शूर्पणखा विरूपितमुखी, आक्रंदनाच्या भरें
लोळे भूमिवरी, सुसांत्वन तिचें केलें प्रयत्नें खरें,
क्रोधें घेउनि सर्व सैनिक अला रामाशिं युद्धार्थ हा,
ते पाहोत रणा अतां मजपरी ज्यांना असे हो स्पृहा.

**लक्ष्मण.**—युद्ध पाहण्याविषयीं परम उत्सुक व वीणावादनशील असा जो ब्रह्मपुत्र नारदमुनि, त्याचा हा शब्द होय ! तर आपणही सिद्धता केली पाहिजे.

**राम.**—माझी तर सिद्धताच आहे. ह्या समयीं दुसऱ्या कोणाचेंही मला साहाय्य नको. कारण, सर्व राक्षससैनिकांसुद्धां ह्या खराचा वध करणें हा माझाच वांटा राहिला असें तात जटायूचे

पर्णशालां प्रविशतु भवान्.

**सीता.**— अज्जउत्त, अप्पमादेण होदव्वं.

**रामः**— कः संदेहः ?

**लक्ष्मणः**— यथा रोचते भवते ( इति सीतया सह निष्क्रांतः )

( नेपथ्ये )

इक्ष्वाकुवंशप्रभवमृषिवेषं नृपात्मजं

सभार्यं सानुजं रुंध्वं सैनिकाः, शस्त्रपाणयः. ४९

**रामः**— ( सहर्षस्मितं ) कथं खर एव प्राप्तो व्याहरति. अरे रे दुरात्मन्राक्षसापसद, तिष्ठ तिष्ठ ( इति कवचमामुच्य शरचापे निषंगं च गृहीत्वा परिक्रम्य.

येषामस्थिचयश्चकास्ति धवलस्त्वद्भक्षितानां वने,

यैः क्षांतं भवतश्च दुर्विलसितं रक्षद्भिरुग्रं तपः,

वाहिन्या चतुरंगया सह, खर, त्वां दुर्विनीतं शरै-

र्भित्त्वा पक्षिगणान्धिनोमि समरे, तेषां करिष्ये मुदं. ५०

( इति निष्क्रांतः )

( इति पंचमोंकः ||५|| )

समक्ष ठरलेंच आहे. तर वत्सा लक्ष्मणा, तूं जानकीला घेऊन पर्णशाळेंत जावें. मी ही खरा बरोबर युद्ध करायास जातों.

**सीता.**—अहो प्राणनाथ, आतां फार सावधगिरीनें राहिलें पाहिजे बरें!

**राम.**— होय. यांत काय संशय ?

**लक्ष्मण.**—बरें आहे जसी दादांची मर्जी असेल तसें. ( असें ह्मणून सीतेसहवर्तमान निघून जातो).

( इतक्यांत पडद्यापलीकडे खर राक्षस बोलतो. )

**श्लोक.**

इक्ष्वाकुवंशप्रभवा, ऋषिवेषा, नृपात्मजा,
सशस्त्र होउनी रोधा सभार्या आणि सानुजा.

**राम.**— ( हर्षानें किंचित् हांसून ह्मणतो ) काय ! हा खर राक्षसच येऊन आपले सैनिकांस असी ही आज्ञा करीत आहे ! अरे दु- रात्म्या, राक्षसाधमा, उभा रहा उभा रहा. ( असें ह्मणून अंगांत कवच घालून पाठीशीं भाता बांधून व हातीं धनुष्यबाण घेऊन इकडेतिकडे फिरतो व ह्मणतो ).

**श्लोक.**

अस्थींचे चय शुभ्र, भक्षुनि जयां त्वां रे, खरें ढाकिलें,
ज्यांनीं पुण्यविनाशभीति धरुनी केली उपेक्षा बळें,
ऐसा उद्धत तूं भटांसह तुला मारूनि आजी शरें,
पक्ष्यां तृप्त करोनि, देइन पहा संतोष त्यांना [1] खरें.

( असें ह्मणून निघून जातो. )

**(पांचवा अंक समाप्त.)**

---

टीप.—१ त्या ऋषींना.

( ततः प्रविशत्यनला )

**अनला**—( पुरोवलोक्य ) कहं तावस्स अमच्चो इदो जेव्व आअ-
च्छदि !

( ततः प्रविशति संपातिः )

**संपातिः**—एषा स्वामिनः कुमारविभीषणस्य तनया अनला समाक-
च्छति. वत्सेऽनले, कुत आगम्यते भवत्या ?

# जानकीपरिणय नाटक.

## अंक. ६

### पात्रें.

अनला, राक्षसी. ........... बिभीषणाची कन्या.
संपाती. .............. बिभीषणाचा मंत्री.
रावण. .............. राक्षसांचा राजा
महापार्श्व. ........... रावणाचा नर्मसचिव.

### गर्भनाटक.

एक नाटककार.

सूत्रधार.
सीता. .............. रामाची स्त्री.
राम लक्ष्मण. .......... दशरथपुत्र.
हनूमान्, वानर. ........ सुग्रीवाचा मंत्री.
सुग्रीव. .............. वालीचा धाकटा भाऊ.
वाली. .............. किष्किंधेचा राजा, वानर.

---

(तदनंतर अनला पडद्याबाहेर येते.)

अनला—(पुढें पाहून ह्मणते) काय! हा आपल्या बाबांचा अमात्य संपाती इकडेच येत आहे कीं!

(तदनंतर संपाती पडद्याबाहेर येतो).

संपा०-अरे, ही स्वामी कुमार बिभीषणजीची कन्या अनला येते आहे! (अनलेप्रत ह्म०) वत्से अनले, तूं कोणीकडून आलीस?

**अन०**— विद्युज्जीहस्स घरादो.

**संपा०**— तत्र किमस्ति ते कार्यं ?

**अ०**— सुणादु अज्जअमच्चो. एत्थ खु सुप्पणहा णाम महाराअलंकेसुरस्स बहिणी—

**संपा०**— (विहस्य) पितृष्वसेति वक्तव्यम्. या खलु रामं कामयमाना विरूपिता लक्ष्मणेन, यस्याश्च गिरा प्रहितेन खरेण सानुचरेण शलभायितं रामभुजप्रतापहव्यवाहे.

**अ०**— सा विद्युज्जीहस्स पेअसिए मायावदीए सण्णिहाणे णासिअछेदकारणं पुछिदा कहंतरे रामस्स आकिदी ईरिसी तारिसेत्ति कहिदवदी.

**संपाति**— ततस्ततः ?

**अन०**— तदो अ विद्युज्जीहेण पुव्वं भणिदो आलिहिदरामरूओ चित्तवडो मह हत्थे णिक्खित्तो आसि.

**संपा०**— ततस्ततः ?

**अन०**— ताए मायावदीए पुच्छिदं रामस्स आकिदिदंसणत्थं पच्चअण देहि त्ति.

**सं०**— ततस्ततः ?

**अ०**— तदो अहं ताए मायावदीए चित्तपडपच्चप्पणं कदुअ आअदम्हि.

**संपा०**— किमर्थं तव हस्ते निक्षिप्तश्चित्रपटः ?

**अनला.**—**विद्युज्जिव्हाच्या** घराहून.

**संपाती.**—तेथें कशाकरितां गेली होतीस बरें ?

**अनला.**—आर्या अमात्या, तेथें कां गेलें होतें तें सांगतें ऐकावें. महाराज **लंके**श्वर यांची बहीण **शूर्पणखा** ह्मणून आहे.

**संपा॰**—( हांसून ह्मणतो ) अगे, इतका प्राणायाम कशाला ? तुझी तर ती आत्याच. मग आत्याबाई असें ह्मणेनास ? जी **रा**मा विषयीं आषक झाल्यावरून, जिचें नाक व कान **लक्ष्मणा**नें छेदिले, आणि जिच्या सांगण्यावरून **खर** राक्षस **रामा**वर चालून गेला असतां तो आपल्या सर्व सैन्यासुद्धां त्याच्या भुजप्रतापरूपी अग्नीमध्यें पतंगासारिखा नाश पावता झाला. तीच ती नव्हे का ?

**अन॰**—ती एके वेळीं, **विद्युज्जिव्हाची** स्त्री **मायावती** हिचे पाशीं बसली असतां, तुमचे नाक कान छेदण्याचें कारण काय झालें असें तिला विचारिलें. त्या प्रसंगीं बोलतां बोलतां, **रामाचें** स्वरूप असें आहे तसें आहे ह्मणून तिनें त्याचें पुष्कळ वर्णन करून सांगितलें.

**संपा॰**— मग ?

**अन॰**—मग **रामाची** तसबीर काढलेला चित्रपट, जो कांहीं दिवसां पूर्वीं **विद्युज्जिव्हानें** आणिला, तो मजपाशींच होता.

**संपा॰**— बरें पुढें ?

**अन॰**—तो चित्रपट **मायावतीनें रामाचें** स्वरूप कसें काय आहे तें पाहण्याकरितां मजपाशीं मागीतला.

**संपा॰**— मग ?

**अन॰**— ह्मणून तो मी आतां **मायावतीला** देऊन आलें.

**संपा॰**—तो चित्रपट तुजपाशीं असण्याचें काय बरें प्रयोजन ?

**अन०—** सो ँ चित्तवडो परिणआदो पुव्वं जाणईए लिहिदो, दाणि दीहविप्पओआए जाणईए समस्सासणत्थं मए आणिअत्तीए एत्तिअं कालं दंसिदो.

**संपा०—** ( विचिन्त्य ) आश्चर्यं । आश्चर्यं !

राज्ञा सीतापत्द्दतये मारीचो मारितो मृग,
गरुत्मतश्च भ्रातृव्यो जटायुर्गृध्रनायकः.

इतः परं कथं भविष्यति सीतायाः समाश्वासः १ तया खलु चिरपरिचयात् त्वयि बद्धः प्रियसखीस्नेहः.

**अ०—** अंदो एव्व खु जाणईए समस्सासणाविरहादो ण चिट्ठदि सरीरंत्ति भीदम्हि. ( संस्कृतमाश्रित्य )

बाष्पैर्विश्लथहारमौक्तिकनिभैः सीता स्तनौ सिंचति,
नेत्राब्जे मलिनोत्तरीयसिचयप्रान्तेन संमार्जति,
आलेख्यस्थितमात्मनः प्रियतमं निर्वर्णयंती मुहुः
सुप्तैवं किल शिंशपातरुतले मासाननैषीदसौ. २

**संपा०—** स्वामिना कुमारबिभीषणस्यान्येषां माल्यवत्प्रभृतीनामपि वालिप्रमापणानंतरं प्रसर्पणमेव सीतायाः शुभोदर्कमभिमतं.

अन०—असें होण्याच्या पूर्वी जानकीनेंच त्या पटावर ती रामाची तसबीर काढिली होती. त्या जानकीला आतां बहुत दिवस पर्यंत रामाचा विरह झाला आहे, तें तिचें दुःख कमी होऊन मनाला कांहीं सुख वाटून धीर यावा, याप्रमाणें तिच्या आश्वासनार्थ मी तिला तो इतके दिवस नेऊन दाखवीत असें.

संपा०—( विचार मनांत आणून आश्चर्यानें ह्मणतो ).

आर्या.

मारीच हरिणरूपी तेंवि जटायूहि पक्षिराज मरे.
हा सर्व रावणाचा सीतापाप्त्यर्थ निद्य उद्यम रे !

बरें तो चित्रपट तर त्वां देऊन टाकिला. आतां या उपर तिचें आश्वासन कसें होईल ? पण तिला तुझा सहवास आहे हें एक बरें आहे. कांकीं, तुझा तिचा परिचय होऊन बहुत दिवस झाले ह्मणून तुझ्यावर तिचें आपल्या अगदीं जिवलग सखी प्रमाणें प्रेम आहे.

अन०—याजकरितांच तिला कोणी आश्वासन न दिलें तर तिचें शरीर राहणार नाहीं असें मला भय वाटतें बाई !

श्लोक.

मुक्ताहार[1] तुटोनि जेंवि विखरे बाष्पें तशीं गाळिते;
नेत्राब्जां मलिनोत्तरीयवसनप्रांतें सदा पुशिते;
वारंवार विलोकिते निरखुनी प्राणेश चित्तांतला;
ऐसा काळ निजोनि शिंशपतळीं[2] तीनें बहू काढिला,

संपा०—स्वामी कुमार विभीषणजी आणि माल्यवान् वगैरे मंडळी यांचे मनांत रामानें वाली मारिला तेव्हांपासून जानकीला परत करावी यांतच कल्याण आहे, असा विचार आला आहे.

---

टीप.—१ मोत्यांची माळ. २शिसवाच्या मुळाशीं.

अ०— कहं महाराअलंकेसुरण्णिअसहो वाली रामेण मारिदो जेव्व. १

संपा०— अथ किं १

अ०— कहं मण्णइ महाराओ १

सं०— को वा मन्त्रिजनेषु महराजं द्रष्टुं क्षमः १ यदिदानीं

वातेन नंदनवनोपहृतैः प्रसूनैः

कृप्तास्तरो, वरुणदत्तमृणालहारः,

अश्रांतमर्पितमना जनकात्मजायां,

नांतःपुराद्बहिरुपैति निशाचरेंद्रः. ३

तदनवगतापसितप्रबलतरवीरवैरानुबंधमनुपक्रांतमंत्रविचारमननुष्ठितकर्तव्यमेनं वागुपन्यासेन वालिवधं बोधयितुमपारयद्भिरमात्यैरुशनसा रामकथां प्रस्तुत्य किमपि प्रेक्षणकं कारितं लंकेश्वरस्य दर्शयितव्यमिति.

अ०— किं ? आरंभिअ किंअप्पज्जंतं कारिदं कहेहि १

संपा०— रामस्य सीतान्वेषणमारभ्य वालिवधावधि.

अ०— तदो तदो १

**अन०**—महाराज लंकेश्वर यांचा प्रियसखा जो वाली तो रामानें मारिलाच काय?

**संपा०**—होय, मारिलाच तर काय?

**अन०**—मग आतां महाराजांचा काय विचार आहे?

**संपा०**—मंत्रिजनांत हल्लीं असा कोण समर्थ आहे, कीं जो महाराजांची भेट घेऊन दोन गोष्टी सांगेल? कारण महाराज तर

## श्लोक.

स्वर्गींचीं सुमनें अणोनि मृदुला शय्या मरुत्[1] कल्पितो,
कंठीं माळ मृणालवृंदघटिता[2] अंभःपती[3] घालितो,
वैदेहीस[4] मनीं निशाचरपती[5] चिंती अहोरात्र तो,
बाहेरी न निघे, निजोनि अपुल्या अंतःपुरीं राहतो.

आपल्यास शत्रु ह्मणजे केवढा प्रबळ उत्पन्न झाला आहे, याजविषयीं मसलत कोणती योजावी, आणि योग्य कर्तव्य तरीं कोणतें, याचा विचार तो कांहींच करीत नाहीं। सर्व कारभार पाहणें त्यानें सोडून दिलें आहे. आतां **रामानें वाली** मारिला, हें वर्तमान त्याला ठाऊक नाहीं, अमात्यांनीं कळवावें, तर त्यांस समक्ष सांगण्याचें धैर्य होत नाहीं. ह्मणून त्यांनीं **शुक्राचार्याकडून रामा**विषयीं एक चमत्कारिक नाटक त्याला दाखविण्याकरितां तयार करविलें आहे.

**अन०**— त्यांत कोठपासून कोठपर्यंत कथा बांधिली आहे?

**संपा०**—**राम** हा **सीतेचा** शोध करूं लागल्यापासून तो **वालीचा** वध करी तोंपर्यंत.

**अन०**—बरें मग त्याचें काय झालें?

---

टीप—१ वायु. २ बिसांच्या समुदायाची केलेली. ३ वरुण. ४ सीतेला. ५ रावण.

**संपा०**— तच्च निवेदितमंतःपुरचारिणा महाराजस्यासन्नपरिजनेन द्रष्टव्यमिति. तदवकर्णयता देवेन दिव्याप्सरोभिः प्रयुज्यमानस्य तस्य दर्शनाय संगीतशालाभ्यंतरं महापार्श्वमात्रनर्मसचिवानुगतेनाध्यास्यते.

**अन०**— तुएँ[३५] उण कहिं पत्थिदं. ?

**संपा०**— स्वामिना कुमारबिभीषणेन सर्वमन्त्रिजनसहितेन तदेव साप्सरोजनं शैलूषकुलं देवस्य सन्निधावानयेति प्रेषितोस्मि.

**अन०**— जेइ एव्वं, जाणई वि दाणिं संभाविअचित्तवट्टलिहिदपिअजणदंसणापिअजणभूमिआणं रूवणिज्ज कहादंसणेण मणोविणोदणं करोदु.

**सं०**— एवं भवतु. किंतु तिरस्करिणीप्रभावेण प्रच्छन्नया द्रष्टव्यं. तत्र कैवाभ्युपायः ?

**अन०**— अत्थि[३६] जेव तत्थ अब्भुवाओ.

**संपा०**— कीदृशः सः ?

**अन०**— मह[३७] हत्थे विदुज्जीहस्स घरिणीए मायावदीए रस्खसंधंकरणमणीघडिअं रअणकडअजुअलं णिक्खितं चिट्ठइ. तत्थ एक्कं जाणइए एक्कं मए वि हत्थे आमोच्चिअ तिरोहिदाहिं अम्हेहिं पक्खणिज्जं.

**संपा०**—जे कोणी अंतःपुरांत महाराजां जवळ नेहेमीं राहतात, त्यांनीं त्याविषयीं महाराजांच्या कानांवर घालून तें पाहण्याकरितां विनंती केली, ती महाराजांनीं कबूल केली. त्याप्रमाणें आज अप्सरा त्या नाटकाचा खेळ करून दाखविणार. तो पाहण्याकरितां महाराज संगीतशाळेंत जाऊन बसले आहेत. त्यांच्या बरोबर एक त्यांचा मसकऱ्या महापार्श्व मात्र आहे.

**अन०**—बरें तूं कोठें जातो आहेस ?

**संपा०**—स्वामी कुमार **बिभीषण**जी व दुसरी सर्व मंत्रिमंडळी, यांनीं अप्सरांसुद्धां सर्व नाटककारांचे मंडळीस, महाराज बसले आहेत तेथें घेऊन ये, ह्मणून मला पाठविलें आहे. यास्तव त्यांनां आणायास जातों।

**अन०**—असें आहे तर, **जानकी** नुसतें पतीचें चित्रच पाहून मनाला विरंगळा करिते, त्यापेक्षां आतां त्याचें सोंग घेऊन नाटकथालें त्यानें कसें काय केलें हें प्रत्यक्ष करून दाखविणार आहेत, तर तें दृष्टीस पडलें असतां तिच्या मनाला विशेष बरें वाटेल.

**संपा०**—बरें वाटेल तर ती पाहिना ? परंतु कोणाच्या दृष्टीस न पडे अशा रीतीनें गुप्त राहून पहावें ह्मणजे झालें. आतां कोणाचे दृष्टीस न पडण्याविषयीं बरीक कांहीं उपाय असला तर पहा.

**अन०**—होय आहे त्याविषयीं एक उपाय.

**संपा०**—तो कोणता बरें ?

**अन०**—**विद्यु**ज्जिव्हाची बायको **मायावती** हिनें राक्षसांधकरणमणिघटितकटकयुगुल ह्मणून एक कांकणांचा जोड मजपाशीं दिला आहे. तर त्यांतून एक कांकण **जानकी**च्या हातांत व एक मीही आपल्या हातांत घालून खेळ पाहायास बसूं ह्मणजे मग आह्मी कोणाच्या दृष्टीस पडणार नाहीं.

सां॰ श्रुतपूर्वमेवेदं मया कटकयुगलं. तत्कौशिकेन प्रथमं जानक्यै, ततश्च तत्परिजनपारितोषिकतया गृहीत्वा सारणेन राज्ञे दत्तं. तेनच तद्विद्युज्जिव्हवशे स्थापितं.

अन॰—अंदो तुमं वि सामिणिओ अं अणुण्णं करेहि. अहं वि तवस्सिणि जाणई मणोविणोदणत्थं संगीदसालं पावइस्सं. ( इति निष्क्रांतो )

( मिश्रविष्कंभकः )

( ततः प्रविशति महापार्श्वेन सह दशाननः )

दशाननः— महापार्श्व, कुतो मां प्रेक्षणकदर्शनार्थमनुबध्नंति मंत्रिजनाः ?

महा॰— जानकीनिमित्तमनंगतापेन दुर्मनायमानस्य देवस्य मनोविनोदाय.

दशा॰— तर्ह्यस्तु प्रस्तूयतां शैलूषैः.

( ततः प्रविशति शैलूषेष्वेकः )

जयति मनसिजः सुखैकहेतुर्
मिथुनकुलस्य, वियोगिनां कठोरः,
वपुषि यदिपुपातवारणार्थं
वहति वधू शशिखंडमंडनोपि. ४

दशा॰— सत्यमेवेदं.

( नाट्यते सूत्रधारः )

संपा०—अगे, तें कटकयुगुल माझेही कानावरून गेलें आहे. प्रथमतः तें कौशिकऋषीनें जानकीच्या हातांत घातलें, मग तें सारणानें मुनिवेषेंकरून तिजपासून बक्षीस ह्मणून घेऊन महाराजांस दिलें. शेवटीं महाराजांनीं तें विद्युज्जिव्हा जवळ ठेविलें, तेंच ना ?

अन०— होय तेंच. बरें तर आतां तूं आपल्या यजमानाची आज्ञा असेल तो कर. मीही बिचारे जानकीला करमणुकी करतां संगीत शाळेंत घेऊन जातें. ( असें बोलून दोघे निघून जातात. )

( ही पूर्वोत्तर कथेची संगति. )

( तदनंतर महापार्श्वासह रावण पडद्याबाहेर येतो. )

रावण.—अरे महापार्श्वा, नाटक पाहण्याविषयीं मंत्रिजन जे मला इतका आग्रह करितात, तो काय ह्मणून बरें ?

महा०—महाराज जानकी निमित्त कामसंतापानें पीडित होऊन आपली प्रकृति अगदीं बेताल होऊन गेली आहे, यास्तव मनाला कांहीं करमणूक व्हावी एवढ्या करितां ते आग्रह करितात.

रावण.—असें आहे काय ? बरें आहे तर. नाटककारांस सांगावें आतां आरंभ करावा ह्मणून.

( तदनंतर नाटककारांतून एकजण येतो आणि ह्मणतो ).

श्लोक. ( नांदी )

सुखाचा जो हेतू तरुण मिथुनांतें[1] त्रिभुवनीं,
वियोग्यांला[2] बाधा अतिशय करी जो निशिदिनीं,
जयाच्या भीतीनें शशिधर[3] निजांगीं धरि सती[4],
असा तो कंदर्प[5] प्रबल जय पावो त्रिजगतीं.

रावण.— ही गोष्ट बरोबर आहे । यांत कांहीं अंतर नाहीं ?

( असें मंगलाचरण झाल्यावर सूत्रधार येतो. )

---

टीप.—१ स्त्रीपुरुषांस २ वियुक्त स्त्रीपुरुषांना. ३ शिव. ४ पार्वतीला. ५ मदन.

**सूत्र०—**

कादंबिनीमपश्यन्गगनतले शोकशोषितशरीरः

शरदुपगमे शिखंडी, हंत, वनाभ्यंतरे चरति. ५

**दुशा०**–कथमपह्नुतां सीतामपश्यतः क्षत्रियबटोरिव सूच्यते व्यापारः।

**महा०—** अहमप्येवं मन्ये.

( नेपथ्ये. )

वत्सलक्ष्मण, सीतामन्विष्यता मया शून्यैव दृश्यते पर्णकुटी।

**सूत्र०—** दृश्यतामियं, महापार्श्व, लंकेश्वरेण लक्ष्मणभूमिभृता घृ-
ताच्या सह सीतान्वेषणपरस्य रामस्य भूमिकां गृण्हंती रंगतलं
प्रविशति पुंजिकस्थली। ( इति निष्क्रांतः )

( प्रस्तावना )

**दुशा०—** सम्यगुपक्रांतं मे क्षणकं यन्मया सीतामपश्यन् रामः किं क-
रोतीति जिज्ञास्यते.

( ततः प्रविशति कटकभूषितैकहस्ता सीता. )

**सीता.—** हला अणले, इमिणा रक्खसणाहेण अंतेउरवणंतरे णिरो-
हिआ, असरणा, दुव्वारसोआवेआ, अज्जउत्तपओअप्पेक्खणं पे-
क्खणअं अप्पिअ पेरिक्खद्व

**सूत्रधार**—

**साकी.**

शरदीं कादंबिनी[1] दिसेना ह्मणोनि कष्टी थोर,
शोक शुष्क होउनि हा कैसा फिरतो रानीं मोर.

**रावण.**— म्यां **सीतेला** हरून आणिल्यावर ती दृष्टीस पडेना ह्मणून तेव्हां जी त्या क्षत्रिय वटूची अवस्था झाली तीच त्यानें ही साकी गाऊन सुचविली असें वाटतें.

**महापार्श्व.**—होय महाराज, मलाही तसेंच वाटतें.

( पडद्याच्या आंत शब्द होतो. )

वत्सा **लक्ष्मणा**, सीतेच्या शोधार्थ आलों, पण पर्णशाळा शून्य दिसते। तिजमध्यें कोणी नाहीं !

**सूत्रधार.**—अहो **महापार्श्वजी**, महाराज **लंकेश्वर** ह्यांनीं आतां इकडे लक्ष्य द्यावें. **सीतेचा** शोध करणारा जो **राम** त्याचें सोंग घेऊन ही **पुंजिकस्थली** नामक अप्सरा, आणि तिच्या समागमें **लक्ष्मणाचें** सोंग घेऊन **घृताची** नामक अप्सरा, अशा दोघी जणी आतां ह्या रंगभूमीपत प्रवेश करीत आहेत. (असें ह्मणून निघून जातो.)

( ही प्रस्तावना झाली. )

**रावण.**—वाहवा ! खेळ तर फार चांगला लावला ! कांकीं, **सीता** दृष्टीस पडेनाशी झाल्यावर **रामानें** कसें काय केलें तें पाहण्याची मला उत्कंठाच होती.

( तदनंतर एकया हातांत कांकण घातलेली अशी **सीता** पडद्या बाहेर येते. )

**सीता.**— अगे **अनले**, ह्या राक्षसपतीनें मला मुळीं वनांत आणून बंदीस ठेविलें आहे. येथें मला कोणी त्राता नाहीं. अनिवार शोक होऊन मी व्याकुल होत आहे. त्यांत हा जो खेळ आरंभिला

---

टीप.—१ मेघमाला.

णपारेमि तहवि अज्जउत्त कहपओएति अत्थि मे कुदूहलं.

( प्रविश्यानला )

**अन०—** तां[20] इमस्स संगीदसालाब्भंदरे णिलीअ पेक्खम्ह.

**सीता.—** ( सभयं ) हला[21], एसो परदारचोरो महापादई रक्खसणाहो विदूरे दीसइ.

**अन०—** किं[22] तदो रक्खसंधकरणमणिघडिदकडकधारिणीहिं अम्हेहिं सक्कं एत्थ उववसिदुं ? विदूरदाए ण सुणीअदि अम्हाणं जप्पिदं, इमस्सवि अम्हेहिं.

**सीता.—** पुव्वं[23] आओज्जअवेसधारिओ रक्खसस्स परितोसिअं कडअजुअलं दाऊण दाणिं अत्तणो सुअं जेव्व उवकिदं आसि.

**अन०—** अच्चरिअं[24] अच्चरिअं ! महेसिणं माहप्पं ! जं मए अज्ज तुमं ण पेक्खिदआसि. केवलं अद्धाए विअ मए वि फंसमेत्तेण वरं पच्चक्खा होसि !

**सीता.—** तुमं[25] वि अण्णेण रक्खसजणेण ण सक्का पेक्खिदुं. जं तुह हत्थे एक्कं कडअं इमाणं आमोचिअं.

**अन०—** तुमं[26] वि त्ति भणिदव्वं, जं मए जेव्व अहं वि ण सक्का पेक्खिदुं !

**सी.—** [27]ऊसिआधारिणीणं अच्छराणं कहं होम्हि ?

आहे, तीही प्राणनाथाच्या वियोगाचाच. ह्मणून मला दुःखकारकच आहे. तो पहाणें मोठें कठीण, तथापि त्यांत प्राणनाथाची कथा आहे ह्मणून ती पाहाण्याची मला उत्कंठा वाटते इतकेंच.

**अन०**—(पडद्याच्या बाहेर येऊन) बरें तर ह्या लंकेश्वराच्या संगीतशाळेंत गुप्त बसून पाहूं.

**सीता.**—(भय पावून ह्मणते) अनले अनले, परस्त्रीला चोरून नेऊन महापातकी झालेला जो राक्षसपती, तो येथें पलीकडच्या बाजूस दिसतो बाई!

**अन०**—अः, दिसला ह्मणून काय झालें? राक्षसांधकरणमणिघटितकटकें आपण घातलीं आहेत, मग त्याचें कांहीं भय नाहीं. खुशाल येथें बसून खेळ पहा. अणखी तो येथून बराच दूर आहे, ह्मणून आपलें बोलणें ह्याला किंवा त्याचें बोलणें आपल्याला ऐकूं येईल हाही धाक बाळगण्याची गरज नाहीं.

**सीता. अयोध्यकमुनीचा** वेष घेणारा जो राक्षस, त्याला हें कटकयुगुल बक्षीस ह्मणून मीच मार्गे दिलें होतें, तें आज माझ्याच उपयोगीं पडलें! काय दैवाचें कौतुक तरी बाई?

**अन०**—केवढें आश्चर्य हें! महर्षीचें माहात्म्यच कांहीं विलक्षण होय! अगे पहा आतां मला देखील तूं दिसत नाहींस! केवळ अंधळ्या सारिखी जेव्हां चांपचतें, तेव्हां मात्र हाताला लागतेस!

**सीता.**—तूं स्वतःही ह्या इतर राक्षसमंडळीला दिसणार नाहींस कारण एक कांकण तुझ्याही हातांत आहे.

**अन०**—इतर राक्षसमंडळीस दिसणार नाहींस असें काय ह्मणतेस? तुला देखील तूं दिसणार नाहींस असें ह्मण. कांकीं मीच देखील मला दिसत नाहीं.

**सीता.**—बरें, पण या सोंगें घेऊन अप्सरा येतात, यांचें कसें? या तर आपल्याला पाहतील कीं नाहीं?

अन०— ऐंदाओ पेक्खइ. को दोसो ?

( ततः प्रविशति लक्ष्मणानुगतो रामः )

रामः— ( सावेगं )

शून्यां पर्णकुटीमवेक्ष्य हृदयं शोकेन मे दह्यते,

दशा०— ( सहर्षं ) दह्यतां, दह्यतां.

सीता०— ( सास्रं ) ईरिसो खु तस्स मयि सिणेहाणुबंधो ।

ता कहं अज्जउत्तेण पेक्खिदव्वं खमा मं विणा पण्णसाला ?

लक्ष्मणः— अलं शोकेन.

गच्छेदद्रिनिकुंजमार्य कुतुकादार्या मयूराकुलं.

दशा०— ( विहस्य ) एष न जानाति मया हृतामेनां.

सीता०— असंभाविदो एसो मयि अज्जे समस्सासणीयाओ व-
च्छलक्खणस्स.

रामः—

अस्मिन्वत्स, कदापि न व्रजति सा मामंतरेण प्रिया.

दशा०— कातर्यादप्येवं भवति, न तु प्रेमानुबंधादेव.

सीता०— जुज्जइ एदं, जं असण्णिहाणे अज्जउत्तस्स किंपि मे अ-
प्पिअं होदि.

अन॰— पाहिनात ? यांनीं पाहिलें तर काय चिंता आहे ?

( तदनंतर पुढें **राम** व त्याच्या मागें **लक्ष्मण** असे दोघे पडद्या बाहेर येतात. )

**राम**.—( दुःखाच्या आवेशानें ह्मणतो. )

**श्लोक**. ( प्रथम चरण ).

शून्या पर्णकुटी बघूनि हृदया शोकाग्नि जाळीत या,

**रावण**.—( हर्ष पावून ह्मणतो ) जळो जळो ! आणखी जळो, जळून राख रांगोळी होवो !

**सीता**.—( अश्रू आणून ह्मणते ) अगे, असा प्राणनाथाचा माझ्या ठिकाणीं स्नेहातिशयच आहे, मग मजविरहित जी **पर्णशाला** ती त्यांच्यानें कशी बरें पाहवेल.

**लक्ष्मण**.— अहो दादा, शोक पुरे करावा आतां.

**श्लोक**. ( द्वितीय चरण ह्मणतो ).

गेली कुंजगृहीं असेल बहुधा मोरांस देखावया,

**रावण**.—( खदखदां हांसून ह्मणतो ) मी तिचें हरण केलें हें त्या बेट्यास ठाऊकच नाहीं !

**सीता**.—**लक्ष्मण** भाऊजी हे प्राणनाथाच्या समाधानार्थ असें सांगतात, पण खरें ह्मटलें तर तसी गोष्ट व्हायाचीच नाहीं.

**राम**.—

**श्लोक**. (तृतीय चरण ह्म॰ ).

माझ्या वांचुनि तीं कधींच दयिता तेथें न जाई सती[1],

**रावण**.—एकटीला जावयास भय वाटत असेल ह्मणून जात नसेल. केवळ प्रेमामुळेंच जात नव्हती असें कशावरून ?

**सीता**.— ही बरीक गोष्ट खरी. कांकीं प्राणनाथ जवळ नसले ह्मणजे मला कांहींच गोड लागत नाहीं.

---

टीप—१ पतिव्रता.

लक्ष्मणः—

पुष्पेभ्यः किमु देवतार्चनकृते पुन्नागवाटीं गता. ६

रामः— तदन्विष्यतां वत्सेन.

लक्ष्मणः तथा. ( इति परिक्रामति )

दशा०— सेयमशोकवनिकां गता, न पुनः पुन्नागवाटीं,

सीता.— [32]तस्सिं द्दिणे इदं पुढमं जेव्व आसि. हला, अणले, तं अत्थं सुमरिअ परवसम्हि.

सोएण अज्जउत्तस्स पेक्खंतो दसकंधरं

पकंपिदम्हि साजस्सिं पवादे कदली विअ. ७

अन० [33]हला जाणइ, होदि सुक्खत्तिअसुदा तदो तस्सिं ओसरे धीरा आसि.

सीता०— [34]णहि णहि, किंदु अत्तिमहेसिपुरंधीआए अणुसूआए दिण्णस्स दिव्वस्स अंगराअस्स पहावादो.

अन०— [35]जुत्तं.

रामः— हा प्रिये जानकि, क्वासि ?

सीता.— ( सावेगं ) [36]तदा अज्जउत्तेण एव्वं अक्कंदिदं भवे.

रामः— हंत हंत !

जनकतनयामपश्यन्दर्शितकरुणस्वरस्तरलदृष्टिः,

शोकात्केलिशुकोयं पंजरगर्भे परिभ्रमति. ८

दशा०— संभावितमेतत्.

**लक्ष्मण—**

**श्लोक.** (चतुर्थ चरण ह्मणतो).

गुंफायास असेल तोडित फुलें पुन्नागवाटींत[1] ती.

**राम.**—वत्सा, तर तेथें जाऊन शोध कर बरें.

**लक्ष्मण.**—बरें आहे, करितों. ( असें ह्मणून इकडे तिकडे फिरतो.)

**रावण.**—ती तर अशोकवनांत आहे, पुन्नगवाटींत कुठली ?

**सीता.**—त्या दिवशीं प्रथमतःच ही दशा झाली. अगे, ती आठविली ह्मणजे मी अगदीं व्याकुळ होऊन जातें.

**श्लोक.**

पाहतां रावणा शोकें रामाच्या कांपलें तसी,
काननीं चंडवायूनें कांपते कदली जसी.

**अन०**—अगे जानकी, तूं उत्तम क्षत्रियाची कन्या ह्मणून त्या वेळीं तुझें धैर्य खचलें नाहीं.

**सीता.**—तसें कांहीं नाहीं. पण, अत्रिऋषीची पत्नी जी अनुसूया, तिनें एक दिव्य अंगराग अंगास लावण्या करितां दिला होता, त्याच्या प्रभावानें तादृश धैर्य सुटलें नाहीं.

**अन०**— मग ठीकच आहे.

**राम.**— हा प्रिये जानकी, कोठें आहेस गे !

**सीता.**—( दुःखाच्या आवेशानें ) हाय हाय त्या समयीं प्राणनाथानें असाच मोठा आक्रोश केला असेल.

**राम.**—अरेरे !

**अभंग.**

जनकतनया नदीसे ह्मणोनी, अती दीनवाणी ओरडतो हा.
पिंजऱ्यांत, फिरे पाहे टकमक, कैसा केलीशुक[2] शोका करी !

**रावण.**— असें झालें असेल.

---

टीप.-१ नागचांप्यांची वाडी. २ क्रीडेचा पोपट.

सीता.— ( सकरुणं हस्तेन हस्तं निष्पीड्य ) अणले, सो सुबुद्धिणामा केलीसुओ णूणं तस्सि ख्रण एव्व जीविदं परिच्चअइ.

अन०— अलं सोएण, एव्वंदेव्वदुव्विलसिदे किं कादव्वं ?

रामः— कष्टं भोः कष्टं !

> अयमिह गजशावः पर्णशालोपकंठे
> चरति मृगयमाणो जानकीं संभ्रमेण,
> दरहसितमुखी सा लोलहस्तांचलाय
> प्रदिशति किल यस्मै सल्लकीपल्लवानि. ९

दशान०— किमनेन ? जानक्याः संति सहस्रमेवंविधा मम गृहेषु, यदीयमभिलष्येत्.

सीता.— ( सानुकंपं ) पुत्त, आकारमेह, अहं एत्थ ( इत्यर्द्धोक्ते ) अणले, ण प्पेक्खणिज्जं खु एदं.

अन०— हला जाणइ, तुए सिणहाणुबंधेण सो गअसावो पच्चक्खे एव्व जाणीअदि.

रामः— विशत्युटजमभ्येति द्वारं पश्यति चासकृत्,
> विहारवर्ही वैदेहीं विचिन्वन्निव लक्ष्यते. १०

दशा— किमन्यदेष करोतु मया मुषितायामस्यां ?

सीता०— ( विचिंत्य ) हीं, चिसदसण, जहद्धणामहेअ, तस्सिं दिणे तुह भुभुक्खिदस्स पाणभोअणप्पदाणादो पुढमं जेव्व ओहरिदम्हि रक्खसेण. हद्धी, हद्धी !

सीता.—(करुणेनें हात चोळून ह्मणते) अनले, काय गे सांगूं? त्या सुबुद्धिनामक केलीशुकानें सर लक्ष्मणांचे प्राण सोडिला असेल यांत संशय नाहीं.

अन०.—अगे, शोक पुरे कर आतां. दैव प्रतिकूळ झालें ह्मणजे मग काय करावें? त्यापुढें, बाई कांहीं इलाज चालत नाहीं.

राम.—हरहर! काय दुःख हें? ह्या पर्णकुटीच्या समीपभागीं.

### श्लोक.

फिरतसे करिशावक[1] हा पहा करित मार्गण[2] जानकिचें अहा
हसत सल्लकिपल्लव[3] दे स्वयें क्षितिसुता[4] स्वकरें करिं ज्याचिये.

रावण.—ह्या एकाचीच काय कथा आहे? हिला पाहिजेच असले तर असले हत्तीचे छावे माझ्या घरीं हजारों हजार आहेत.

सीता.—( दयेनें ह्मणते ) अरे पुत्रा आकारमेघा, मी एथें-( असें अर्धेच वाक्य बोलून ) अनले, हें पाहवत नाहीं गे, काय करूं!

अन०.—अगे जानकी, स्नेहाच्या योगानें हा गजछावा तुला प्रत्यक्षच आहे असें भासतें कीं!

राम.—

### श्लोक.

उटजामाजि जाऊनी पुन्हा बाहेर येतसे
हा कीडामोर सीतेला शोधितो दिसतें असें.

रावण.—मी तिला एथें हरून आणिलें मग त्यानें दुसरें काय करावें?

सीता.—हे चित्रदर्शनामयूरा, हें तुझें नांव यथार्थ आहे बरें? त्या दिवसीं तुला भूक लागली होती तेव्हां तुला खाऊं पिऊं घालणार होतें तों इतक्यांत मला मेल्या राक्षसानें धरून आणिलें रे! हाय हाय!

---

व.प.—१ हत्तीचा छावा. २ शोध. ३ साळइवृक्षाचा पाला. ४ सीता.

अण्णासिंस बहुवारं मं गअगम्भं तुमं अप्पेक्खंतो
णूणं किदो खुहाए सो वियुदमुहो विददपादजुओ ११

( इति मूर्छति )

**अन॰—** ( साशंकं हस्ताभ्यां परिमृज्य ) मूर्छितेयं। हला[43] समस्ससिहि-
समस्ससिहि.

**सीता—** ( समाश्वस्य ) हला[43] अणले, एत्तिअं सव्वं सोअरस्स संरह
विहिणा.

**राम:—** ( सानुस्मरणं )

स्नानार्द्राः करयोर्युगेन चिकुराः संशोषणार्थं मुहु
र्धूयंते कुचकुंभनुन्नसिचयं यावत्तरुण्या तथा,
तावत्ताण्डववर्त्यं वलयितोदंचत्कलापोच्चयं
केकागर्भितकंधरं च कुतुकात्केलीमयूरोऽतिके. ११

**दशा॰—** स्थाने खल्वेतत् पदिवमस्याः

निर्वर्ण्यवेणिकां तन्व्यानीलां कादंबिनीमिव
मनो मम घनोत्कंठं मयूर इव नृत्यति. १२

**सीता॰—** [44] अणले, एव्वं सुमरिदो अज्जउत्तेण इमस्स चित्तदंसणस्स
तारिसो विलासो. ( इत्यश्रूणि मुंचति )

**राम:—** हा सुकेशि, प्रेयसि. ( इति मोहमुपागत: )

श्लोक.

जई यास बाधा क्षुधा देऊं लागे न देखे जरी गेहगर्भी मला गे,
पडे पाय ताणून तें चोंच वासी बहूवार त्याची दशा झालि ऐसी.

( असें ह्मणून मूर्छित होते )

अन०—( शंकित होऊन तिला हाताने चांचपते आणि ह्मणते )
अगे हाय हाय । ही मूर्छित झाली कीं । अगे जानकी, सावध हो, सावध हो ।

सीता.—( सावध होऊन ह्मणते, ) अगे अनले, हें सर्व शोकाच्या भरामुळें होतें बरें !

राम.—( मागील स्मरण करून ह्म० )

श्लोक.

न्हावोनी झटकी कचां करयुगें जों वाळवाया बरी
वस्त्रा रोंचिति आंतुनी कुच अहो जे स्थूळ कुंभापरी,
तें पाहोनि मयूर ऊर्ध्व करुनी पिच्छा निजा सुंदरा
केकारूप करीत शब्द जवळी नाचे बहू साजरा.

रावण.—हें यथार्थ आहे. कांकीं ही हिची

श्लोक.

कादंबिनीपरी नील वेणी पाहूनियां बरी,
नाचतें मनही माझें आनंदे मोर ज्यापरी.

सीता.—अगे अनले, प्राणनाथानें त्या चित्रदर्शन मयूराचा तसा तो विलास आठविला बरें ! दैवा, कायरे हें केलें ! ( असें ह्मणून अश्रू ढाळिते. )

राम.— हा प्रिये, तुझे केश तरी किती सुंदर गे ! दैवा, काय करूं आतां ! ( असें ह्मणून मूर्छित होतो ).

**दशा०**— सहर्षौत्सुक्यं.) भवत्वस्यायमनवकाशो मोहः, यदेषा जानकी नैराश्यादेतस्मिन्नारोक्ष्यति मे शयनं.

**सीता.**— [४५]अणले, अत्तणो कारणादो एव्वं अज्जउत्तो आसि कहं उण ईरिसी संवुत्ता वज्जहिअआ संपदम्हि.

**अन०**— हलो[४६] जाणइ, तुमं वि एदस्स कारणादो खणे खणे मोहण्णवे णिमज्जिअ कहं वि उम्मज्जसि ता कहं वज्जहिअआ होसि?

**लक्ष्मणः**— ( उपसृत्य ) आर्य, समाश्वसिहि, समाश्वसिहि.

**दशा०**— कथं जीवयत्ययमाश्वासनेन इमं लक्ष्मणहतकः।

**सीता०**— दि[४७]ट्ठिआ एव्व आसासिदो लक्खणेण.

**रामः**— ( समाश्वस्य ) पुन्नागवाटिकायां वत्सेन दृष्टा किं जानकी?

**लक्ष्मणः**— ( स्व० ) कथं कथयाम्येतदार्याय? अथवा भवत्वेवं ( प्र० ) आर्य, श्रूयतां

आर्या सा विचिता विदेहतनया पुन्नागवन्यां मया,
माकंदद्रुमवाटिका च विशदां भृंगालिझंकारिणीं,
एतां चोन्मदचक्रवाकचरणन्यासांकितां, सैकतभासेन स्फुटपुंडरीकमुकुलस्मेरां गिरेरापगां. १२

**रामः**— ( सोद्वेगं ) कथं न दृष्टा जानकी? ( दीर्घं निःश्वस्य )

**रावण**— ( हर्षित व उत्सुक होऊन ह्मणतो ) त्यासही व्यर्थ शोक होऊं द्या, तसें झालें ह्मणजे त्याच्या विषयीं **जानकी** निराश होऊन अस्मादिकांच्या बिछान्यावर येईल.

**सीता**— अगे **अनले**. प्राणनाथाची अशी अवस्था झाली ती मज करितां, आणि मी, पहा, कशी वज्रहृदया होऊन बसलें आहें ती !

**अनला**— अगे **जानकी**, तूंही त्याच्याकरितां शोकानें क्षणोक्षणीं मोहार्णवांत बुडतेस ती मोठ्या कष्टानें वरती येतेस. मग वज्रहृदया ती कशी गे ?

**लक्ष्मण**— ( **रामा**च्या जवळ जाऊन ह्मणतो ) दादा, सावध व्हा, सावध व्हा.

**रावण**— काय ! हा दुरात्मा **लक्ष्मण** याला धीर देऊन सावध करितो काय ?

**सीता**— दैव थोर ह्मणून **लक्ष्मण**भाऊजींच्या उपायानें प्राणनाथ सावध झाले !

**राम**— ( सावध होऊन ह्मणतो ) वत्सा, पुन्नागवाटिकेंत त्वां **जानकी** पाहिली काय रे ?

**लक्ष्मण**— ( मनांत ह्मणतो ) आतां, सांपडली नाहीं ह्मणून दादांना कसें सांगूं ? अथवा सांगावेंच झालें. ( मोठ्यानें ह्मणतो ) दादा, काय सांगूं ?

## श्लोक.

पुन्नागवाटीमधिं शोधिलें तिला, माकंदवाटींतहि माग पाहिला,
जेथें अलिश्रेणि[1] बहूत सुंदरा झंकारशब्दा करिती मनोहरा,
गिर्यापगेचें[2] तट शोधिलें तसें, जें कोकपादक्रम[3] लांछिलें असे,
जी आपगा[4] युक्त सुपुंडरीकीं, तेथेंहि ती नाढळली मला कीं.

**राम**— ( उद्विग्न होऊन ह्मणतो ) काय ! **जानकी** दृष्टीस पडली नाहींना ? ( लांब उसासा टाकून ).

---

टीप— १ भ्रमरपंक्ति. २ गिरिनदी. ३ चक्रवाकपक्ष्यांचे पाय वरच्यानें चिन्हित झालेलें. ४. नदी.

ज्वलतु त्वदि शोकवन्हिर्दहतु ततो मे सबंधनं त्वदयं,

न च दृश्यासि क्वचिदपि, हा दयिते, किं करिष्यामि ११४

दशा॰— यदुचितमुत्तमस्त्रीवियोगस्य, यच्च प्रियं लंकेश्वरस्य.

सीता — हंली अणले, एव्वं तस्स मं अप्पेरखंतस्स वसापरिणामो,

मह वि णाहस्स असंपिणह्वाणे रखसेण णीदाए ईरिसो त्ति, दुवेणं

अम्हाणं भागधेअं ईरिसं संपण्णं ( इति मुह्यति )

अन॰— ४१ समस्ससमिहि, समस्ससमिहि. तुमं खु अइरेण कालेण तिहु-

वणेक्कवीरेण तेण रहुकुमारेण संगदा भविस्ससि.

सीता॰— ( समाश्वस्य ) अणले, ओसिअं कालं सो मह णाहो

जीवइ ण वेत्ति संसओ.

अन॰— हली, सव्वो वुत्तंतो पेक्खणए जाणीअदि.

लक्ष्म॰— आर्य, धैर्यमवलंब्यतां दृश्यतां शेषोप्यय वमोद्देशः.

राम:— ( पुरोवलोक्य )

पुष्पैर्वृष्टिमिवाकिरन्सुरभिलैर्मंदानिलल्लसितै,

वैदेह्या मम चैव माळवकुलो विस्रंभसाक्षी तरु,

## अभंग.

अगे प्राणप्रिये, कोठें न दिससी, आतां करूं कैसी वर्तणूक.
शोकवन्हि चित्तीं प्रदीप्त होऊनी, याकीतो जाळोनी ऱ्हदयास.

**रावण**-- वर्तणूक कशी करूं ह्मणून काय विचारितोस ? उत्तम स्त्रीचा वियोग झाला असतां जी उचित, व लंकेश्वराला जी प्रिय, तीच कर, दुसरें काय ? आतां शोकानें मर म्हणजे झालें.

**सीता**-- अगे **अनले**, मी प्राणनाथाच्या दृष्टीस पडेनासी झालें, त्यामुळें त्याची असी अवस्था झाली, आणि तो जवळ नसतां राक्षसानें मला धरून आणिलें त्यामुळें माझीही असी अवस्था झाली। याप्रमाणें आम्हां दोघांचाही दैवयोग असा एकसारिखाच आलागे। काय करूं आतां ?

( असें म्हणून मूर्छित होते ).

**अनला**-- सावध हो **जानकी** सावध हो. त्रिभुवनामध्येंही ज्याला उपमा नाहीं, असा **रघुकुमार**, त्याची भेट तुला थोड्याच दिवसांनीं होईल बरें.

**सीता**-- अगे **अनले**, इतके दिवस माझा प्राणनाथ जिवंत आहे कीं नाहीं याविषयीं देखील मला संशयच आहे.

**अनला**-- अगे, तें सर्व आतां या खेळावरून समजेलच.

**लक्ष्मण**-- दादा, धैर्य धरा, धैर्य धरा. इतक्यानें काय झालें आहे ? वनाचा अणखी प्रदेश पहायाचा राहिला आहे, तो आधीं पाहूं.

**राम**-- ( पुढें पाहून म्हणतो ).

## आर्या.

वातें गळति सुगंधी पुष्पें, जीं त्यांस वर्षतो जणु हा
बालबकुल तरु अमुचा, अकृत्रिमप्रेममुख्यसाक्षि[1], पहा.

टीप-- १ निष्कपट स्नेहाचा मुख्य साक्षी.

**दशा०**— अतः किं ?

**सीता०**— ऍदं पुव्ववुत्तंतणिवेदयिचअं मह भत्तुणो वअणं.

**रामः**—

सौहार्दादुपसृत्य सांप्रतमिदं पृच्छामि, सीता त्वया

दृष्टा किं क गता ? किमाह ? कथयेत्येषोपि मे वक्ष्यति. १५

**दशा०**— (सकोपं) रे रे, पादपापसद, यदि तां ब्रूयाश्छिद्यामो भवंतं चंद्रहासेन.

**महापार्श्वः**— (स्व०)

जानक्यां राघवः स्नेहादुन्मत्त इव लक्ष्यते,

असावपि दशग्रीवस्तस्यामेव मनोरथात्. १६

(प्र०) राजन्नचेतनः खल्वयं तरुः. प्रेक्षणीयं चेदं.

**दशा०**— तथा गृहीतं मया मंदबुद्धिना.

**सीता०**— ऍव्वं अज्जउत्तेण उम्मत्तेण विअ एसो अचेतणो रुक्खो पुच्छिदो ! अज्जुद्ध मयि सिणेहो अअवरुद्धा इत्ति.

**रामः**— (सास्रं) नकथयत्ययमगणितप्रणयः भवतु किमनेन.

क्षितिधर, कथय त्वं जानकी सा प्रयाता ?

यदि कथयसि न, त्वां चूर्णयिष्यामि बाणैः

त्वयि विफलितवेगो दीर्घकालादसर्वी

किरतु दिशि भवंतं केवलं गंडवातः. १७

**रावण**—बरें, साक्षी असला म्हणून तो काय करणार ?

**सीता**—सखे **अनले**, याच्या छायेस आम्ही पूर्वी विहार करीत असूं, त्या वृत्तांताचें सूचक हें माझ्या भर्त्याचें वचन आहे.

**राम**—

**आर्या.**

स्नेहें जवळी जाउनि पुसतों मी जानकीकथा यास,
सत्यचि वदेल, शंका नाहीं धरणार हा कथायास.

**रावण**— अरे दुष्टा वृक्षा, खबरदार ! जर कां तूं तिचें वर्तमान सांगीतलें, तर या खड्गानें तुला तोडून टाकीन संभाळ !

**महापार्श्व**— ( मनांत म्हणतो ).

**आर्या**

सीतेच्या स्नेहास्तव रामाला वेड लागलें जैसें,
तीच्याच कामलोभें दशाननालाहि लागलें तैसें.

( मोठ्यानें म्हणतो ) महाराज, हें काय बोलतां ? वृक्ष हे अचेतन असतात, आणि हा नाटकाचा खेळ चालला आहे.

**रावण**- अरे, मी काय बेकूब कीं हें खरेंच आहे असें मानून बोललों!

**सीता**- याप्रमाणें प्राणनाथानें वेड्यासारखें या अचेतन वृक्षासही पुशिलें. हा अपराध, माझ्याविषयीं जो याचा स्नेह, त्याचा बरें !

**राम**- ( अश्रू आणून म्हणतो ) अरे हा कांहींच बोलत नाहीं यावरून हा स्नेहाला गणीत नाहीं असें झालें! हरहर ! बरें न सांगो हा!

**श्लोक.**

क्षितिधर[1], वद, कोठें जानकी आज गेली,
न वदसि तरि बाणें मृत्तिका[2] जाण केली;
उडविल मग तूतें चंडवायू दिगंतीं,
अडविसि म्हणुनी जो होतसे फार खंती.

टीप- १ हे पर्वता. २ बाणानें तुझी मातीच केली असें जाण.

दृशा०—

कथयिष्यति वैदेहीं कथमेष धराधरः

वज्रकल्पं तलाघातं मम जानन्नपि स्वयं ॥ १८

राम:— कथमसौ न चलति. भवतु गिरिदरीनदीं पृच्छामि.

उत्संगं भवती गिरेरधिवसत्यद्यापि नन्वापगे,

किं त्वं दृष्टवती तथा मम वधूमुत्संगवासप्रियां,

उन्निद्रांबुजलोचना त्वमिव या कोकाभिरामस्तनी

धत्ते षट्पदजालनीलचिकुरान्सौभाग्यवत्युज्वलान् ॥ १९

दृशा०— इयमपि न कथयिष्यति सत्साध्वसेन.

राम:— कथमियमपि जडरूपा न कथयति ।

सीता—( सचिताश्वासं ) को उण एक्कवसापहरिदं मं अज्जउत्तस्स

भणिस्सदि । जं सुणिअ सो मं सोअसाअरादो तारइस्सदि.

अन०— हला, उवरि पेक्खस्स.

लक्ष्म०—( स्व० ) कथमार्य उन्मादेन गृह्यते । अहो कीदृशी

गति दैवस्य । ( प्र० ) आर्य, किमेतत् । तदलं संरंभेण,

**रावण—**

**श्लोक.**

वज्रापरीस ही तीक्ष्ण माझी चापदि जाणता,
सांगेल शैल सीतेला कैसा तें पाहतों अतां.

**राम-** काय ! हा तर हालत बोलत सुद्धां नाहीं ! असो, तर आतां गिरिनदीप्रत विचारूं.

**श्लोक.**

उत्संगीं वससी अजूनि गिरिचे तूंची, अये निम्नगे,[1]
उत्संगीं बसणें जिला प्रिय वधू ती पाहिली सांग गे.
नेत्रें पंकजशीं, कुचद्वय तसें कोकापरी[2] शोभतें,
काळ्या षट्पदपंक्तिचे परि शिरीं जीच्या, अहो, केश तें.

असी तीं सुभग व उज्ज्वल जी प्रिया ती पाहिली असली तर मला सांग बरें ?

**रावण—** ही देखील माझ्या धाकानें सांगायाची नाहीं.

**राम—** अरे ! हीही जडरूपाच आहे. एक शब्दही बोलत नाहीं.

**सीता—** ( चितेनें श्वास टाकून ) राक्षसानें हरून नेली असें प्राणनाथाला कळलें, तर तो मला शोकसागरांतून तारील, पण हें त्याला कोण बरें सांगेल ?

**अनला—** थांब थांब, इतक्यांत धीर टाकूं नको. पुढें काय होतें तेंही पाहूं दे.

**लक्ष्मण—** ( मनांत म्हणतो ) काय करावें ? दादाला तर उन्मादवायूनें घेरल्याची अवस्था झाली. कसें हें दैव फिरलें, पहा ! ( मोठ्यानें म्हणतो ) दादा, हें काय ? इतके घाबरूं नका. अश्मळ धीर धरा कीं.

---

टीप.—१ हे नदि. २ चक्रवाक पक्ष्यापरी.

**सीता०**— ( सास्रं सस्नेहं ) अहं मह पुत्तआए एत्थ पुढमं अज्जउत्तस्स महावपुत्तं णिवेदिअवत्तो.

**रामः**— तर्हि दक्षिणेन पथा, वत्स, मृगयावहे. ( इति परिक्रम्य ) वत्स, पश्य पश्य.

यान्यद्य जातिकुसुमानि मयार्पितानि तस्या विदेहदुहितुश्चिकुरांतराले,
तान्येव सौरभविकृष्टमधुव्रतानि पृथ्वीतले निपतितानि, ततः प्रतीमः. २०

**लक्ष्मणः**— केनापि ह्रियमाणाया देव्याः कबरीभाराद्गलितैर्भवितव्यमेतैः.

**दशा०**— हंत हंत, मम तस्या हरणे परिश्रमः प्रमादमकरोत्.

**सीता०**— ( साश्वासं ) णिउणं खु एदस्स वअणं लक्खणे मं ओहरंतस्स वदणीए.

**रामः**— ( कतिचित्पदानि गत्वा ) लक्ष्मण, किन्त्वेतत् ?

कस्यायं भुवि सारथिर्निपतितः ? क्वापविद्धा इमे
रथ्याः कस्य खराः पिशाचवदनाः ? कस्यैष भग्नो रथः ।
कस्येदं मुकुटं विपातितमिदं ? कस्यायमानं धनुः ?
कस्यैते दशकाण्डभागादभृत पीना भुजा दारिताः ? २१

**सीता.**— ( डोळ्यांत आसवें आणून ह्मणते ) अगे, माझ्यामुळेंच प्राणनाथ अशा अनर्थांत पडले तेव्हां मी त्यांना मोठी उत्पातरूपिणीच झालें बाई !

**राम.**— चला तर आतां दक्षिणेकडील मार्गानें तिचा शोध करीत जाऊं. ( असें ह्मणून इकडे तिकडे फिरून ह्मणतो ).

## श्लोक.

जीं मीच जातिकुसुमें अजि गुंफियेलीं,
त्या राजपुंगवसुताचिकुरांतरालीं[१],
सौगंध्यलुब्ध अलि होउनि यांवरी[२] हे
आहेत, तींच पडलीं निरखूनी, पाहें.

**लक्ष्मण.**— कोणी तरी वहिनीला धरून नेत असतां तिचे पुष्पद्यांतुन हीं गळून पडलीं आहेत.

**रावण.**— अरेरे ! तिच्या हरण करण्याचे गर्दींत मला त्याचें अवधान राहिलें नाहीं खरेंच.

**सीता.**— ( धैर्ययुक्त होऊन ह्मणते. ) होय, **लक्ष्मणभाऊजी** ठीक बोलले. आतां यावरून मला राक्षसानें ज्या मार्गानें नेलें, त्या मार्गास हे लागतील खरे.

**राम.**— ( कांहीं पावलें जाऊन म्हणतो ) वत्सा **लक्ष्मणा**, हें काय आहे रे ?

## साक्या.

कोणाचा हा सारथि येथें मरूनि पडला आहे ?
पिशाचमुख हे खर[३] ही तैसे कोणाच्या रथिचे हे ?
कोणाचा रथ, मुकुट, धनू हीं, मोडुनि पडलीं कैसीं ?
दहा भुजांचीं स्वर्ण भूषणें तुटूनि पडलीं तैसीं.

---

टीप—१ सीतेच्या केशामध्यें. २ यां पुष्पांवरी. ३ गाढव.

**लक्ष्मणः**— आर्य, एवमुत्पश्यामि जानकीनिमित्तं द्वयोर्वीरयोः प्रवृत्तमायोधनं.

**दशा०**— ( सरोषं )

जनितो येन वियोगं जानकीं हरतो मम,
सम्यक्कृतैव पापस्य शिक्षा तस्य जटायुषः. २२

**सीता०**— हा तात, पक्खिराअ, एव्वं मं संरक्खणि रक्खंतो विण खु समरस फलं पाविदोसि ।

**अन०**— बैलवंतो खु दसग्गीवो तिहुवणवीरसंतावदो, ता किं करिस्सदि ।

**रामः**— वत्स लक्ष्मण, धनुर्धनु ( इति ससंभ्रमं परिक्रामति )

**लक्ष्मणः**— किमिदमकाडे पृच्छति मामार्यः ( इत्यनुव्रजति. )

**महापा०**—

भ्रुकुटीभीषणमुखं, हुंक्रियागर्भकंधरं,
त्रिलोकीमिव संरब्धो दिधक्षन्निव दृश्यते. २३

**दशा०**— ( ससंभ्रमं ) तस्यैतस्य समक्षं परिहृत्य विहर्तव्यमस्माभिः किमस्य कृपणस्य प्रतियोधनेन कीर्तिः स्यात् ( इत्युत्तिष्ठति )

**महा०**— राजप्रेक्षणकमेतत्, तदुपविश्यतां.

**सीता०**— कीसे एदस्स संरंभो ।

लक्ष्मण.-- वहिनींच्या निमित्तानें कोण्या दोघा वीरांचें युद्ध झालें असावें असा तर्क वाटतो.

रावण.-- ( रोषानें म्हणतो ).

श्लोक.

ज्यानें केलें महाविघ्न जानकी हरितां मला,
शिक्षाही बरवी झाली त्या दुरात्म्या जटायुला.

सीता.-- अहो पक्षिराज जटायूमामंजी, अशा मज मंदभागिनीचे संरक्षणार्थ तुह्मी फार श्रम केले, पण ते सर्व निष्फळ झाले कीं!

अनला.--दशग्रीव हा मोठा बलवान, त्यानें त्रिभुवनांतील वीरमात्रास ताप दिल्हा आहे. त्याच्यापुढें त्या जटायूचें काय चालतें?

राम.-- लक्ष्मणा लक्ष्मणा, पाहतोस काय? लौकर धनुष्य आण धनुष्य. ( असें म्हणून घाईघाईनें इकडे तिकडे फिरतो ).

लक्ष्मण-- भलत्याच वेळीं दादा हें असें मला काय म्हणतात ? ( असें म्हणून त्याच्यामागें जातो ).

महापार्श्व.--

साकी.

भ्रुकुटीभीषण[1], वक्र कसें हें, हुंकारहि हा कंठीं,
त्रैलोक्याही जणु जाळिल कीं ऐसी उग्रा दृष्टी.

रावण-- ( घाबऱ्या घाबऱ्या म्हणतो ) त्याला वाळून मौज मारावी हें चांगलें! ह्या पामरा बरोबर युद्ध करून काय कीर्ति मिळणार आहे? ( असें म्हणून उठतो ).

महापार्श्व.-- महाराज, हें नाटक आहे, हा खरा राम नव्हे. तर खालीं बसावें आपण.

सीता.-- प्राणनाथ इतक्या गर्दीनें कों बरें चालिला?

टीप.-१ भ्रुकुटीकरून भयंकर.

**रामः—** अयमवनिधराभो, निःश्वसन्दीर्घदीर्घं,

सुखमुकुलितनेत्रः, शोणिताम्भुक्षितांगः,

द्विरद इव मृणालं जानकीं भक्षयित्वा

पथि निवसति कश्चिद्राक्षसः पक्षिरूपः. २४

तदेनं हनिष्यामि.

**दशा०—** ( सामर्षं )

केनेयं रक्षसा सीता भक्षिता मन्मनःप्रिया ?

करवालः करालो मे कस्य कंठे पतिष्यति ? २५

**महा०—** किं विस्मृतं देवेन ? नन्वियमशोकवनिकायां निरुध्यते.

**सीता०—** अहं वि केण रक्खसेण ण भक्खिदह्मि, किंतु अज्जउत्तस्स विप्पओअं अणुभविदुं अज्जवि जीविदं धारेमि.

**लक्ष्म०—** ( पुरोवलोक्य ) आर्याल संभ्रमेण तात जटायुरिवायं प्रतिभाति.

( नेपथ्ये )

वत्स रामभद्र.

रक्षसापन्हृतां सीतां विमोचयितुमुद्यतः

हतस्तेनास्मि, मां भूयो मा वधीस्त्वं जटायुषं. २६

**दशा०—** ( श्रुत्वा ) कथमेतयो राजपुत्रयोरागमनपर्यन्तमयं जरठगृध्रः प्राणान्धारितवान् ? मया खलु परित्यक्तजीवितोऽयमधुना न भविष्यति राजपुत्रयोरिति विश्रब्धं प्रस्थातुमारब्धं ।

राम.—

श्लोक.

क्षितिधरनिभ[1] ऐसा दीर्घनिश्वास टाकी,
सन्मुख मिटुनि नेत्रें, मारवला शोणितें कीं,
मदगज बिस[2] तैसी भक्षुनी जानकी हा
निशिचर बसलासे पक्षिरूपें अहाहा !

तर याला आतां मारून टाकितों.

रावण.—( क्रोधानें स्व० ).

श्लोक.

कोणेंही राक्षसें सीता भक्षिली मन्मनःप्रिया ?
करालें करवालें[3] या छेदितों मी अतां तया.

महापार्श्व.—तिला तर आपल्या अशोक वनांत बंदींत ठेविलें आहे याचें महाराजांस स्मरण नाहीं वाटतें ?

सीता.— राक्षसविक्षसानें कोणी मला भक्षिलें नाहीं. प्राणनाथाच्या विरहाचें दुःख सोसीत ही मंदभाग्या अजून जीवंतच आहे.

लक्ष्मण.—( पुढें पाहून स्व० ) दादा दादा, थांबा थांबा. घाई करूं नका, जटायुकाका प्रमाणें हा दिसतो.

( पडद्या पलीकडे जटायु बोलतो ).

वत्सा रामभद्रा,

श्लोक.

राक्षसाल्हृतें[4] सीतेला सोडवायास धांवलों.
मी जटायू, नका मारूं, असें त्यानेंच मारिलों.

रावण.—( ऐकून स्व० ) काय ! हे राजपुत्र येत तोंपर्यंत ह्या थेर ड्याणिधाडानें प्राण धरिला का ! हा आतां ठार झाला, राजपुत्रांस माझी बातमी सांगूं शकणार नाहीं अशा भरंवशावर मी तेथून नि- घून चालता झालों होतों.

---

टीप—१ पर्वततुल्य. २ मदमत्त हत्ती जसा बिसातें. ३ भयंकर खड्गानें. ४ राक्षसानें हरिलेल्या.

सीता०— ( सहर्षं ) केहं तावजडाउणा रक्खसेण हदेणावि जीव-
अंतेण साणुअस्स अज्जउत्तस्स अहं रक्खसेण ओहरिदा कहिद-
म्हि । ( विचिन्त्य ) ता एत्तिअं कालं मं विमोचेदुं कीस विलंबदि
अज्जउत्तो, ।

अन०— सं॑व्वं पेक्खणए पेक्खम्ह.

लक्ष्मणः०— ( सहसोपसृत्य ) हा तात, शकुंतराज, त्वमेवमवस्थ
संवृत्तः ।

रामः०— आर्य, कथय कथय, यदि ते शक्तिरस्ति कथयितुं राक्षसः
कस्य पुत्रः, किं तस्य नाम, क वा निवसति, किं बलं तस्य, किं-
मर्थमपहृता तेन सीतेति ।

दशा०— ( सधैर्यं ) शंसत्वस्मै सर्वमेव वृत्तांतं शकुंतापसक, किं
ततो बिभेति लंकेश्वरः ।

सीता०— ( सोत्कंठं ) एसो वसणीवबाणखलिदकंठो किं कहइस्स-
दित्ति कादरम्हि.

( नेपथ्ये ) वत्स दाशरथे,

चेतो मुह्यति मे, वचः स्खलति च, नष्टं दृशौ चाक्षमे;

दशा०— मिथ्या न ।

सीता०— ( सकरुणं ) तादे गिध्धराअ भणिणमित्तं एरिसी वसं
पाविदोसि ।

रामः— तात, कथंचिद्धैर्यमवलंब्य कथ्यतामुपरि.

( नेपथ्ये ) देव,

सीता.— (हर्षित होऊन म्हणते) काय! जटायुमामंजी यांना राक्षसानें मारिलें, तरी जिवंत राहून त्यांनीं भाऊजी व प्राणनाथ प्राप्त होतांच, त्यांना मला राक्षसानें नेलें हें वर्तमान निवेदन केलें! (विचार करून म्हणते) बरें, हें वर्तमान कळलें असून मला सोडवायास इतके दिवसपर्यंत कां बरें विलंब लाविला?

अनला— तें सर्व आतां त्या नाटकाच्या खेळांत समजेलच.

लक्ष्मण.— (झटकर जटायू जवळ जाऊन म्हणतो) अहो पक्षिराज, जटायुकाका, तुमची असी अवस्था झाली? अरेरे!

राम.— काका, बोलण्याची शक्ति असली तर तो राक्षस कोणाचा पुत्र? त्याचें नांव काय? तो राहतो कोठें? त्याचें बळ केवढें? त्यानें सीतेला काय म्हणून हरिलें? हें सर्व सांगावें.

रावण.— (धैर्य धरून म्हणतो) हा दुरात्मा पक्षी हें सर्व वर्तमान सांगेल का? यानें सांगितलें तरी लंकेश्वर त्याला कोठें भितो आहे?

सीता.— (उत्कंठेनें बोलते) दशग्रीवाच्या बाणेंकरून याच्या गळ्याला जखम झाली होती. त्यामुळें ह्याला हें वर्तमान कसें सांगतां येईल कोण जाणें? मला मोठी चिंता वाटते. काय करूं?

(पडद्यापलीकडून जटायु बोलतो) वत्सा दाशरथे,

### श्लोक. (प्रथम चरण.)

चित्ता मोह, जिभेस फार जडता, नेत्रीं अंधेरी आली,

रावण.— फार चांगलें झालें. ही आमच्या हिताचीच गोष्ट आहे.

सीता.— (करुणेनें म्हणते) अहो गृध्रराज मामंजी, माझ्याकरितां तुमची असी दशा झाली ना? शिवशिव.

राम.— काका, थोडें धैर्य धरून पुढें सांगावें.

(पडद्यापलीकडून जटायु बोलतो) रामचंद्रा,

किं वक्ष्ये, हरति प्रियां स महतीमास्थाय मायां तव,

**दशा०—** ( सगर्वं ) किं विमोक्ष्यति ज्ञातिवधामर्षी लंकेश्वरः ?

**सीता०—** हीं अज्जउत्त, हा वत्सलरक्खण, ण जाणीअदि तुम्हेहिं एव्वं असरणं जाणई रक्खसो-( इत्यर्द्धोक्ते ) अणले, एदं पेक्खंतिए मए सज्झससंभमताए पुढमं परिचिदाइं अक्खराइं दाणिं वि आलविदाइं.

**अन०—** ऐवंएदं.

**रामः—** नहीमां रामस्य समक्षं हरति राक्षसापसदः ?

**लक्ष्मणः—** ( सक्रोधावलेपं )

आर्या विदेहतनया विरहतामुनेति, तातो जटायुरपि कृत्ततनुर्युधीति, एनं श्रुतं किमसिना लवशो न कुर्यां, यद्येष चौर इव नापचरेन्निगूढं.२८

**दशा०—** ( सस्मितं )

शत्रूणां मर्मभेदीनि व्यसने स्वेष्टसाधने,
करिष्यति किमन्यश्च वक्तव्ये चतुरो जनः ? २९

**रामः—** तदुपरि कथय.

( नेपथ्ये )

चिरो नाम मुहूर्त एष, सुलभं नष्टं यवस्मिन्धनं.

**श्लोक. ( द्वितीय चरण ).**

माया थोर करूनियां तव[1] अतां त्यानें प्रिया हारिली;

**रावण.**— ( गर्वानें ह्मणतो ) हरील तर काय सोडील ? त्याच्या ज्ञातीचा वध केला तो पाहून त्याला नाहीं क्रोध येणार ? सामा-न्याला देखील येईल, मग हा तर लंकेश्वरच आहे.

**सीता.**— अहो प्राणनाथ, अहो **लक्ष्मण** भाऊजी, तुम्हास न कळूं देतां मज अनाथेला हा राक्षस धरून-( असें अर्धेच वाक्य बो-लून म्हणते ) अगे **अनले**, हें नाटक पाहत असतां भीतीनें भान न राहून मागें जे शब्द वारंवार उच्चारल्यानें तोंडीं बसले, तेच आतां तोंडांतून निघाले.

**अनला.**— खरी गोष्ट आहे, भीतीनें असेंच होतें.

**राम.**— त्या दुष्ट राक्षसानें मज **रामा**च्या समक्ष तिला न्यावयाचें होतें. म्हणजे दाखविलें असतें काय तें ?

**लक्ष्मण.**— ( क्रोधानें आणि गर्वानें म्ह० )

**श्लोक.**

आर्यें विदेहतनये हरिलें ह्मणूनी, ताता **जटायु**सहि तोडियलें शरांनीं, त्याचे असीकरुनि[2] खंडकरीन, पाहीं, तो तस्करापरि[3] जरी न लपून राही.

**रावण.**— ( हांसून ) अँः, यांत काय आहे ?

**साकी.**

व्यसनीं अथवा स्वेष्टसाधनीं रिपुमर्म काढावीं;

जे केवळ वाक्पंडित त्यांची हीच रीत जाणावी.

बडबडीशिवाय दुसरें त्यांच्यांनीं काय होणार ?

**राम.**— काका, पुढेंही सांगावें.

( पडद्यापलीकडून **जटायु** श्लोकाचा तृतीय चरण म्हणतो. )

विंदाख्य[4] स्फुट हा मुहूर्त, मिळतें गेलें त्वरें यांत, रे

टीप-१ तुझी प्रिया. २ तरवारीनें. ३ चोरासारिखा. ४ विंद या नांवाचा.

**दशा०**— ( सावेगं ) अभिज्ञेनापि नैष विज्ञातोयं मया तदानीं ।
भवतु. नैवं कृतेपि यथाकालं शमं करिष्ये पुरुषकारेण.

**सीता**.– अपि णाम एवं संभावीअदि मह मंदभाइणिए ?

**लक्ष्म०**– स एव को राक्षस इति न ज्ञायते. कथं नष्टधनस्य पुनर्लाभः ?

**रामः**— तात पृच्छतो मम किमुत्तरं ?

( नेपथ्ये ) वत्स, वक्ष्यामि सर्वं, श्रूयतां.

पुत्रो विश्रवसो मुनेस्त्रिभुवने नाम्ना ख्यातो रावणः. २९

**दशा०**– कथमुक्तमेवेदमस्मै क्षत्रियबटवे मदीयं नाम श्येनेयहतकेन ।

( निःश्वस्य ) हंतहंत,

छिन्नपि कृपाणेन पक्षौ पादौ च संयुगे
कस्मादस्य विहंगस्य कंठं न च्छिन्नवानहं ? ३०

**सीता**.– ( सचिंताश्वासं ) कहं णाम एदस्स एदेण विअंतरे लंकाडेरं आणिदं मं जाणादि अज्जउत्तो ?

**रामः**– तात शेषमपि कथय.

**लक्ष्मणः**– ( सबाष्पगद्गदं ) हंत हंत.

व्यादाय चंचूपुटमेव मुंचन्,
रक्तं च सास्रं, परिवर्तिताक्षः,
भूमौ लुठन्नातैरपादपक्षः
स्तातो जटायुस्त्यजतीव जीवं. २१

**रावण.**— ( दुःखाच्या आवेशानें म्हणतो ) अरेरे ! मला ही गोष्ट ठाऊक असतां त्या काळीं मी तिचें मनन केलें नाहीं ! बरें असो. वेळ आली म्हणजे पराक्रमाच्या योगानें त्याचा प्रतिकार करीन. काय चिंता आहे ?

**सीता**— मज मंदभागिनीची असी गोष्ट होईल काय ?

**लक्ष्मण**— तो राक्षस कोणता हें समजत नाहीं, मग गेल्या वस्तूचा लाभ पुनः कसा होईल ?

**राम**— काका, मी विचारितों याचें उत्तर द्यावें कीं,

( पडद्याचे आंतून **जटायु** उत्तर करितो ) वत्सा, सर्व सांगतों ऐक.

**श्लोक.** ( चतुर्थचरण ).

नामें **रावण विश्रवःसुत** असा विख्यात लोकीं बरें.

**रावण**— काय ? ह्या क्षत्रियाधमाला दुष्ट पक्ष्यानें माझें नांव सांगीतलें ? ( निःश्वास टाकून म्हणतो ) अरेरे !

**श्लोक.**

दोन्हीं पादां आणि पक्षां कृपाणें छेदिलें, तसें
ह्याचा कंठहि म्यां काय म्हणूनी छेदिला नसे ?

**सीता.**— ( चिंतेनें उसासा टाकून म्हणते ) हाय हाय ! नुसतें नांव मात्र सांगीतलें तेवढ्यावरून, द्वीपांतरीं **लंका**पुरीप्रत मला आणिलें हें प्राणनाथाला कसें समजेल ?

**राम**— काका, बाकीचें राहिलेलेंही सांगावें.

**लक्ष्मण.**— ( सद्गदित होऊन व आंसवें टाकून म्हणतो ).

**अभंग.**

चंचुपूट वासीयेलें, डोळ्यावाटे पाणी आलें,
बुबूळेंही फिरताती, वर पठारांत जाती,
हातापायांवीणे लोला, तडफडी भूमीतळा,
आतां नाहीं बोलवत, काका परलोका जात.

रामः– ( सातंकं ) कथं कथितशेषमकथयन्नेव तातजटायुर्जीवितं

जहाति । ( उपसृत्य ) हा तात, हा दशरथप्रियसख, हा पंचवटी-

वासप्रशंसाहवसाहाय्यक, हा गरुडाग्रजकुलप्रदीप,

राज्यभ्रंशाद्विप्रणाशात्पितुर्नः कांतारेऽस्मिन्दारुणे विप्रवासात्,

सीतायाश्चादर्शनादुत्थितोयः शोकांभोधिः पार्यते त्वत्कृतेन. ३२

महा०— राजन्भवानेव निमित्तमस्य सर्वस्य शोकस्य.

दशा०– किं न विदितममात्येन ?

महा०– कथयतु, कथयतु.

दशा०–

सुबाहुमारीचकरालघाताद्वधात्त्रिमूर्ध्नश्च तथा खरस्य,

महत्तरो मेऽजनि लक्ष्मणेन स्वसुर्विरूपीकरणेन शोकः. ३४

( ससंरंभं ) तदिदानीं

मत्खड्गाहतमूर्धश्च सौमित्रेः कंठरंध्रतः

निर्यातमुपाकृष्य रक्तं शूर्पणखा पिबेत्. ३५

( इति खड्गपाणिरुत्तिष्ठति )

**राम.**— अरेरे ! बाकी राहिलेलें सांगायाचें तसेंच ठेवून **जटायु**का-का प्राण सोडितो काय ? ( **जटायू**च्या जवळ जाऊन म्हणतो ) हा तात **दशरथ**प्रियसख्या, हा पंचवटीत वासकरणाऱ्यास साह्य करणाऱ्या, हा **गरुडाग्रज**कुलप्रदीपा, **जटायो**, काय हा घोर प्रसंग ! देवा,

**श्लोक.**

राज्यनाश जाहला पिताहि मृत्यु पावला,
त्यामध्यें उभा कसा अरण्यवास राहिला !
स्त्रीहि कीं गमावली अशा विपत्तिसिंधुला,
नाव जो तराव्रयास तोहि मित्र चालला.

**महा०**— महाराज, त्याला जो हा इतका शोक झाला, त्या सर्वाला कारण आपला चरणप्रतापच होय.

**रावण.**— अरे, तुला ठाऊक नाहीं वाटतें ?

**महा०**— नाहीं महाराज ठाऊक नाहीं, तर आपण सांगावें काय तें ?

**रावण.**— अरे त्या दुष्ट **लक्ष्मणा**नें माझ्या बहिणीचें काननाक कापून मला लहान शोक उत्पन्न केला काय ?

**श्लोक.**

**सुबाहु, मारीच, कराल**, यांच्या **खर**त्रिमूर्धादिक राक्षसांच्या वधाहुनी **शूर्पणखा** इचें पैं विरूपकारित्व मनास जाचे.
( क्रोधाच्या आवेशानें ह्मणतो ) तर आतां

**श्लोक.**

खड्गें करोनि **सौमित्रि**कंठास छिन्न मी करीं,
त्यावाटे निःसृता रक्ता पिवो **शूर्पणखा** वरी.
( असें म्हणून हातांत खड्ग घेऊन उठतो ).

**महा॰**– राजन्प्रेक्षणकमेतत् ! ( इति निवारयति )

**सीता॰**– ( सशोकं ) कँहं इमाणं मह हरणं एदस्स रावणेत्ति णाममेत्तं अ कहिअ तादजडाउणा पाणा विमुक्का; ण उण इमिणा अस्स लंकाउरं ठाणं कहिदं ता किं करिस्सं मंदभाइणी.

**लक्ष्मणः**– आर्य, नायं शोकावसरः. उपलब्धव्या खलु शत्रोरद्य स्थानभूमिः.

**राम**– ( सक्रोधं )

> यदि व्रजति जानकीमपहरन्पुरं वासुकेर्,
> यदि त्रिदशधाम वा यदि पुरद्विषो वांतिकं,
> तदेष रजनीचरं मम शरश्च्युतः कार्मुकाद्
> ग्रसिष्यति न चर्वितुं किमुरगं गरुत्मानिव १३६

**दशा॰**– ( सासूयं ) रे रे क्षत्रियडिंभ, वृथा किं कत्थसे ? न जानासि त्रासितवृत्रारिप्रमुखदिक्पालकुलस्य लंकेश्वरस्य प्रतापं.

**सीता**– तॉ कीस विलंबिअदि अज्जउत्तेण एत्तिअं कालं ? ( सशोकं ) हला अणले, पेक्खणअं खु एदं ता मण्णे तस्सिं अणभिण्णावकेदवे महापुरिसे मायाविणा इमिणा रक्खसणाहेण किंवि अच्चहिदं भवे.

**अन॰**– हॅलॉ, परिसेहि खणमत्तं, उवरि पेक्खम्ह.

**लक्ष्म॰**– आर्य, प्रसीद.

**महा०**— महाराज, हें खेळांतील सोंग आहे. खराखुरा **लक्ष्मण** नव्हे. ( असें ह्मणून त्याला वारिती ).

**सीता.**— ( खेदयुक्त होऊन म्हणते ) काय? माझें हरण आणि राक्षसाचें नांव इतकें मात्र **जटायु** मामंजींनीं सांगीतलें आणि प्राण सोडिला? त्याचें रहायाचें स्थान **लंकापूर** हें सांगायाचें राहिलें? यावरून मी पहा कशी हीन दैवाची आहें ती! हरहर! देवा, काय करूं रे?

**लक्ष्मण.**— दादा, हा शोक करण्याचा समय नव्हे. तर आतां शत्रूच्या राहण्याच्या ठिकाणाचा शोध केला पाहिजे.

**राम.**— ( क्रोधयुक्त होऊन म्ह० ).

**साकया.**

सीतेला चोरुनियां राक्षस जावो तो पाताळा
सूर्यचंद्रलोकाही, स्वर्गा, अथवा कैलासाला,
तरी तयाला शोधुनि मारिल **राम**बाण हा तैसा,
क्षणांत सर्पा धरुनि फाडितो गरुडपक्षि कीं जैसा.

**रावण.**— ( ईर्षेनें ह्मणतो ) रे क्षत्रियाच्या पोरा, व्यर्थ बडबड काय करितोस? इंद्रादिक दिक्पालांना देखील ज्यानें दीन करून सोडिलें, त्या **लंके**श्वराचा प्रताप अझून तुला कळलाच नाहीं.

**सीता.**— तर मग प्राणनाथांनीं इतके दिवस कां बरें विलंब लाविला? ( शोकानें म्हणते ) अगे **अनले**, हें तर नाटक आहे, याचा काय भरवसा ठेवावा? पण माझ्या प्राणनाथाला अगदीं कपट ठाऊक नाहीं, म्हणून या मायावी राक्षसराजानें काहीं तरी त्याचा घात केला असेल असें मला वाटतें.

**अनला**— अगे, क्षणभर धीरधर पुढें काय होतें तें तर पाहूं दे.

**लक्ष्मण**— दादा, एवढी क्षमा करावी.

अस्मिन्क्षणे यदि शरं क्षिपसीह तिष्ठन्,

हन्यास्तदैकमतिदुर्विषहासहं तं;

तद्बंधुमित्रचतुरंगबलैः समेतं

हंतुं यतस्व, परथा न तु वैरशांतिः.३७

किंच,

यद्यराक्षसमित्येकं शरं जगति मुंचसि,

स्त्रीबालवृद्धान्साधूंश्च हन्यादेष निशाचरान्.३८

तत्त्वनुचितमेव दीनजनशरण्यस्य देवस्य.

दशा०- श्रुतंकिमस्य जनस्य वचनममात्येन ?

महा०- एवमेवैष मन्यते. भवतु. को दोषः ?

दशा०- एष खलु

न वेत्ति मे बलं, तस्मादिदं जाल्मो विकत्थते,

इमौ शराग्निभिर्भिद्यामुल्काभिरिव कुंजरौ.३९

सीता:- वत्सलक्ष्मण, साधु भणिदं तुए सरिसं खु एसा सिग्घकरवा पुव्वअवराहिणो रक्खसस्स.

रामः- तर्हि किमतः क्रियतां ?

लक्ष्मणः- दक्षिणा विलाक्रयतामार्यापहरणमन्युपलभाय.

### श्लोक.

> माराल त्यास जरि येथुनि तीव्र बाणा,
> तो दुष्ट एकचि मरेल बरें सुजाणा,
> तद्बंधुमित्र चतुरंगबलासमेत,
> सर्वांस मारुनि करा चिरवैरें[1] शांत.

अणखी.

### आर्या.

> यावद्राक्षस मारिन संकल्पें याहि सोडिला बाण
> तुम्ही, तरि तो घेइल बालस्त्रीवृद्धसाधुंचा प्राण.

हें तर आपणा सारिख्या दीनजनदयाळू पुरुषास अत्यंत अनुचित होय.

**रावण.**— कां ? हा काय बोलतो, तें ऐकिलें ना अमात्यांनी ? काय बेट्या माकडाचा नसता थोरपणा ।

**महापा०.**—असें तो आपल्या जागीं मानितो, त्यांत काय अर्थ आहे?

### श्लोक.

**रावण.**—

> न जाणे बल हा माझें, तेणें श्लाघा करीतसे,
> शराग्नीनें भेदितां या, उल्कांनीं[2] कुंजरा[3] जसें,

**सीता.**— लक्ष्मणभाऊजी, तुह्मी चांगलें बोललां, पहिला प्रथम अपराध याच दुष्ट राक्षसानें केला आहे. तर याला हीच शिक्षा योग्य आहे.

**राम.**—तर मग आतां पुढें काय करावें ?

**लक्ष्मण.**—वहिनीला ज्यानें धरून नेलें, त्याच्या शोधार्थ दक्षिण दिशेस गमन करावें.

---

टीप.—१ चिरकालचें वैर. २ कोलत्यांनीं. ३ हत्तींना.

**रामः**— तर्हि तातजयपुरेण गिरिनदीतटं नीत्वा सत्क्रियतां वत्सेन.

**लक्ष्मणः**— यदाज्ञापयत्यार्यः ( इति निष्क्रांतः )

**रामः**— ( सानुस्मरणं )

स्नेहार्द्रितेन मनसा जनितानि तस्याः संजल्पितान्यनुवनं च विचेष्टितानि

हा कष्टमद्य मम चिंतयतोंतरंगं शोकेन दह्यत इदं मलयाग्निमेव. ४०

( इति मुहुर्मुहुः पठन्परिक्रामति )

( नेपथ्ये )

तातं गृध्रपतिं तथाद्रिसरितः संस्कृत्य शास्त्राध्वना

मां प्रत्यागतमेष कर्षति समं सत्वैररण्योद्भवैः

**रामः**— कथं लक्ष्मणः क्रोशति ? ( साश्चर्यं ) कालः कर्षति भवंतमपि । महादेवसंदेशानुरोधेन वनस्थितो दनुकबंधः कर्षति लक्ष्मणमिति मे वितर्कः,

**दशा०**—युज्यत एवैतत्. ( सहर्षं ) कर्षतु कर्षतु, भक्षतु भक्षतु.

**सीता**— ( सोद्वेगं ) कोएसो एणं कस्सइ. ?

**राम.**— तर मग **जटायु**काकाला नदीतीरावर नेऊन त्वां त्याची सद्गति करावी.

**लक्ष्मण.**— बरें आहे, आज्ञे प्रमाणें करितो. ( असें ह्मणून निघून जातो ).

**राम.**—( मागील स्मरण करून )

**श्लोक.**

स्नेहार्द्रभाषण तशाच विलोकनादी
चेष्टा तिच्या प्रतिबनांत मनोविनोदी,
त्यांची स्मृती करुनि चित्त मदीय आजी
शोकाग्नि हा प्रळयवन्हिपरीस[1] भाजी[2]

( असें वारंवार ह्मणत इकडे तिकडे फिरतो ).

( इतक्यांत पडद्याच्या पलीकडे **लक्ष्मण** शब्द करतो).

**श्लोक.** ( पूर्वार्ध ).

ताताची[3] विधिवत् क्रिया करुनियां येतां फिरोनी असा
ओढीतो मजला, पहा, वनचरा सर्वांसवें हा कसा।

**राम.**— काय! हा **लक्ष्मण** ओरडतो! ( आश्चर्यानें ) हरहर! वत्सा, तुलाही काळ ओढूं लागला ? **महादे**वाच्या आज्ञेवरून वनमार्गांत जो कोणी **दनुक**बंधनामा राक्षस राहतो ह्मणून ऐकतों, तो **लक्ष्मणा**ला ओढीत असेल असा तर्क वाटतो.

**रावण.**— ही गोष्ट खरी आहे. ( हर्ष पावून ह्मणतो ) ओढो ओढो, खाऊन देखील टाको!

**सीता.**—( उद्विग्न होऊन ह्मणते ) हा कोण मेला आऊजींना ओढितो बाई ?

( पडद्याच्या पलीकडे **लक्ष्मण** बोलतो ).

---

टीप.—१ प्रळयकाळाचा अग्नि त्याहून. २ जाळितो. ३ जटायूची

( नेपथ्ये )

बाहुभ्यां कलशास्थिमंथशिखरिस्थूलायताभ्यामहो

कुक्षिस्थैककराललोचनमुखः कश्चित्कबंधाकृतिः.

रामः- अहो प्रमादः ! तदुपसर्पामि.

( नेपथ्ये )

कस्त्वं ? राजकुमार दृश्यसे, दिष्ट्या खलु प्रविष्टोसि मम भक्षणार्थं भगवता दिष्टेन.

रामः— ( श्रुत्वा त्वरितं परिक्रम्य विलोक्य ) कथं वत्सेन हत एष राक्षसः ? यदिदानीं

असिविदलितयोजनायतबाहुद्वये राक्षसे,

पतितरुधिरवर्षकंधबंधे कबंधाकृतौ,

वपुषि विहितलक्ष्मणो लक्ष्मणोयं जयश्रीर्

घनघुसृणकणैरिवासृक्पृषद्भिः समभ्येति मां. ४२

दशा०— ( सशोकाश्चर्यं ) कथं दनुकबंधो निहतो वीरबटुना ? य एतद्वधुहृदयवधाय मध्ये वनपथं मया स्थापितः.

### श्लोक. ( उत्तरार्ध ).

ज्याचे बाहु विशाळ, अस्थि गिरिवत्, जे लांबही आसती,
डोळा येक जयास, तोंड उदरीं, ऐसा कबंधाकृती.

**राम.**— अरेरे घात झाला ! त्याकडे जातो.

( पडद्याच्या आंत **दनुकबंध** बोलतो ).

अरे क्षत्रियकुमारा प्रमाणें दिसतोस असा तूं कोण आहेस रे ? मला भक्षायास पाहिजेच होतें. दैवानेंच तुला येथें धाडिलें फार चांगलें झालें.

**राम.**— ( ऐकून घाईघाईनें इकडे तिकडे फिरतो व पाहून म्हणतो ) काय ! वत्सानें या राक्षसाला मारूनही टाकिलें !

### अभंग.

चार चार कोस लांब भुज दंड,
तोडोनियां खंड खंडें केले.
स्कंधांतुनि त्याचे रक्त जें चालिलें,
बिंदुनीं माखलें वत्सगात्र[1].
नव्हती हे बिंदू रक्ताचे कीं जाण
दिलें आलिंगन जयश्रीनें.
तीच्या अंगीं उटी केशराची होती
कण हे आहेती तीचेचि कीं.
ऐसा हा **लक्ष्मण** विजयी होऊन
येतो परतोन सन्मुखची.

**रावण.**— ( सशोक व साश्चर्य होऊन म्हणतो ) काय ! ह्या वनमार्गामध्यें ह्या दोघां बटूंना मारण्या करितां जो **दनुकबंध** ठेविला होता, तोही कारट्यानें मारिला ?

---

टीप—१ लक्ष्मणाचें शरीर.

**सीता.**— ( सहर्षं ) वच्छ दिट्ठिआ मिथुमुहादो मुक्कोसि.

( प्रविश्य लक्ष्मणः )

**लक्ष्मणः**— ( आकाशे लक्षं बध्वा ) किं ब्रवीष्यार्यं मत्यशरीरिणो वाणी. शृणु, रामचंद्र, वक्ष्यामि ते तत्कर्म, यज्जानाकौलाभविपक्षविजययोरौपयिकमिति ?

**राम**— ( सादरं शृणोति. )

**लक्ष्मणः**— भूयः किं ब्रवीति ?

"सुग्रीवं कपिवरमृष्यमूकशृंगे तिष्ठंतं सह सचिवैश्चतुर्भिरेव संप्राप्य प्रियसखमग्रजस्य राज्यं तस्मै चेद्वितरसि वालिनः कृती स्याः."४३

अपिच.

"शापेन स्थूलशिरसो मुनेरासं निशाचरः,
तस्मान्मां मोचितवतो वाक्यमात्रं प्रत्युपक्रिया." ४४

कथं कबंध एष त्यक्तदेहो देवो भूत्वा कथयति ।

**दशा**०— ( सासूयं ) कथं तद्दनुकबंधोपि मत्पक्षमुत्सृज्य परपक्षं प्रविष्टः ?

**महा**०— असंभावितमेतत्, यत्किल वालिनो राज्ये सुग्रीवस्य प्रतिष्ठापनं. कुतः

**सीता.**— (हर्षानें म्हणते) आऊजो तुम्ही दैवानें मृत्युमुखांतून सुटलों।

**लक्ष्मण.**— (पवळाच्या बाहेर येऊन आकाशाकडे पाहून म्हणतो) काय? "अरे **रामचंद्रा,** जेणेंकरून **जान**कीची प्राप्ति आणि शत्रूचा नाश होईल असा उपाय मी तुला सांगतों श्रवण कर," असें दादा! ही अशरीरवाणी बोलते काय।

**राम**— (सादर होऊन ऐकतो).

**लक्ष्मण.**— पुनः ती आकाशवाणी आणखी बोलते कीं—

## श्लोक.

'**सुग्रीव** स्फुट कपिनाथ **ऋष्यमूकीं**
"राहे जो सचिवचतुष्टयासवें कीं,
"**वालीतें** वधुनि तयास राज्य देसी
"सख्यातें करुनि, तरी कृतार्थ होसी."

आणखी

## अभंग.

"स्थूलशिराऋषी याचे शापानेंच राक्षसत्व नीच पावलों मी.
"तया पासोनीयां सोडवीलें मला, उपकार केला तुम्ही बहू.
"तयाची ही फेड होईना माझ्यानें केलीसे शब्दानें यथाशक्ति"

काय? हा **कबंध** आपला राक्षसदेह टाकून देवत्व पावला आणि भाषण करीत आहे?

**रावण.**— (असूयायुक्त होऊन म्हणतो) अरे! **तनुकबंध** देखील माझ्या पक्षास सोडून परपक्षास मिळाला ना?

**महापार्श्व**— महाराज, पण "**वालीला**" मारून त्याच्या राज्यावर **सुग्रीवाला** बसविणें, ही गोष्ट **रामाच्या** हातून घडणें अशक्य आहे. कारण,

भार्गवस्य त्रिशिरसः खरदूषणयोरपि

विजेताप्येव दुर्धर्षवालिनं न विजेष्यति. ४५

दशा०— अतः खल्वेतयोः क्षत्रियकुमारयोर्वधार्थं वालिनः प्रेरणं सिद्धां

तितं मंत्रिजनैः. पश्य, पश्य.

यः प्राग्दक्षिणपश्चिमेषु जलधिष्वप्येकमात्रे क्षणे

संसर्पन्वितनोति चंद्ररुचये सांध्यं तदर्घ्यं त्रयं,

हत्वा दुंदुभिमाहवे गिरिनिभं दोर्भ्यां क्षिपन्योजने,

नैतस्यास्ति समो बलीति निखिलैर्भूतैरततश्चाजनि. ४६

महा०— (स्वगतं) एतस्य सर्वापि विजयाशंसा वालिनि समाप्यते.

वालिनो वधे विदिते किंवा करिष्यतीति न जाने. (प्र०) राजन्

न्नेवमेवैतत्.

राम— (आकाशे) अनुगृहीता वयमत्रभवता, अथेदानीं यथाभि-

लषितं दिव्यं पदमुपगंतव्यमार्येण.

लक्ष्मण— किं ब्रवीति पुनरार्यः? "अनेन पंपासरस्तटपथेन ऋष्य-

मूकमति प्रस्थातव्यमिति."

### श्लोक.

त्रिशिरदूषण राक्षस मारिले,
भृगुसुतास तसें जरि जिंकिलें,
तरि समर्थ नव्हे नर तो अजी
समरिं इंद्रसुता वधण्यास, जी.

**रावण.—** असें आहे म्हणून तर क्षत्रिय कुमारास मारून टाकण्याकरितां **वाली**चीच योजना करण्याचा विचार मंत्रिजनांनीं ठरविला, पहा पहा !

### श्लोक.

जो प्राक्पश्चिमयाम्यसागरजलीं अर्घ्यैंत्रयातें त्वरें
द्याया श्री रविकारणें प्रतिदिनीं एकें क्षणार्धीं फिरे,
मारी **दुंदुभि** राक्षसा, अणि तया फेंकी करें योजनीं,
ऐसा नाहिं बळी जगांत म्हटलें ऐसेंच सारे जनीं.

**महापार्श्व—** ( मनांत म्हणतो ) आपल्याला जय मिळेल, आपल्याला जय मिळेल अशी जी याला आशा आहे, ती **वाली** संपेपर्यंत ! **वाली** मरण पावला हें जेव्हां याला कळेल, तेव्हां हा काय करील कोण जाणे ? ( मोठ्यानें म्हणतो ) महाराज, आपण ह्मणतां तें वास्तविक आहे.

**राम—** ( आकाशाकडे पाहून ह्मणतो ) अरे परमपूज्या, त्वां आह्मावर आज मोठा अनुग्रह केला बरें ! आतां स्वकीय दिव्यस्थानाप्रत गमन करावें.

**लक्ष्मण—** अरे, पुनश्च हा काय म्हणतो ? " हा मार्ग **पंपासरोवरा** वरून जात आहे तर याच मार्गानें **ऋष्यमू**काप्रत जावें," असें सांगतो काय ?

---

टीप—१ परशुरामास. २ पूर्व पश्चिम दक्षिण समुद्राचे जळांत.

**रामलक्ष्मणौ.**—तथा कुर्वः ( इत्युभावपि परिक्रामतः )

**दशा॰**— ( साशंकं ) महापार्श्व, कथं सुग्रीवेण सख्यं भवेदस्य मिथ्यातापसस्य ?

**महा॰**—संभावितमेवेदं.

**दशा॰**— ( सधैर्यावष्टंभं )

> सहस्रं संतु सुग्रीवाः, सहस्रं संतु राघवाः,
> वालिनं विक्रमांभोधिं नातिलंघितुमीशते. ४७

**महा॰**— ( स्व॰ ) एवं खलु तत्वानभिज्ञो देवः, किं कुर्वंति वालिशे राजनि मंत्रिजनाः ? सर्वं प्रेक्षणके व्यक्तं भविष्यति.

**सीता.**— ( सानुस्मरणं ) मं गेण्हिअ गगणतळे धावंतस्स रक्खसस्स अंकगदाए मए कस्सिं वि पव्वदसिहरे पंचसाहामिआ दिट्ठा. अवि णाम तेसु एक्कदो सुग्गीवो भवे ?

**अ॰** — किं त्ति ण एक्कोवि तुए सरणीकिदो ?

**सीता.**—कहं एदं संभाविअदि ? जाव खु रक्खसो मं गेण्हिअ पधावो वि अहिअं अहिवदेद.

**लक्ष्मणः**— ( पुरो निर्दिश्य ) इदमेव पंपासरः

**राम, लक्ष्मण**— उत्तम आहे, त्याच मार्गानें जातों. ( असें म्हणून दोघे इकडे तिकडे फिरतात ).

**रावण.**— ( साशंक होऊन ह्मणतो. ) **महापार्श्वा,** ह्या मिथ्या तापसाचें **सुग्रीवा** बरोबर सख्य होईल काय रे ? तुला कसें वाटतें ?

**महापार्श्व**— न जाणों, महाराज, झालें तर होईलही.

**रावण**— ( अवसान ) आणून गर्वानें ह्मणतो ).

## अभंग.

असोत हजारों **सुग्रीव** या लोकीं, हजारों कीं **राम** असोत रे,
बळाचा सागर **वाली** हा हो निका, तराया त्या देवा असमर्थ.

**महा॰**— ( मनांत म्हणतो ) काय बेटा मूर्ख आहे पहा ? असा बालिश राजा असला म्हणजे मग मंत्रिजनांनीं तरीं काय करावें ? या खेळांत आतां सर्व स्पष्ट होईल.

**सीता.**— ( मागील स्मरण करून म्हणते ) राक्षस हा मला गगन मार्गानें धांवत घेऊन जात असतां, कोण्या एका पर्वताच्या शिखरावर पांच वानर बसलेले माझे दृष्टीस पडले. त्यांतलाच **सुग्रीव** हा एक असेल असें वाटतें.

**अनला.**— अगे, मग त्यांतून एकाला तरी रक्षणार्थ मार्थायाचें होतें. तसें का बरें केलें नाहीं ?

**सीता.—अनले,** हें कसें गे घडेल ? मला घेऊन तो राक्षस इतक्या त्वरेनें जात होता कीं वाऱ्यालाही तो मागें टाकी. मग तें कसें बरें साधेल ?

**लक्ष्मण**— ( पुढे पाहून म्हणतो ) **पंपासरोवर** तें हेंच. याच्या समीपभागीं,

अस्योपांते मृगखुर पुटाक्लिष्टमंदारपुष्प

श्चोतन्माध्वीरसशिशिरया, देव, यावः, पदव्या,

वातश्चूतक्रमुकपनसच्छायरुद्धातपायां

यस्यामंतश्चरति मुषितासन्नपुन्नागगंधः. ४८

**दशा०**— रमणीयः खलु पंपातटसमुद्देशः.

**सीता.**— ( सोद्वेगं ) अंणेले इमं पंपातडोद्देसं रमणिज्जं दिट्ठूण अज्ज-उत्तेण किं पडिवण्णंत्ति ण जाणीअदि.

**अ०**— सव्वं पेस्खणए विण्णादं हुविस्सदि.

**रामः**— ( आलोक्य ) अस्यां किल पंपायां

उत्खातार्पितया मृणाललतया तृप्तिं प्रियाया विद-न्मातंगो निजपुष्करेण सलिलं संक्रामयत्यानने.

(विचिंत्य) हा कथं जानकी मामंतरेण स्थास्यति । (इत्यश्रूणि वर्तयति)

**दशा०**— यावल्लंकेश्वरस्य प्रसादं मे राक्षसीभिः सुरक्षिता तिष्ठति.

**सीता**— ( सास्रं ) अंणले अज्जउत्तस्स असंणिहाणेवि मह जीवं-तिए कठिणत्तणं हिअअस्स लस्खुडु एदं

**राम**—( अश्रूणि प्रमृज्य )

हंसानामधिरोहता प्रणयिनीराधूय पक्षच्छदै-

रुद्भ्रांतभ्रमराबुजा कमलिनी कांडावली कंपते. ४९

साक्या.

मंदाराचीं पुष्पें तुडवित हरिणें धांवति फार,
त्यापासुनि माध्वीरस वाहे, तेणें हा पथ गार.
क्रमुकचूतपनसांची[1] छाया, आतपपीडा[2] नाहीं,
पुन्नागाचा[3] गंध घेउनी वारा येथें वाही.
ऐसें पंपेचें तीर, कैसें शोभतसें थोर. ( धृ० ५० )

**रावण.—** पंपासरोवराचें तीर रमणीय तर खरेंच. यांत संशय नाहीं.

**सीता—** ( उद्विग्न होऊन म्हणते ) अगे **अनले, पंपासरोवरा**-चा रमणीय प्रदेश पाहिल्यानें प्राणनाथांला विरहव्यथा होऊन त्यानें, बाई, काय काय केलें असेल तें नकळे.

**अनला—** या खेळांत तें सर्व दृष्टीस पडेल.

**राम—** ह्या पंपासरोवरीं

साकी.

मृणाललतिका उपडुनि देतां प्रिया तृप्तही झाली,
जाणुनि हें निजकरें तन्मुखीं गज हा उदका घाली.
( मनांत चिंतन करून ) हाय हाय ! मजविरहित **जानकी**
कशी राहील रे देवा ! ( असें म्हणून आसवें ढाळितो ).

**रावण—** लंकेश्वराची कृपा आहे तोंवर तिला कांहीं भय नाहीं. राक्षसी तिचें रक्षण करीत आहेत.

**सीता—** ( अश्रू ढाळून म्हणते ) **अनले**, प्राणनाथाचा वियोग झाला तरी मी जिवंत आहें यावरून माझें ह्रदय वज्राप्रमाणें कठिण आहे ही गोष्ट खोटी नाहीं.

**राम—** ( डोळे पुसून म्हणतो ).

साक्या.

निजकांतांसह विहार करितां हंस पक्ष फडफडती,
तेणें कंपित होउनि कमलें भ्रमर उडोनी जाती.

टीप.—१ सुपारी, आंबा, फणस. २ उष्ण. ३ नागचांपा याचीं फुलें.

हा प्रिये जानकि ( इति मूर्छति )

**दशा०**— ( ससंशयं ) मूर्छितोपि किमयं पुनरुत्थास्यति,

उताहो न पुनरुत्थानाय भवेदस्य मूर्छा. १

**सीता**— हद्धी हद्धी एवं वि हिदस्स णिअजणस्स अवत्थं दंसिद

म्हि देव्वहदएण. ( इति सातंका तिष्ठति )

**लक्ष्मण**— आर्य, समाश्वसिहि समाश्वसिहि.

तस्याश्चौरे विदिते, तस्य च नामनि, तथा जयोपाये,

सुकरे शल्योद्धारे, कुतोपि नायं विचारो वा १ ५०

**रामः**— ( समाश्वस्य ) वत्स, कियद्दूरं गतोयमृष्यमूकः १

**लक्ष्मण**—आर्य, कश्चिदयमविदूरे भिक्षुरागच्छति. तमहमेतत्पृच्छामि.

( ततः प्रविशति भिक्षुः )

**भिक्षु**— अहं किल तावदेतौ राजकुमारौ भिक्षुवेषेण प्राप्तोस्मि.

**दशा०**— कथमसौ मत्प्रेरितो वाली भिक्षुरूपेणानयोर्वधार्थमाग-

तो भवेत् १

**सीता.**—अंणले, अच्चाहिदं. १

**अन०**— किंती अहाणे संभंता होसि. १

**सीता.**— णं भिक्खुवेसो रक्खसो जह मं चोरिअ आअदो तह

अज्जउत्तं वि माआए मारिदुं उवट्ठिदो त्ति तक्केमि.

हा प्रिये जानकी, तूं येथें नाहींस, काय करूं गे ? असें म्हणू-
न मूर्छित पडतो ).

रावण— ( संशयित होऊन म्हणतो ) ह्याला आतां तर जबर मूर्छा
आली आहे ही असीच राहील, किंवा पुनश्च हा उठेल बरें ?

सीता—हाय हाय। असी प्राणनाथाची अवस्था मला दुष्टदैवानें
दाखविली ना ? देवा, कसें करूं रे। ( असें म्हणून सचित होऊन
बसते. )

लक्ष्मण— दादा, सावध व्हा, सावध व्हा.

आर्या

चोर कोण, सन्नामहि, तन्नाशाचा उपाय, हीं कळतां,
शल्योद्धरणसुकर मग, तुम्ही ऐसे कशास तळमळतां ?

राम— ( सावध होऊन म्हणतो. ) वत्सा, ऋष्यमूकपर्वत अजून
किती दूर आहे रे ?

लक्ष्मण— दादा, हा कोणी भिक्षु इकडेच येत आहे. त्याला हें
विचारितों.

( तदनंतर भिक्षूच्या वेषानें हनूमान् पडद्याबाहेर येतो. )

हनूमान्— हा भिक्षूचा वेष घेऊन मी या क्षत्रियकुमारांच्या सन्निध
आलों.

रावण— काय ? मी वालीला सुचविलें होतें, त्याप्रमाणें तोच यां-
ना मारण्याकरितां भिक्षूचें रूप घेऊन आला वाटतें.

सीता— अनले, हें मोठें अरिष्ट प्राप्त झालें।

अनला— अगे, असी उगीच कां घाबरतेस ?

सीता—हा भिक्षू नव्हे. तर मला जसा राक्षस चोरून घेऊन
आला, तसाच प्राणनाथालाही मायेच्या योगानें मारून टाकावें
म्हणून हा कोणी राक्षसच आला आहे असें वाटतें.

**अ०**— [*] णं पेक्खणअं खु एदं ता उवरि पेरखम्ह. दाणिं अलं संभमेण.

**लक्ष्मणः**— भगवन्भिक्षो, किं जानासि ऋष्यमूकगिरिं? यत्र च सचिवैश्चतुर्भिः सह सुग्रीवः प्रतिवसति.

**भिक्षुः**— (स्वगतं) कथं वालिना सुग्रीववधार्थं स्वयमप्रवेशमृष्यमूकगिरिं प्रेषिताविमौ इति ससंशयेन स्वामिना निर्द्धारणाय प्रेषितोऽस्मि. अथवा नैतदेवं, यतः प्रसीदत्यंतरात्मा. (प्रकाशं)

कादंबिनीधृतोष्णीषः, ककुभारण्यकंकटः,
ऋष्यमूकगिरीन्द्रोयं, निर्झरिण्यसिवल्लिकः. ५१

कौ पुनर्युवां?

**दशा०**— (स्व०) नैव वाली. (प्र०) महापार्श्व, किं न जानाति द्वयोरन्यतरैकः खरवधमहापातकी, द्वितीयस्तु शूर्पणखामुखविरूपकरणमहापराधीति?

**सीता**— (स्व०) [*] णं एसो भिक्खुरूवो रक्खसो. (प्र०) अणहे, किं इमिणा ण जाणीअदि मंदभाइणिए जाणईए भत्तुणा रूवधरिणी एका अच्छरा, अधवा ताए देवरस्सेत्ति?

**अनला—** अगे, हा नाटकाचा खेळ आहे. खरें म्हटलें म्हणजे हा **राम**ही नव्हे व हा दुसरा राक्षसही नव्हे, हीं सोंगें आहेत. म्हणून यावेळीं घाबरण्याची गरज नाहीं. पुढें काय होतें तें बरीक पाहूं.

**लक्ष्मण—** भगवन् भिक्षो, चौघा मंत्र्यांसहवर्तमान **सुग्रीव** हा ज्यावर राहतो, तो **ऋष्यमूक** पर्वत कोठें आहे, तें तुला ठाऊक आहे काय?

**हनूमान्—** (मनांत म्हणतो) काय? **वाली**स **ऋष्य**मूकावर जाववत नाहीं, म्हणून त्यानेंच **सुग्रीव**वधार्थ या दोघांस पाठविलें कीं काय? स्वामी **सुग्रीव** यासही हाच संशय आल्यावरून त्यानें मला शोध काढण्याकरितां पाठविलें. परंतु माझी मनोदेवता तर प्रसन्न भासते, यावरून हे कोणी शत्रुबुद्धीनें आले आहेत असें वाटत नाहीं. (मोठ्यानें म्हणतो.) **ऋष्य**मूकपर्वत ना? तो हा जवळच आहे. पहा,

### अभंग.

शिरोवेष्टन मेघांचें, अंगीं कवच वनांचें,<br>
निर्झरिणी[1] तरवारी, ऐसा ऊभा वीर गिरी.

परंतु तुम्ही दोघे कोण आहां?

**रावण—** (मनांत) नाहीं हा **वाली** नाहीं. (मोठ्यानें म्हणतो) अरे **महापार्श्वा**, याला ठाऊक नाहीं काय? कीं यांतून एक **खरा**चा वध करून महापातकी झाला आहे व दुसरा **शूर्पण**खेला विरूप करून महापराधी झाला आहे, तेंच हे असें?

**सीता.—** (मनांत म्हणते) हा भिक्षुरूपी राक्षस नव्हे बरें! (मोठ्यानें) अगे **अनले**, या दोघी अप्सरा आहेत. एकीनें मज मंदभागिनीच्या भर्त्याचें रूप घेतलें आहे आणि एकीनें दिराचें रूप घेतलें आहे हें या भिक्षूला ठाऊक नाहीं गे?

---

[1] नद्या.

लक्ष्मणः—

सैष दाशरथी रामो, यस्याहं लक्ष्मणोनुजः

भार्या तस्य च किं ब्रूयां ?—

भिक्षुः— ततःपरं श्रुतवानस्मि; रावणेन हृता सेति.

लक्ष्मणः— सुग्रीवो गतिरत्र नः ५२

भिक्षुः— अहं हनुमान्नाम तस्य सचिवोस्मि. इदानीं दिनकरकुल-प्रदीप, देव, श्रूयतां.

वालिनास्य हृतां भार्यां, हत्वा तं, यदि दास्यसि,

सगणं रावणं हत्वा, सोपि दास्यति ते प्रियां. ५३

यदग्रजस्य राज्ञो दंडचक्रमर्बुदकोटिसहस्रसंख्याकमिष्यते.

दशा०— ( सक्रोधं ) किमुच्यते भिक्षुहतकेन ? क मे चंद्रहासः ?

आदौ भिक्षुमहं हन्यां, हनिष्यामि ततः परं

सुग्रीवमृष्यमूकस्थं समं सैनैश्च मन्त्रिभिः ५४

( विचिंत्य ) कथमस्थाने संरंभः ? ननु क्षत्रियबटुवधाय प्रहिता वाली तत्सुहृदोपि हनिष्यति एव तावत्.

महा०— युक्तमुक्तं स्वामिना.

सीता— ( सहर्षं ) सुसिं लिहं एदं परोप्परं लक्खीअदि.

रामः—अस्त्वेवं, तर्हि ऋष्यमूकमभिगच्छावः (इति सर्वेप निष्क्रामंति)

लक्ष्मण— **श्लोक.**

हा राम पंक्तिरथपुत्र वडील साचा,
सौमित्रि मी अनुज, जाण, असें तयाचा.
याची प्रिया जनकजा, वदुं काय तूतें—

हनूमान्.— पुढचें वर्तमान मी ऐकिलें आहे कीं तिला रावणानें हरून नेलें.

लक्ष्मण— **श्लोक.** ( चतुर्थ चरण ).

सुग्रीव हाच गति जाण अतां अमुतें.

हनूमान्— मी सुग्रीवाचाच सचिव आहें. माझें नांव हनूमान. असो आतां, हे सूर्यवंशप्रदीपा देवा, ऐकावें.

**श्लोक.**

वालीनें हरिली भार्या, देशी मारूनि त्याजला[1],
रावणा मारुनी तोही[2] सीता देईल तुजला.

त्याच्या वडील भावाचें सैन्य ह्मटलें ह्मणजे अर्बुदांच्या हजारों कोटी आहेत.

रावण.— ( क्रोधानें ) हा दुरात्मा भिक्षू काय ह्मणतो रे ? माझा खड्ग कोठें गेला तो ?

**श्लोक.**

आधीं वधीन हा भिक्षू, मग सुग्रीव वानरा
ऋष्यमूकास जावोनी मर्दीं सैन्यासवें त्वरा.

( विचार करून ह्मणतो ) अरे हें काय ? भलत्याच वेळीं मी असा काय वतांवील होतों ! क्षत्रियबटूंना मारण्याकरितां वालीची योजना केली आहे, तर तो त्यांना त्यांच्या मित्रांसुद्धां मारून टाकीलच.

महापार्श्व.— वाहवा ! महाराजांनीं ठीक ह्मटलें.

सीता.— ( हर्ष पावून ह्मणते ) परस्परें समदुःखी मिळून परस्परांच्या बायका आणून द्याव्या हें यांचें खातें बरें जमलें बाई !

राम.— बरें आहे. तर चला आतां ऋष्यमूकाप्रत जाऊं. ( असें बोलून सारे इकडे तिकडे फिरतात ).

---

टीप—१ सुग्रीवाला. २ सुग्रीवही.

**रामः**— किमिदं मार्गनिरोधकमद्रिकूटमिवोन्नतमस्थिकदंबकं दृ-
श्यते. १

**हनु०**—वालिहतविक्षिप्तदुंदुभेरयमस्थिशेषः

**रामः**—तदेनमुदस्यामि गगनाय ( इति क्षेपणं नाटयति )

**लक्ष्मणः**—( साश्चर्यं ) कथमार्यः पादांगुष्ठेन दूरतो दशयोजनमिदम-
स्थिकूटं विक्षिपति !

**हनु०**—( स्व० ) महासत्वोयं राजन्यकुमारः ! ( प्र० ) देव, दोर्भ्या-
माहवावसाने योजनमात्रमुत्क्रामज्जीवितमेतमुदक्षिपद्वीरो वानरेंद्रः.

**रामः**—( पुरोवलोक्य ) कस्य पुनरिमे शरविवरा दृश्यंते शालतरवः १

**हनु०**—वालिन एव.

**लक्ष्मणः** — कथमंगुष्ठनिष्पीडितभूमिभागसमरेखीकृतानेतानेकशरेण
युगपदार्यो विदारयति १

**हनु**—( सहर्षं ) देव, पश्य पश्य सुग्रीवोयमवरजो वालिनः सहैव
मंत्रिजनेन पर्वतशिखरादवतरति. तदहमेवं मन्ये.

पादांगुष्ठविकीर्णदुंदुभितनूकंकालगम्याध्वना,
हेलादारितशालसप्तकशरप्रोताचलक्षोणिना,
आर्येणातिबलेन वालिविजये संभावितप्रत्ययः
सख्यं लब्धुमसावुपैति, भवितुं राजा हरीणामपि. ५५

**दशा०**—( साश्चर्येविंता )

**राम.**—मोठा पर्वतप्राय असा हा कोणाचा अस्थिपंजार वाटेमध्येंच आडवा पडला आहे बरें ! त्यानें सगळा मार्ग रोधून टाकिला आहे.

**हनूमा॰**—वालीनें दुंदुभिनामा राक्षस मारिला, त्याचा हा अस्थि शेष आहे.

**राम.**—तर याला मी आकाशांत उडवून देतों. ( असें ह्मणून उड-विल्या सारिखें करितो ).

**लक्ष्मण.**— ( आश्चर्य पावून ) काय ! दादांनीं हा अस्थिपर्वत नुस-त्या पायाच्या अंगठ्यानेंच चाळीस कोसपर्यंत उडवून दिला कीं !

**हनूमान.**—( मनांत ) हा क्षत्रियकुमार मोठा विलक्षण बलवान् आहे ब्वा ! ( मोठ्यानें ह्म० ) हे देवा, युद्धाच्या अंतीं, जीव जात असतां, वालीनें याला दोहों हातांनीं केवळ चारकोस मात्र फेकून दिलें होतें.

**राम.**—( पुढें पाहून ह्मणतो. ) अरे, हे शालवृक्ष कोणाचे आहेत ? यांना शरविवरेंही पडलीं आहेत.

**हनू॰**— ते वालीचेच आहेत.

**लक्ष्मण.**— काय ! अंगठ्यानें भुईदाबून त्या वृक्षांस समरेखेंत आ-णून एक्याच बाणानें दादांनीं त्यांचा भेद केला.

**हनू॰**—( हर्ष पावून ह्मणतो ) हे देवा, पहा पहा ! वालीचा धाक-टा भाऊ जो **सुग्रीव** तो आपल्या मंत्र्यांसहवर्तमान पर्वतशिख-रावरून खालीं उतरत आहे त्यावरून मला वाटतें—

**श्लोक.**

हाडें तया दुंदुभिराक्षसाचीं अंगुष्ठमात्रें उडवीत साची,
एके शरें सातहि शाल झाडां भेदूनि केला सहजें चुराडा,
हें पाहुनी निश्चितचित्त झाला, कीं **राम** मारील ममाग्रजाला,
**सुग्रीव** येतो कपिराज[1] व्हाया, तसाचि हा[2] सख्य तुझें कराया.

**रावण.**— ( आश्चर्य पावून ह्म० )

टीप.—१ वानरांचा राजा होण्यास. २ सुग्रीव.

पादाग्रकीर्णघनदुंदुभिदानवास्थि-
रेकेषुणा दलितसालतरुप्रपंचः
अर्कात्मजेन हरिणा स्पृहणीयसख्यो,
हंता क्रिमेष न भविष्यति वालिनोपि ! ५६

( विमृश्य )

महर्त्ता च महर्तृणामंतकस्यापि चांतकः,
शिलावर्षी वने वाली जेतुं शक्योस्ति केनचित्. ५७

**सीता.—** [१] दिट्ठिआ अज्जउत्तअस्स सरिसमित्तलाहो तक्कीअदि.

**रामः—** मामसावुपैतु.

( ततः प्रविशति सानुचरः सुग्रीवः )

**सुग्रीवः—** ( उपसृत्य ) आश्चर्यमाश्चर्यम्

याभ्यां भीता वयमिमौ वालिना प्रहिताविति,
तावेव मे सखीकर्तुमानीयेते हनुमता. ५८

**हनु०—** देव, सुग्रीवः प्रणमति.

**रामः—** अपि कुशलं वयस्यस्य ( इत्यालिंगति. )

**सुग्रीवः—** किमतोप्यस्ति मे कुशलं ? यदत्रभवतो वयस्यपदप्रयोग भाजनमभूवं.

**रामः —** सखे किन्न जानासि विश्रवसः सुतं रावणं अपि च तस्य निवासनगरीं वा ?

**दशा०—** किमुत्तरं ददाति सुग्रीवः? ( इति शृणोति )

**सुग्री०—** देव, नाहं किमपि जानामि.

### अभंग.

राक्षसाचा जड अस्थींचा पंजर उडवीला दूर लीलें जेणें,
सप्त सालवृक्ष भेदी एकसरें जो का एक्याशरें क्षणांतची.
सुग्रीवही सख्या ज्याच्या इच्छी करूं,शकेना तो मारूं वाली कैसा?
( विचार करून ह्म० ) अं:

### साकी.

प्रहर्तयाला प्रहार करितां यमाचाहि घे प्राण,
तो वाली रणिं शिला वर्षितां जिंकि तयाला कोण ?

**सीता.**— दैव थोर ह्मणून प्राणनाथाला आपल्या सारिखाच मित्र मिळाला.

**राम.**— तो मजकडेसच येत आहे !

( तदनंतर मंत्र्यासहवर्तमान सुग्रीव पडद्याबाहेर येतो ).

**सुग्रीव.**— ( जवळ येऊन आश्चर्यानें ह्मणतो ).

### श्लोक.

वालीनें धाडिलें ऐसें मानूनी पावलों भया,
आणी हनूमान् त्यांनाची मशीं मैत्री करावया.

**हनू०**—हे देव रामचंद्र, हा सुग्रीव चरणाप्रत वंदन करितो.

**राम.**—मित्रा, कुशळ आहेस कीं ? (असें ह्मणून सुग्रीवास आलिंगन देतो ).

**सुग्रीव.**—परमश्रेष्ठ जो तूं, त्या तुझ्या मुखांतील मित्र या पदाचें प्रयोगास मी पात्र झालों, यापेक्षां आणखी कुशळ तें कोणतें असावें?

**राम.**—सख्या, विश्रव्याचा पुत्र रावण हा कोण ? व त्याचें राहण्याचें नगर कोणतें ? हें तुला ठाऊक आहे काय ?

**रावण.**—( सुग्रीव काय उत्तर देतो तें ऐकण्याकरितां तत्परतेनें कान देतो ).

**सुग्रीव.**—देव, तें मला कांहीं ठाऊक नाहीं.

**महा०**— सुग्रीवोपि न जानाति किं स्थितिं देवस्य ?

**दशा०** —( विहस्य ) श्रूयतां तर्हि सचिवेन.

> वैदेहीमुपरुध्य विभ्रमवने यत्पंचवव्याल्हतां
> प्राणी विस्मरतु स्थितिं मम विदन्नण्यामहेंद्राद्वने,
> इत्याराधनतो मया भगवतो लब्धो वरो धूर्जटे-
> रस्माद्विस्मृतवानतः परिचयेप्येषोनुजो वालिनः. ५९

**सीता**.— ऍसो वि वाणरवहू लंकेसुरप्पउत्तिं ण जाणइ, ता अज्जउत्त-स्स को उण एसोअवणे रस्खसीहिं उवरुद्धं मं कहइस्सदि. ?

**अन०**— कुंदो इदोवरं एरिसी चिंता ? णं सुग्गीवभडजणो एत्थ को वि आगदुअ तुमं दट्ठूण कहइस्सदि.

**सुग्रीवः**—किंतु गगनांगणे केनापि राक्षसेन नीयमानया कयापि राज-कन्यया मम समक्षं निपातितमिदमाभरणगर्भितमुत्तरीयं. ( इ-त्यर्पयति )

**रामः**—( दृष्ट्वा ) तदीयमेवेदमुत्तरीयं ( इति प्रतिगृण्हाति )

**दशा०**—( सावेगं ) इदमविज्ञातं मया त्वरमाणेन, यदिदमुत्तरीयं वि-भ्रंशितवतो.

**सीता**—दिट्ठिआ मए विमुक्कं अज्जउत्तस्स तस्सिं वणे अद्धं पाविदं

**रामः**— ( सहर्षशोकं स्वगतं ) तदीयमेवेदं.

**महापार्श्व.**— सुग्रीवालाही महाराज कोणत्या नगरांत राहतात हें ठाऊक नाहीं ही गोष्ट काय आहे ?

**रावण.**— ( हांसून ) ही मसलत आह्मी निराळीच लढविली आहे, कळलें अमात्यजी ! कसी ती ऐक सांगतों.

### श्लोक.

> **सीते** पंचवटींतुनी हरुनियां नेलें **अशोकीं वनीं,**
> जे प्राणी वसती **महेंद्र** गिरिचे सीमास्थळा पासुनी,
> त्यांतें त्वत्स्थितिविस्मृती पडु असा, **शंभूस** आराधितां,
> झाला तद्वर, यामुळें विसरला हा मत्पुरा जाणतां.

**सीता.**— काय ! हा वानरराजही **लंके**श्वराचें वर्तमान जाणत नाहीं ! तर मग **अशोकवना**मधें राक्षसीचे पाहाऱ्यांत मला ठेविलें आहे हें प्राणनाथास कोण तरी सांगेल ?

**अनला.**— आतां यापुढें ही काळजी करणें कशास पाहिजे ? सुग्रीवाच्या सरदारांपैकीं कोणी तरी येथें येऊन तुझी भेट घेऊन त्याला वर्तमान सांगेल.

**सुग्रीव.**— परंतु कोणी एक राक्षस आकाशमार्गानें एके राजकन्येला घेऊन जात असतां, तिनें मजसमक्ष आंगावरील वस्त्रांत आपलीं भूषणें बांधून तें खालीं टाकून दिलें. तें हें पहा. ( असें ह्मणून **रामा**च्या स्वाधीन करितो ).

**राम.**— होय होय, तिचेंच हें वस्त्र होय. ( असें ह्मणून हातीं घेतो. )

**रावण.**—(दुःखाच्या वेगानें स्व०) अरेरे! माझ्या त्या उड्डाणाच्या वेगानें तिनें शेला केव्हां टाकिला, तें मला समजलेंच नाहीं. काय करावें?

**सीता.**— वनांत असतां प्राणनाथाचें अंगवस्त्र अर्धें फाडून घेतलें होतें, तें यावेळीं म्यां खालीं टाकिलें, हें दैवानें चांगलें झालें.

**राम.**— ( हर्षानें व शोकानें मनांत ह्मणतो ) तेंच हें वस्त्र.

यत्कांताकुचकुंभपत्रमकरीकस्तुरिकालांछितं,

कांतायाः कठिनोन्नतौ तनुतरौ यश्च व्यनक्ति स्तनौ,

यश्चाकर्षति कांतया मयि कृतभ्रूभंगमालोक्यते,

कांता सा च यदंचलेन सहसा मां वीजयत्येकदा.६०

दशा०- बलवती खलु राजसूनोरियमुत्कंठा. ( साश्चर्यं पुनः पुनः प्राणानुन्मीलयति. )

सीता.- ( सोद्वेगं ) मं विणा उत्तरिज्जं मह दट्ठूण कहं अज्जउत्तेण तं अवत्थंतरं तरिदं ?

रामः— दृष्टव्यान्यन्यान्याभरणानि प्रियायाः ( इत्युत्तरीयं विसृज्य सालं पश्यन् स्व० )

हारस्त्वस्याः स्तनकलशयोरंगरागांकितोयं,

तस्या लीलागमनपिशुनौ नूपुरौ नूनमेतौ,

एषा तस्याः कनकरसना, किन्न जाने—

दशा०- ( सहर्षं ) नूनमाभरणावलोकनेन जीवितं त्यजेदेषराजपुत्रः.

सीता.— अज्जउत्तो एव्वं चिंतअंतो आसि त्ति अंगारेसु असिदेसु आघविअं विअ मोहिदं हिअअं.

सुग्री०— ( स्व० ) नतु नूनमेतद्दर्शनेन स्मरति जानकीं अत एव

### श्लोक.

जें कांताकुचकुंभपत्रमकरी[1] कस्तुरिनें लांछिलें[2],
जें दावी कठिनोन्नता तनुतरा वक्षोजमुद्रा भले,
ज्याला दाटुनि ओढितां प्रियतमा रागेंचि पाहे मला,
ज्याला वारुनि घालि ती मजवरी वारा बहू चांगला.

**रावण**—या राजपुत्राची प्रीति बायकोवर कांहीं जबर आहे बोवा. ( आश्चर्य पावून पुनः पुनः उसासे टाकितो. )

**सीता**—( उद्विग्न होऊन ह्मणते ) माझा शेला पाहिल्यावर माझ्या विरहामुळें प्राणनाथाची जी अवस्था झाली असेल, ती त्यानें कशी कंठिली असेल कोण जाणें ?

**राम**—प्रियेचीं दुसरीं भूषणेंही पहावीं. ( असें ह्मणून शेला ठेवून अश्रु आणून पाहतो व मनांत ह्मणतो. )

### श्लोक.

तीचा हारकुचाग्ररागेयुत[3] हा, लीलागती सूचकें
हीं हैमी पदभूषणें, सुख बहू शब्देंचि देती निकें,
तीची ही रशना[4] सुवर्णघटिता,—

**रावण**—( हर्षानें ह्मणतो ) खचित, हीं भूषणें पाहूनच हा राजपुत्र प्राण सोडील यांत संशय नाहीं. वाहवा, ठीक आहे हें !

**सीता**—प्राणनाथ असें चिंतन करीत बसला आहे यामुळें माझें हृदय विंगळांनीं भरलेल्या कुंडांत पडल्याप्रमाणें वेदना पावत आहे.

**सुग्रीव**—( मनांत ह्मणतो ) हीं भूषणें पाहून याला प्रियेची आठवण झाली. ह्मणूनच याचें

---

टीप.—१ कांतेच्या कुचांवर कस्तुरीनें काढलेल्या वेलबुटीनें. २ चिन्हित झालें. ३ स्तनाची उटी तिनें युक्त. ४ मेखला.

स्मरतो जानकीं सख्युः सबाष्पमिदमाननं,

नदीजलकणोपेतं नवोद्भूतमिवांबुजं. ६१

( प्र० ) सखे, कृतमश्रुपातेन. लप्स्यते जानकी

रामः— ( सानुस्मरणं स्वगतं )

कदाचित्

पाणिभ्यां न फलति कलहः कर्षणक्षेपयोर्या. ६२

( प्र० ) सौमित्रे, धारय मां ( इति मूर्छति. )

दशा०— किमतःपरं ? एतदंतं खल्वस्य जीवितं. ( इतिसहर्षमु त्तिष्ठति )

महा०— प्रेक्षणकमेतत्. ( इति निवारयति )

सीता- एदस्स अज्जउत्तव्वावारस्स परिण्णाणेण तं तं अवत्थं सुम रिअ कोवि मे अत्थि विआरो. किं करिस्सं. ( इति मूर्छति )

अ०— हला, समस्ससिहि समस्ससिहि.

लक्ष्म०— आर्य, समाश्वसिहि समाश्वसिहि.

रामः— ( समाश्वस्य ) सुग्रीव, यदि सख्यमिच्छसि, प्रसारितोयं पाणिः.

सुग्री०— ( सहर्षं पाणिना तमभिमृशति. )

( नेपथ्ये )

सीतेचें स्मरणें तोंड बाष्पयुक्त कसें दिसे ।
नदीजलकणीं युक्त नूतनांबुज कीं जसें.

( मोठ्यानें ह्मणतो ) सख्या, अश्रू आणणें पुरे कर. **जानकी** प्राप्त होईल, त्याबद्दल अगदीं चिंता करूं नको.

**राम**— ( मागील स्मरण करून बाकीचा श्लोक मनांत ह्मणतो. )

जीला[1] धरोनी करें
ओढाताण अह्मी करूं उभयतां अंतःपुरीं आदरें.

( मोठ्यानें ह्मणतो ) **लक्ष्मणा**, पडलों रे पडलों, धर लौकर । ( असें म्हणून मूर्छित पडतो ).

**रावण**— अँः, आतां याउपर हा कोठून वांचतो ?. येथपर्यंतच काय तें याचें जीवित । आतां येथें कशास बसावें ? ( असें म्हणून हर्षानें उठण्यास लागतो ).

**महापार्श्व**— महाराज, हें नाटक आहे, हें खरें नव्हे. ( असें म्हणून त्याचें निवारण करितो. )

**सीता**— प्राणनाथाची अशी अवस्था पाहून व त्या त्या मागील गोष्टींचें स्मरण होऊन माझ्या मनाला कांहीं विलक्षण विकार उत्पन्न होतो बाई, तो सांगतांही येत नाहीं. काय करूं गे । ( असें म्हणून मूर्छित होतें ).

**अनला**— अगे सीते, सावध हो, सावध हो.

**लक्ष्मण**— दादा, सावध व्हा, सावध व्हा.

**राम**— ( सावध होऊन म्हणतो ) **सुग्रीवा**, सख्य करण्याची इच्छा असली तर हा मी आपला हात पुढें केला.

**सुग्रीव**— ( आपल्या हातानें त्याचा हात धरितो ).

( इतक्यांत पडद्यापलीकडे **वाली** बोलतो ).

---

टीप— १ ज्या रशनेला.

सख्युर्मे दशकंधरस्य समरे येन क्षता ज्ञातयः,

सुग्रीवेण विरोधिना मम समं सख्यं विधत्ते च यः,

तस्यैतस्य विनिग्रहाय महती हस्ते शिलेयं धृता,

यल्लक्षीकृतिरस्य भार्गवजितुः कीर्तिं समं कृंतति. ६३

सुग्री०— कथमेवं ब्रवीतीति ? स्वयमेवागतो वाली.

हनूमा०— ( स्व० ) अहो प्रमादः सुग्रीवस्य, यद्वालिनो दुष्प्रवेश मृष्यमूकशिखरं परित्यजन्निह वनांतरे समागतः ।

भवतु. रामसन्निधानमेतस्याभयंकरं.

रामः– ( सहर्षं ) कथमेतस्य कंठीरवस्येव ध्वनिः !

लक्ष्म०— ( सकोपं ) अरे रे मर्कट, त्वल्लक्षीकृतिरस्माकमेव कीर्तिं निकृंतति. अपिच

भ्राता मे भरतः प्रशास्ति वसुधां तेनाप्रमादेधितः,

प्रस्थाने यदि दुष्टवर्त्तिनि विपिने वध्यस्त्वमासादिति,

पापस्त्वं रमसे चिराय रुमया यद्भ्रातृदारैः समं,

दंडयस्तत्किमनेन ? नास्ति भुवने गोप्तापि, किं मोक्ष्यसे ? ६४

दशा०— कथं रामसमापनार्थं महाबलो वाली संप्राप्तः ?

सफलं खलु ममेदानीमाराधनं ताराश्मणचूडामणेः,

कथमसौ वालिने दंडयं मन्यते विमूढमनाः सौमित्रिः ।

**श्लोक.**

माझा मित्र **दशास्य**, आप्त वधिले त्याचे जयानें रणीं,
तो माझा रिपु सूर्यपुत्र[1] सखिता त्याशींहि केली वनीं,
मारायास तयास ही दृढशिला घेवोनि आलो, पहा,
जीचा घायचि **जामदग्न्यरिपुच्या** कीर्तीस हर्ता. अहा !

**सुग्रीव**— काय ? ही गर्जना ऐकूं येते, त्यापेक्षां **वाली**च स्वतां आला वाटतें ?

**हनूमान्**— ( मनांत म्हणतो ) अरेरे ! **वाली**चा प्रवेश जेथें व्हावयाचा नाहीं अशा त्या **ऋष्यमूक** पर्वताचें शिखर सोडून **सुग्रीव** या वनांत आला, ही गोष्ट त्याजपासून चुकली ! बरें असो, आतां **रामचंद्र** जवळच आहे, त्यापेक्षां त्याला कांहीं भय नाहीं.

**राम**— ( हर्ष पावून ह्मणतो ) वाहवा ! या वीराचा स्वर तर सिंहाप्रमाणें गंभीर आहे !

**लक्ष्मण**— ( क्रोधयुक्त होऊन म्हणतो ) अरे माकडा, तूं शिला मारून आमची कीर्त्ति भग्न करणार काय रे ? तुला माकडाला मारिलें असतां आमची बरीक अपकीर्त्ति आहे. दुसरें,

**श्लोक.**

मद्भ्राता **भरत** प्रशासन करी पृथ्वीस, त्यानें द्यें,
दुष्टांना विपिनीं वधा ह्मणुनियां केली विनंती स्वयें,
तूं पापी निजबंधुदाररत, रे शिक्षा तुला योग्य हो,
कैसा सोडिल तो तुला अजि अतां, जो पाळितो ही मही.

**रावण**.— काय ! **रामा**ची समाप्ति करून टाकण्याकरितां, महाबलाढ्य जो **वाली**, तोच प्राप्त झाला की ! त्यापेक्षां चंद्रचूड भगवान **शंकर** याचें जें मी आराधन केलें, तें आज सफळ झालें ! हा मूर्ख **लक्ष्मण** याला दंडनीय असें मानितो काय !

---

टीप— १ सुग्रीव.

**सीता.**— कँहं अज्जउतामरिसेण पवंगराओ संवुत्तो वछेण लस्खणेण निभ्भछिअ धीरत्तणववुभ गंभीरमुहुरं एसो आलविदो !

( पुनर्नेपथ्ये ) हंत हंत, किमुक्तमनेन शूर्पणखामुखविरूपकरणशूरमानिना सुमित्रासूनुना ?

अयं घुणाक्षरन्यायो यद्विराधो हतोमुना,
शक्तिरस्यास्ति चेद्योद्धुं, दर्शयत्वेष तामपि. ६५

अथवा तिष्ठत्वयमकृतप्रतिज्ञः. भो भो रघुकुमार,

शश्वत्ते हृदयं तप्तं जानकीविरहाग्निना,
विध्येदियं मम शिला वेगव्याकीर्णशोणितं. ६६

**कुशा**०— युक्तमिदमुक्तमिवसूनुना.

**सीता.**- (सातंकं) हंलो अणले, कहं हुविस्सदि त्ति वेवइ मे हिअअं!

**अन**०— रहुवीरो जेवेणं परिभविस्सदि.

**रामः**- तर्हि संप्रहारोचितस्त्वयमुद्देशः प्रविश्यते. ( इति निष्क्रांतः )

( नेपथ्ये )

हा हदम्हि मंदभाइणी ! सिलाए पावणादो पुव्वं एव्व सिध्धहत्थेण रहुकुमारेण एकोदण्णीकरभीसणो सरो विमुक्को, जो मह णाहस्स पाणं गण्हिअ गओ त्ति सुणीअदि.

**सीता.—** काय! हा वानरराज **वाली** प्राणनाथावर क्रोधयुक्त हो- ऊन प्राप्त झाला. त्याची **लक्ष्मण** भाऊजींनीं निर्भर्त्सना **करून** त्याशीं धीरपणें गंभीर व मधुर असें योग्य भाषण केलें.

(पुनः पडद्याच्या आंतून **वाली** बोलतो) अरे, **शूर्पणखे-** चें मुख विरूप करून टाकिलें एवढ्याच कारणावरून आपल्या- ला मोठा थोर ह्मणविणारा सुमित्रापुत्र काय बडबडतो रे!

**श्लोक.**

न्यायानें[1] काकतालाच्या **विराधा** वधिलें वनीं
शक्ति याला असे युद्धीं दाखवावी तरी रणीं.

अथवा शत्रुवधाची प्रतिज्ञा कांहीं यानें केली नाहीं. तेव्हां हा अ- सो. ( **रामाप्रत** ह्मणतो ) अरे **रघुकुमारा रामा,**

**श्लोक.**

तप्त झालें त्वदूत्हृदय **जानकी** विरहानलें,
शिळेनें फोडुनी त्याला काढितों रक्त त्यांतलें.

**रावण.— इंद्रपुत्र वाली** यानें हें बरोबर भाषण केलें.

**सीता.—**( व्यग्र होऊन म्हणते ) **अनले,** आतां कसें होईल गे? माझें हृदय तर थरथर कांपतें बाई!

**अनला.—**भिऊं नको, **रघुवीरच** त्याचा पराभव करून टाकील. तूं पहा तर खरी!

**राम.—** युद्ध करण्याजोगें स्थळ तें पलीकडे आहे. तर आतां त्या स्थळीं जातों. (असें म्हणून निघून जातो).

पडद्याच्या पलीकडे **तारा** ( **वालिस्त्री** ) शोक करिते ) अगे हाय हाय! मज मंदभागिनीचा घात झाला कीं! शिला फेंकून मारणार तों पूर्वींच, युद्धकुशल जो **राम** त्यानें भुजंगासारिखा भयंकर असा एक बाण सोडिला, तो माझ्या पतीचा प्राण घेऊन गेला असें सांगतात. तर आतां काय करूं गे! )

---

टीप—१ काकतालीय न्यायानें.

सुग्री०- कथं हतो वाली ? अतएवाकर्णितवालिवधा गृहान्निर्गता विलपति तारा. सौमित्रे, तदहं सपरिवारो रामपादोपजीवनाय गच्छामि. ( सपरिवारो निष्क्रांतः )

दशा०- कथं वाली रामेण हतः ? किमिदं विश्वसनीयं ? नहि सलिलेन धार्यते पाषाणः.

( नेपथ्ये )

खेलद्वेलाब्जमालं शकलितरणकद्दुंदुभिक्रूरशृंगं,
कक्षक्षिप्तरक्षःपतिविधुतशिरःपातघातक्षमार्तं,
ताराक्षोजहारान्तहृतघुसृणरसं वालिना बाहुमध्यं
विध्यन्बाणो विवध्याम्मम शुभमनिशं रामतूणीरधामा. ६७

महा०- राजन्वालिवधजनितसमग्रहर्षस्य सुग्रीवस्य शुभसंभावनबोधकं वचनमेतत्.

दशा०-( सक्रोधमुत्थाय ) नन्वहमाहवविमर्दनिर्दयनिर्जूतदिक्पालकगणो रावणः तदासामसंभावितार्थमभिनयंतीनामाप्सरसां केशान्लुंचयामि.

महापा०—( अंजलिं बध्वा ) प्रसीद, महाराज, प्रसीद. नन्विदमुशनसा भगवता खलु निबद्धं प्रेक्षणकं. तमन्वानृता कथाप्रवृत्तिः.

**सुग्रीव**.—काय? **वाली** मारिला वाटतें? म्हणूनच हें त्याच्या वधाचें वर्तमान ऐकून ही त्याची स्त्री **तारा** विलाप करीतच घरांतून बाहेर निघाली. तर **लक्ष्मणा**, मी आतां **रामा**च्या पादसेवनार्थ परिवारासुद्धां जातों. ( असें म्हणून सपरिवार निघून जातो. )

**रावण**.—काय? **वाली** देखील **रामा**नें मारिला? या गोष्टीवर कसा भरवसा ठेवावा? पाषाण कोठें पाण्यावर तरतांना ऐकले आहेत!

( पडद्याच्या पलीकडे **सुग्रीव** बोलतो. )

**श्लोक.**

जेथें पंकजमाळ शोभत असे, तें दुंदुभीचें महा
शृंग स्पर्शहि लागतां झडकरी मोडोनि गेलें पहा,
कक्षाक्षिप्तदशास्यदीर्घपदजा[1] घायांस सोसी कसें,
**तारे**च्या कुचहार लागुनिच जें स्नेहार्द्र झालें असे,
अशा त्या **वालि**हृदया जेणें भेदुनि टाकिलें,
तो **राम**बाण अनिश अस्मत्क्षेम[2] करो भलें.

**महापार्श्व**—महाराज, **वाली**चा वध झाल्यामुळें सुग्रीवाला मोठा हर्ष होऊन तो असी शुभसूचक प्रार्थना करीत आहे.

**रावण**.—( क्रोधानें उठून म्हणतो ) अरे, दिक्पतींना देखील ज्याणें रणांगणांत निर्दयपणें झोडून टाकिलें, तो हा मी **रावण** आहें बरें! ह्या अप्सरा रांडा असंभावित गोष्टीचा खेळ करून दाखवितात म्हणून यांचे मी आतां केसच उपटून टाकितो पहा!

**महा०**.—( हात जोडून म्हणतो ) महाराज, कृपा करावी. परमपूज्य जे **शुक्राचार्य**, त्यांनीं हें नाटक रचिलें आहे. यांत असत्यकथा कदापि यावयाची नाहीं, असें निश्चयें समजावें.

---

टीप—१ खाकेंत मारलेला जो रावण त्याच्या पायांचें जे घाय त्यांस.
२ आमचें कल्याण.

दशा०— ( स्व० ) अतः सत्यमेवेदं ( प्र० सकरुणं ) हा मम प्रियसख, हा दुंदुभिदानवसमरसंदर्शितबाहुविक्रम, हा हरिकुलचक्रवर्तिन्.

हते विराधेपि, हते खरेऽपि स्थिता जयाशा त्वयि भूयसी मे,
वाली स एव त्वमभूस्तथा चेल्लंकाजनस्यायमभाग्यभूमा. ६८

लक्ष्मण:— कथमार्यो वालिनं विजित्य संप्राप्तः !

( ततः प्रविशति रामः )

रामः— ( उपसृत्य ) लक्ष्मण, सपरिवार एष सुग्रीवो राज्याभिषेकाय प्रवेशयितव्यः किष्किंधायां, यौवराज्यायांगदश्च.

लक्ष्म०— दीनजनानुकंपी खल्वार्यः.

सीता०— एवं णेदं, ण मं दीणेत्ति जाणाइ अज्जउत्तो.

अ०— हला, किं भणासि ? किं णिमित्तं दुक्करो रणभीसणस्स वालिणो वहो इमिणा किदो ?

( नेपथ्ये )

राज्यं प्राप्य रघूद्वहान्मघवतः सूनोर्हतस्याहवे
सुग्रीवेण नियोजिता हरिचमूरन्वेषितुं जानकीं.

**रावण**—( मनांत ह्मणतो ) मग ही गोष्ट खरीच आहे तर ? ( मोठ्यानें करुणास्वरेंकरून बोलतो. ) हा माझ्या प्रियसख्या, हा दुंदुभिदानवाला समरांगणीं बहुपराक्रम दाखविणाऱ्या, हा वानरकुलचक्रवर्तिन्.

**श्लोक.**

समरिं जरि **विराधा** मारिलें त्या **खर**ाही,
तुजवरिच जयाशा माझि रे होति, बा, ही,
अवचित जरि तूंही मृत्युतें पावलासी,
खचित विधिच झाला शत्रु **लंका**पुरासी.

**लक्ष्मण**— काय ? **वाली**ला मारून दादा परत आले ?

( तदनंतर **राम** पडद्याच्या बाहेर येतो ).

**राम**— ( लक्ष्मणाच्या जवळ येऊन म्हणतो ) वत्सा **लक्ष्मणा**, या **सुग्रीवा**ला राज्याभिषेक करणें आहे, व **अंगदा**ला यौवराज्य देणें आहे, यास्तव या उभयतांना परिवारासुद्धां **किष्किंधा** नगरींत घेऊन जावें.

**लक्ष्मण**— खरेंच ! दीनजनाविषयीं दादा फार दयाळू आहेत.

**सीता**— असें आहे, तर प्राणनाथ मला दीन असें समजत नाहींत, असें वाटतें ?

**अनला**— अगे, असें कसें ह्मणतेस ? युद्धाविषयीं मोठा भयंकर जो **वाली**, त्यालाही जें मारिलें तें कोणाकरितां बरें ?

( इतक्यांत पडद्याच्या पलीकडे **शुक** व **शार्दूल** हे दोघे बोलतात ).

**श्लोक.** ( पूर्वार्ध )

**वाली** मारुनि राज्य **राम**विभुनें सूर्यात्मजाला[1] दिलें,
त्यानें भूतनयेस[2] वानरभटां[3] शोधावया धाडिलें,

---

टीप— १ सुग्रीवास. २ सीतेस. ३ वानरयोध्यांस.

**राम**ः- प्रियं नः ( उपसृत्य ) वत्सलक्ष्मण, यावज्जानकीप्रत्युपलंभमस्मिन्प्रस्रवणगिरौ स्थास्यामः ( इति निष्क्रांतौ. )

**दशा०**— ( विचिंत्य ) किमत्र प्रतिविधातव्यमस्माभिः ?

**सीता.**— ( सहर्षं ) अंणले, सच्चवअणा खु तुमं.

( पुनर्नेपथ्ये )

सखे शुक, किन्न पश्यसि ?

तस्मादेव जटायुरग्रजगिरा विज्ञाय सीतास्थितिं
लंकाकौतुकदर्शनेन हनुमानंभोधिमुल्लंघते. ६९

( पुनर्नेपथ्ये ) सखे शार्दूल, यथादृष्टं लंकेश्वराय निवेदयितुं गच्छामः

**दशा०**— कथमस्मत्प्रहितयोः शुकशार्दूलयोरयं संलापः ? अहो, मया रामं प्रति चारप्रेषणमपि विस्मृतं । ( सविमर्शं )

जानकीकृतकामस्य रामस्यांतरन्वहं
मंत्रिणां किमुपायोयं मम कार्यान्वेषणे ? ७०

**महा०**-( सस्मितं ) महाराज, प्रेक्षणकमेतदर्थमेव प्रदर्शितं.

**राम**—ठीक, यांत आमचें हितच आहे. तर बासा **लक्ष्मणा**, जानकीचा शोध लागेपर्यंत आतां या **प्रस्रवण** पर्वतावरच आपण कालक्षेप करून राहूं. ( असें बोलून दोघे निघून जातात ).

**रावण**—( चिंतन करून ) तर आतां आपण यावर प्रतीकारार्थ कोणती मसलत योजावी ?

**सीता**—( हर्षित होऊन ) **अनले**, तूं सत्यवचनी खरी ? तुझ्या म्हणल्याप्रमाणेंच झालें !

( पुनः पडद्यापलीकडे **शार्दूल** बोलतो ).

सख्या **शुका**, पाहत नाहींस काय ?

**श्लोक.** ( उत्तरार्ध )

संपातीवचनावरूनि कळली **सीता**निवासस्थली,
अब्धी लंघुनि हा अजीच **हनुमान् लंके**स येतो बली.

( पडद्यापलीकडे **शुक** बोलतो. ) सख्या **शार्दूला**, आपण जें काय पाहिलें तें जाऊन महाराज **लंकेश्वर** यांप्रत निवेदन करूं.

**रावण**— काय ! **शुक** व **शार्दूल** या दोघांस मी पाठविलें होतें तेच हें असें बोलत आहेत ! अहो काय सांगावें ? **रामा**कडे हेर पाठविले होते त्यांचें देखील मला स्मरण राहिलें नाहीं ! आणखी असें वाटतें.

**श्लोक.**

**सीता**कामें सदा गेहाभ्यंतरीं निजलों बरा.
प्रबुद्ध[1] त्यां[2] करायास मंन्युपायचि हा खरा.

**महापार्श्व**— ( किंचित हांसून म्हणतो ) महाराज, नाटक जें दाखविलें तें येवढ्याकरितांच दाखविलें.

---

टीप— १ जागें, २ त्या मला.

**सीता.**— ( सहर्षातिशयं ) हंलो अणले, अम्हे वि असोअवणिअं एव्व गच्छम्ह; जं हणुमंतेण समुद्दो लंघिज्जदि त्ति सुणीअदि.

( इति निष्क्रांते. )

**दशा.**— तर्हि, महापार्श्व, परितः किंकराननुशास्मि,

प्रायः शोषयत प्लवंगमचमूमार्गे फलग्राहिणो
वृक्षान्रोपितकंटकैर्वितनुत प्राकारमभ्रंलिहं,
लंकां वृत्य तथा वितन्वथ यथा नेमां हनूमान्विशेद्
यत्पथ्यं मम सांप्रतं तदहमप्यालोचये मंत्रिभिः ७१

( इति महापार्श्वेन सह निष्क्रांतः )

इति जानकीपरिणये षष्ठोऽकः.

**सीता**— ( अतिशय हर्ष पावून म्हणते ) अगे अनले, **हनूमान्** समुद्रलंघन करून येत आहे असें म्हणतात, तर आतां आपण-ही **अशोकवना**प्रतच जाऊं, चला. ( असे बोलून दोघी निघून जातात ).

**रावण**— **महापार्श्व**, तर आतां सेवकांस ही माझी आज्ञा कळ-वून ताकीद द्यावी, की

**ओंव्या.**

वानरसैन्य आतां येइल, तें फळें खाउनी निर्वाह करील,<br>
ह्मणोनि फळझाडें मार्गीतिल शुष्क करोनि द्याकार्वी.<br>
नगरा भोंवतील तट, त्यास लोहकंटक उद्भट<br>
लावोनियां घनदाट, आकाशचुंबी उंच करा.<br>
**हनूमान्** प्रवेशेना लंकेंत, ऐसा ठेवा बंदोबस्त,<br>
मीही मंत्र्यां समवेत, बैसोनि हित विचारितों.

( असें बोलून **महापार्श्वा**सह निघून जातो. )

**साहावा अंक समाप्त.**

( ततः प्रविशति शूर्पणखा ).

**शूर्पणखा.**— ( सशोकं सोरस्ताडनं च ) हा अज्ज दहसग्गीव, अज्ज कुंभकण्ण, वत्स मेहणाअ, कहिं गदा तुम्हे । ( सावेगं ) हा अतिआअ, तिशिर, देवंतअ, णरंतअ, कुंभणिउंभ, वच्छा. तुम्हे वि अक्खकुमारेण सह कहासेसा संवुत्ता। किंकरम्हि मंदभाइणी? जं इमिणा अज्ज सोएण पुव्वं हणुम्मंतवालग्गसंकमिदेण अग्गिणा विअ लंकाउरघरणिउरंबं दुज्झइ मे हिअअं.

# जानकीपरिणय नाटक.

## अंक ७.

### पात्रें.

| | |
|---|---|
| शूर्पणखा, राक्षसी | रावणाची बहीण. |
| संपाति | बिभीषणाचा मंत्री. |
| भरतशत्रुघ्न | रामचंद्राचे बंधु. |
| जनकराजा | सीतेचा बाप. |
| हनुमान् वानर | सुग्रीवाचा मंत्री. |
| रामचंद्र | अयोध्येचा राजा. |
| लक्ष्मण | रामचंद्राचा बंधु. |
| सीता | रामचंद्राची स्त्री. |
| कौशिक | एक ऋषि. |
| वसिष्ठ | एक ऋषि ( रामचंद्राचा कुलोपाध्याय. ) |

( तदनंतर शूर्पणखा राक्षसी पडद्याबाहेर येते. )

**शूर्पणखा**—(शोकानें ऊर बडवून बोलते) हा **रावणदादा**, हा **कुंभकर्णदादा**, हा वत्सा **मेघनादा**, तुह्मी कोठें गेलां रे? (दुःखाच्या आवेशानें ) अरे **अतिकाया**, अरे **त्रिशिऱ्या**, **देवांतका**, अरे **नरांतका**, अरे **कुंभा**, अरे **निकुंभा**, वत्सांनो, **अक्षकुमारासह** वर्तमान तुह्मींही मरण पावलां कीं रे। मी मंदभागिनीनें आतां कसें करावें? मागें हनुमंताच्या पुच्छाग्रीं अग्नि पेटून त्यानें जसी लंकापुरी-

( सरोषं ) ता दाणिं ताणं रक्खसकुलकालरत्तीणं राअउत्ताणं अहं इत्थिआ वि जहासत्ति पडिआरं करिस्सं. ( पुरतोवलोक्य ) कहं एत्थ पुप्फअविमाणं आणअंतो कुमार बिभीसरस्स अमच्चो संपादी सुग्गीवशिबिरं पच्चिट्ठइ. इमिणा खु वच्चविभीषणस्स परक्खवव्वसाअं संपादअंतेण विणासिदा लंकाउरी. ण रक्खु वच्च विभीषणरज्जलहेण मह संतोसो, जं एसो रक्खकुलविरुद्धकज्जं णिच्चं आअरइ.

( ततः प्रविशति संपातिः )

संपा०— ( साश्चर्यं )

> किं ब्रूमो भुजविक्रमं रघुपतेर्यः सेतुमंभोनिधौ
> बध्वा तेन यथोपगत्य च, दशग्रीवं युधिन्यग्रहीत्.
> किं ब्रूमः शरणागताय करुणां, संश्रुत्य यो दत्तवान्-
> स्संप्राप्ताय बिभीषणाय परमां लंकाधिराज्यश्रियं । १

( पार्श्वतो दूरे दृष्ट्वा ) कथमियं शूर्पणखा १ व्याकुलेव दृश्यते १ नूनमस्याः क्रूरायाः धर्मात्मनः कुमारबिभीषणस्य लंकाप्राप्तिरनभिमता, तत एवमियं स्यात्. भवतु, पृच्छामि.

तील घरें जाळून टाकिलीं, त्याप्रमाणें ह्या शोकाग्नीनें माझें हृदय पेटून राहिलें आहे. हायहाय ! कसें करूं गे आतां ! (क्रोधानें) तर आतां आमच्या राक्षसकुलास केवळ काळरात्रीरूपच असे जे राजपुत्र त्यांचा, मी बायको माणूस आहे तरीं, यथाशक्ति सूड घेईन. काय चिंता आहे ? ( पुढें पाहून ) काय ? हा कुमार बिभीषणाचा मंत्री **संपाति पुष्पकविमान** बरोबर घेऊन सुग्रीवाच्या डेऱ्याकडेस जात आहे. यानेंच **बिभीषण** व **रावणदादा** यांच्यामध्यें दुफळी पाडून **लंकापुरीचा** नाश करून टाकिला. आतां **बिभीषणाला** राज्य प्राप्त झालें, यांत माझा संतोष नाहीं; कांकीं तो सदासर्वकाळ आमच्या राक्षसकुलास विरुद्ध असें आचरण करितो.

( तदनंतर **संपाति** पडद्याच्या बाहेर येतो ).

**संपाति.**— ( आश्चर्यानें ह्मणतो )

## श्लोक.

वर्णूं शके न **कवि वाल्मिकिचीहि** वाचा[1],
तो वर्णु मी किति पराक्रम **राघवाचा**,
अब्धींत सेतु करुनी उपलव्रजाचा[2],
येवोनि येथ वधिला पति राक्षसांचा.
आला **बिभीषण** जईं शरण प्रभूला,
तो दीनबंधु **रघुनाथ** दयार्द्र झाला,
केला प्रसाद पळ एक न लागतांही,
**लंकाधिराज्य** दिधलें, किति योग्यता ही !

( दूर दृष्टि देऊन बाजूस पाहतो आणि म्हणतो ) काय ! ही **शूर्पणखा** व्याकुळ झाल्या सारिखी दिसते. ही मोठी दुष्ट आहे म्हणून, धर्मात्मा जो कुमार **बिभीषण** याला राज्य प्राप्त झालें

टीप— १ वाणी. २ पाषाणांच्या समुदायानें.

अयि शूर्पणखे, दुर्मनायमाना दृश्यसे.

**शूर्प०**— ( स्व० ) णिहिलेसु अम्हकेसु जणेसु हदेसु कीस तुमं जीवसित्ति. ( प्र० ) लंकेसुरविजइणं णाहं पेसिखदुं आणदाए पत्थिदाए जाणईए अहिमुहं अगदा अहंत्ति वेत्तिअजणेण दूरदो विग्गेत्ति अवमाणिदह्मि.

**संपा०**— ननु त्वं यतो विशसि अत एवापनीता. एवं खलु निमित्तविद आचक्षते, प्रतिष्ठमानस्याभिमुखं विगतनासिकामुखदर्शनं भाविनः क्लेशस्य सूचकमिति. ततो न्यायागतेऽर्थे कुतस्ते दौर्मनस्यं ? अतएवानुभूतेन दर्शनमात्रेण तव सापि जानकी चकोरीव चन्द्रमसं चिराय तावं द्रष्टुकामापि दर्शनसमये तेन महता रामेण परुषमुक्ता, प्रविष्टा च हुताशनं भगवता तेन परिशुद्धेयमिति प्रतिपादिता च श्रीमते तस्मै.

**शूर्प०**— होदु. किं दाणिं कादुमिछइ रामदेओ ?

**संपा०** किमन्यत् ?

हें हिला आवडलें नसेल, यामुळें ही असी खिन्न झाली असें वाट तें. असो, विचारावें तर खरें. ( शूर्पणखेस म्हणतो ) अगे **शूर्पणखे**, असी खिन्न कां बरें दिसतेस ?

**शूर्पणखा.**—( मनांत म्हणते ) माझे अवघे आप्तजन मरण पावले असतां तूंच मेल्या जिवंत राहिलास म्हणून. ( मोठ्यानें म्हणते ) **लंके**श्वराला जिकणारा जो आपला भर्ता, त्याच्या दर्शनार्थ म्हणून **जानकी** निघाली असतां तिच्यापुढें मी गेलें तेव्हां "सरकारका दर्सन लेनेकेवास्ते बाई साबूकी सवारी निकली है, इसवखत तूं कोन क्यों आगे आती है। निकल यांसे, निकल जल्दी." असें म्हणून चोबदार यांनीं अपमान करून काढून दिलें.

**संपाति.**—अगे तुला नाक नाहीं म्हणून एकीकडेस व्हायास सांगितलें. शकुनजाणणारे जे आहेत, त्यांचें म्हणणें असें आहे कीं कोणी प्रयाण करूं लागलें असतां, ज्याला नाक नाहीं अशाचें दर्शन झालें तर पुढें कांहीं तरी क्लेश प्राप्त होईल असें समजावें. यावरून त्यांनीं तुला एकीकडे व्हायास सांगितलें, ही गोष्ट बाजवीच केली. असें असतां तुला खेद कां बरें झाला ? लांब कशाला ? येथेंच पहा. फार दिवस पतीची भेट झाली नाहीं म्हणून, चंद्राच्या दर्शनाविषयीं जसी चकोरी उत्कंठित होते, तसी **जानकी** उत्कंठित होऊन, **राम**चंद्राच्या सन्निध गेली. तों **राम**चंद्रानें तिला प्रथमदर्शनींच म्हटलें कीं " तूं शुद्ध राहिली आहेस असें आम्ही कशावरून समजावें" ? असें निष्ठुर भाषण ऐकतांच **जान**कीनें अग्नींत उडी टाकिली, तेव्हां अग्निनारायणानें ही शुद्ध आहे बरें असें सांगून **राम**चंद्राप्रत आणून दिली. असा हा तुझ्या दर्शनाचा तत्काळ अनुभव आला !

**शूर्पणखा.**— बरें असो, पण आतां **रामचंद्र** पुढें काय करणार ?

**संपाति.**— दुसरें काय ?

पौलस्त्यं युधि केसरीव करिणं भुक्त्वान्वितः सीतया
काञ्चन्येव विभूषया हुतवहस्वच्छीकृतस्वात्मना ,—

शूर्प०— ( स्व० ) तस्स ता अणुऊलो दाणिं विही, दसकंठस्स उ॰ ण पडिउलो त्ति, किं कादव्वं मए ?

संपा०—

वाहिन्या युधि पुष्पकेण नगरीं वाञ्छत्युपैतुं निजां,
संदेशं भरताय हारयति च ह्यञ्जनीसूनुना. २

( इत्युक्त्वा निष्क्रांतः )

शू०- ( सविमर्शं ) जाव हणूमंतो भरदस्स संदेसं ण हरेदि, तदो पुढमं जेव्व तापसीवेसं करिअ तस्स अप्पिअं किंपि कहिस्सं सो भरदो साणूओ जं सुणिअ सरीरं विसज्जइस्सदि. तेण रामेण किदस्स महभाउणं दुव्वेणं वहस्स पडिआरो भविस्सदि. ( इति निष्क्रांता )

( मिश्रविष्कंभकः )

( ततः प्रविशति शत्रुघ्नेनानुगम्यमानो भरतः )

भरतः— वत्स, शत्रुघ्न,

संभावय क्षितिभुजा विविधोपचारैः
सौवीरमद्रमगधवङ्गाधिपादीन्,
संधीभवंति मम ये वचसा पुरेऽस्मिन्
कन्यावमुन्मथितुमार्यकलत्रचौरं. ३

आर्या.

सिंहानें करिवरसा रामानें रावण प्रबळ वधिला,
माझा अग्निविशुद्धा कांचनभूषेपरी प्रिया त्याला.

**शूर्पणखा.**—( मनांत म्हणते ) बाई, सांप्रत त्याला दैव अनुकूल झालें, व दादाला प्रतिकूल झालें, याला मी तरी काय करावें ?

**संपाति.**—

आर्या.

सैन्यासमेत पुष्पकयानें मी येतसें स्वनगरीला,
ऐसा हनुमद्वदनें आहे धाडित निरोप भरताला.

( असें म्हणून निघून जातो )

**शूर्पणखा.**—(विचार करून म्हणते) जंव हनुमंत हा निरोप घेऊन भरतापर्यंत जाऊन पोंचला नाहीं, तोंच तापसीचा वेष घेऊन मी भरताकडे जातें, आणि कांहीं असें अप्रियवर्तमान सांगतें कीं तें ऐकून भरत व शत्रुघ्न हे दोघेही देहत्याग करितील, म्हणजे रामानें माझे दोघे भाऊ मारिले आहेत त्यांचा सूड उगवेल. ( असें म्हणून निघून जाते. )

( ही पूर्वोत्तर कथेची संगति )

( तदनंतर पुढें भरत आणि त्याचे मागें शत्रुघ्न असे दोघे पडद्याबाहेर येतात. )

**भरत.**— वत्सा शत्रुघ्ना,

आर्या.

ज्यानें चोरुनि नेली माझी वहिनी निशाचरें प्रबळें,
त्याला शिक्षा करणें हें व्यर्था चित्तांत कार्य रे धरिलें,
मागध आदि करूनी बोलविले भूप साह्य करण्यास,
आले ते सत्कारीं वस्त्रालंकार देऊनी त्यांस.

अहमपि तदुपाहृतान्युपायनानि भगवतः साकेतराज्य

स्वामिनो रामस्य पादुकयोरग्रे निवेद्य कोशगृहे स्थापयामि.

शत्रु०— आर्य, भवदाज्ञया पूर्वमेव संभाविता मया राजानः. भवता

पि पूर्वमेव तदुपाहृतान्युपायनान्यार्यपादुकयोरग्रे निवेद्य कोशगृ

हे स्थापितानि. तत्किं पुनरावेद्यते ?

भरतः— हा विस्मरामि तावत् ।

द्रक्ष्यामि तातचरणप्रियसूनुमार्यं

देवं कदाहमितिचिन्तयतोऽनिशं मे

हा हन्त विस्मरति चित्तमिदं कृतानि

कर्माण्यपि त्वमवधेहि ततः क्रियासु. ४

शत्रु०— बाढमेव क्रियते.

भरतः— ( सानुस्मरणं सदैन्यं च ) वत्स शत्रुघ्न

नीलं मूर्ध्नि जटाभरं, कटितटे धौतं नवं वल्कलं,

पाणावुज्ज्वलमक्षदाम, तपसा देहे श्रियं कामपि

बिभ्राणेन, नवोदजान्तरगतव्याघ्राजिनाध्यासिना,

आरूढेन वने ध्रुवापि हृदये नोन्मुक्तमार्येण मे ५

शत्रु०— ( सबाष्पकंठं ) केन वा तादृशस्य सार्वभौमस्य

सूनोरार्यस्य महानुभावस्य तादृशी दैवतो दशा विस्मर्यते ?

भरतः— ( सशोकावेगं ).

मीही त्यांनीं ज्या भेटी आणिल्या आहेत, त्या **अयोध्याधीश** जो **रामचंद्र** याच्या पादुकांस निवेदन करून जामदारखान्यांत नेऊन ठेवितों.

**शत्रुघ्न.**—दादा, ही आज्ञा तुम्ही मला मागेंच केली होती, आणि त्या प्रमाणें मी राजांचा सत्कार केला. व तुम्हीही त्यांनीं केलेल्या भेटी थोरल्या दादांच्या पादुकांप्रत निवेदन करून जामदारखान्यांत नेऊन ठेवविल्या, मग तेंच आतां पुनः काय सांगतां ?

**भरत.**— खरेंच. मला अगदीं विस्मृति पडली बेटी !

## आर्या.

श्रीमत्ताताला[1] जो प्रियपुत्र प्रकट **रामचंद्र** जसा,
मेघस्वरूप तो मज, मीही चित्तीं तयास चातकसा.
केंव्हां **श्रीमद्रामा** अवलोकिन हें सदा मनीं वाहे,
कृतकर्मांही[2] विसरें, यास्तव, बा, सावधान तूं राहें.

**शत्रुघ्न.**—उत्तम आहे. मी सावधगिरी ठेवितों.

**भरत.**— ( मागील स्मरण करून दीनपणें म्ह० )

## श्लोक.

माथां नीलजटा सुवल्कल नवें श्रोणीतटीं[3] तें असे,
हातीं उज्वल अक्षमाळ[4], विपुला देहीं तपःश्री दिसे,
पर्णाच्या कुटिकेमधें स्थित असा शार्दूलचर्मावरी[5]
पाहीला वनिं, तीच मूर्ति अजुनी माझ्या दिसे अंतरीं.

**शत्रुघ्न.**—( सद्गदित होऊन म्हणतो ) अहो सार्वभौम राजाचा जो प्रियपुत्र, व स्वतांही जो महासमर्थ, त्याची दैवानें असी दशा करून टाकिली, ती कोण बरें विसरणार आहे ?

**भरत.**— ( शोकाच्या आवेशानें म्हणतो )

---

टीप.—१ श्रीमद्दशरथाला. २ केलेल्या कामासही. ३ कमरेस. ४ रुद्राक्षमाळ. ५ व्याघ्राच्या कातड्यावर.

संचारः कटुकीटकंटकशिलाखंडैर्वने दुष्क्रमे,

प्रायेणाम्लकषायतिक्तकटुभिर्वृत्तिस्तरूणां फलैः,

कीर्णानोकहशीर्णपर्णविरसैस्तोयैरुदन्याशमः,

शय्या स्थंडिल एव तस्य विषमे, यः सर्वलोकेश्वरः. ६

( इति मूर्च्छति ).

शत्रु०— समाश्वसिहि समाश्वसिहि, न स्मर्तव्योऽयमार्यस्य दशापरिणामः.

भर०— ( समाश्वस्य ) कथं न स्मर्तव्यः ?

जटाभारं धत्ते मणिमुकुटयोग्येन शिरसा,

बिभर्ति क्षौमार्हे, बत, कटितटे वल्कलमपि,

मणिप्रासादाग्र स्थितिसमुचितो निर्वृतिदिनं

यदार्यो वैदेह्या सममुटजगर्भे निवसति. ७

हंत ! न दीर्यते सहस्रधा मे वज्रमयं हृदयं. ( सास्रगद्गदं ).

आर्या विदेहतनया रजनीचरेण

नीता न जीवति, पुनर्यदि जीवतीयं,

अप्रेक्षितस्वजनमप्रतिषेधदीर्घम्

उच्छूनपक्ष्म न करिष्यति रोदनं किम् ? ८

शत्रु०— आर्य, किमस्माभिः क्रियतामेवंविधे दैवदुर्विलसिते ?

भरतः— कथं भोः, कथं !

श्लोक.

कांटे, मस्तर[1], कीट जेथ असती ऐसे वनीं हिंडणें,
माया अम्ल कडू[2] अशीं वनफळें भक्षोनियां राहणें,
शय्या भूमिवरी, जयांत पडलीं पानें पिणें त्याजला,
जो सर्वेश्वर, पातली विधिवशें ऐसी दशा त्याजला.

( असें बोलून मूर्छित होतो. )

**शत्रुघ्न**— दादा, सावध व्हा, सावध व्हा, थोरल्या दादांला ही जो दशा प्राप्त झाली आहे, तिचें आठवूं नये हेंच चांगलें.

**भरत**.— ( सावध होऊन ) कशी रे आठवूं नये ?

श्लोक.

जेथें योग्य किरीट रत्नमय, त्या माथां जटाभार तो,
जेथें योग्य महार्ह[3] वस्त्र कटिला त्या वल्क[4] गुंडाळितो,
ज्याला योग्य निवास कांचनमयीं सौधाग्रभागीं अहा !
वैदेहीसह तो पलाशकुटिकेमाजी[5] रहातो, पहा.

अरेरे ! माझें ऱ्हदय पहा, कसें वज्रासारिखें घट्ट आहे. त्याचे सहस्रावधी तुकडे व्हावे, पण त्याला भंगही होत नाहीं. ( सद्गदित होऊन व डोळ्यांस पाणी आणून )

श्लोक.

नेली विदेहतनया जव राक्षसें, ही
मेलीच जाण मज संशय यांत नाहीं.
आहे जिवंत तरि ती करि रोदनास,
कोणी नसे स्वजन तीस निवारण्यास.

**शत्रुघ्न**— दादा, ही सर्व देवाची करणी, हिला आपण काय करावें ?

**भरत**.— हरहर ! काय दुःख हें !

---

टीप—१ कांटे दगड किडे. २ आंबट कडु तिखट. ३ मोलवान. ४ बकल. ५ पर्णकुटिकेमध्यें.

सीता चेद्रक्षसा नीता, निष्ठन्वस्या गुणांतरं;

शीलाभिजात्ये संचिन्त्य धीरोऽप्यार्यो न जीवति. ९

तदिदानीं किं करोमि मंदभाग्यः ?

शत्रु०— धैर्यमवलंब्यतामार्येण.

अनुप्रेषितव्याः खलु यथास्थानं राजानः.

भरतः— (विमृश्य) कथमन्यदुपक्रांतमन्यथा प्रस्तूयते ?

तदिदानीमिदं राजन्यकमनुकर्षन् रिपुनिपातनाय सन्नि·

कर्षमहमार्यस्य यास्यामि.

शत्रु०— किमार्येणाकर्णितमपदानमार्यस्य ?

भरतः— किं तत् ?

शत्रु०— निषादाधिपतिर्गुहः पत्रिकां प्रेषितवान्.

भरतः— उक्तं हि मया गुहं प्रति, ज्ञातिभिर्वनगोचरैरनुप्रविश्य दंड·

कारण्यमार्यस्यप्रवृत्तिरुपलब्धव्येति. तत एव मायामृगेण रूपवच·

नाभ्यां आर्यलक्ष्मणौ विमोह्य दूरं नीतवता रक्षसा भिक्षुवेषप्रतिच्छ·

न्नेन देवी समपहृतेति गुहेन मे विज्ञापितं.

शत्रु०— इदानीं पत्रिकायां लिखितमार्यस्य लक्ष्मणमात्रसहायस्य

नेदानीं सहायांतरापेक्षा, यतः

## आर्या.

राक्षसकृतसीतेचें अंगीं असती असीम गुण दुसरे;
शीलाभिजात्य[1] अठवुनि धीरहि आर्य[2] त्यजीलजीवित रे.

तर आतां मंदभाग्यानें म्यां काय करावें ?

**शत्रुघ्न**— धैर्य धरावें, आणि राजे लोक आले आहेत, त्यांना आप-आपल्या स्थानीं जावयास आज्ञा द्यावी.

**भरत**.— ( विचार मनांत आणून स्म० ) कायरे हें ? हें भलतेंच काय ह्मणतोस ? राजेलोक आले आहेत, त्यांना बरोबर घेऊन जेथें आर्य **रामचंद्र** असेल, तेथें जाऊन त्याच्या शत्रूचा मी नाश करून टाकणार.

**शत्रुघ्न**—आर्य **रामचंद्रांनीं** काय केलें तें तुह्मी ऐकिलें नाहीं काय?

**भरत**.— नाहीं ऐकिलें. काय झालें ?

**शत्रुघ्न**— त्याविषयीं, निषाधाधिपति जो **गुह**[3] त्याचें पत्र आलें आहे.

**भरत**.— होय वत्सा, मी त्यास सांगून ठेविलें होतें खरेंच, कीं, आर्य **रामचंद्र दंडकारण्यांत** गेले आहेत, तर ते जेथें कोठें असतील तेथें आपले जातवाले कोळीलोक पाठवून त्यांचा शोध ठेवित जावा ह्मणून. त्याकडूनच तर कोण्या एक्या मायामृगाचें रूप पाहून आर्यांस व वचन ऐकून **लक्ष्मणास** मोह पडून ते दूर गेले असतां, राक्षसानें भिक्षुरूप घेऊन **जानकी** वहिनीचें हरण केलें, हें वर्तमान मला मुळीं लागलें. पुढील काय वर्तमान आहे ?

**शत्रुघ्न**— हल्लीं पत्रांत मजकूर लिहिला आहे कीं, आर्यांच्या बरोबर **लक्ष्मणजी** सहाय आहेत, आतां त्यांना आणखी कोणी सहाय

---

टीप.—१ सुशीलता व कुलीनता. २ वडील भाऊ ( राम ). ३ गुहनामें कोळ्यांचा राजा.

श्रुतं, देव्याः प्रत्यानयने ससैन्यः सुग्रीवः सहायो लब्धः. ततश्च राजानो यथास्थानं प्रेषितव्या इति.

भरतः— कः सुग्रीवो नाम, कथं सहायो लब्धः ?

शत्रु०— किष्किंधाधिपतेः किमपि चक्रवर्तिनो वालिनः कनीयानेव, स च, वालिनं हत्वा रामेण, राज्ये स्थापनादार्यस्य सहायः संवृत्तः, श्रूयतां संग्रहेण वाचिकं.

भरतः— कथमिव ?

शत्रु०—

हत्वा यो युधि वालिनं कपिवरं, तस्यानुजाय श्रियं
सुग्रीवाय वितीर्य, तेन सुहृदा विष्वग्विसृष्टैर्भटैः
अन्विष्टां विगतां पुरीं जनकजां चोरस्य विज्ञापितां
रुन्द्धे वानरसेनया गमितया सेतुं निबध्याम्बुधौ. इति १०

भरतः— ( विमृश्य ) वत्स, संभावितमिदं. यतः कदाचिदाकाशमार्गेण परस्परमालपतां खेचराणां वचः श्रुतवानस्मि.

शत्रु०— कीदृशं वचः ?

भरतः—

निहते राजपुत्रेण निजे पुत्रेपि वालिनि,
न शोचतीन्द्रः कार्यार्थी, प्रेक्षते ह्यात्मनो व्यथां. इति ११

नको, कारण वेवी जानकीला आणण्याकरितां सैन्यासहवर्तमान सुग्रीव सहाय मिळाला आहे असें ऐकिलें. यास्तव राजे आले असतील, त्यांना आपआपल्या ठिकाणीं जावयास सांगावें.

भरत.— सुग्रीव हा कोण आहे ? आणि तो सहाय कसा मिळाला बरें ?

शत्रुघ्न— किष्किंधा नगरीचा चक्रवर्ती राजा जो वालीनामें वानर त्या वालीचा हा धाकटा भाऊ. आर्य रामचंद्रांनीं वालीला मारून सुग्रीवाला राज्य दिलें ह्मणून तो रामाला सहाय झाला. आतां सर्व प्रश्नाचा सारांश सांगतों ऐकावा.

भरत.— सांग काय तो.

शत्रुघ्न—

### श्लोक.

वालीतें वधुनी दिलें तदनुजा[1] रामेंचि राज्य स्वतां,
तो[2] सेना अपुली तईं दिशिदिशीं झाला असे धाडिता.
एकें जाउनि वानरें कथियलें स्थानास चोराचिया,
तें सेनेसह वेढिलें जलधिला सेतूस बांधूनियां.

भरत.— (विचार करून ह्म०) वत्सा, ही गोष्ट संभवते. कारण कोणी एके समयीं सिद्ध चारण गंधर्व यांतून कोणी आकाशमार्गानें बोलत बोलत चालिले होते, त्याचें भाषण म्यां ऐकिलें.

शत्रुघ्न— तें काय सांगावें बरें ?

भरत.—

### श्लोक.

मारिला राजपुत्रानें स्वपुत्र जरि वालि हा,
न शोक करि कार्यार्थी न व्यथा गणि वृत्रहा.[3]

---

टीप—१ सुग्रीवाला. २ सुग्रीव. ३ इंद्र.

**शत्रु०**— तर्हि भवितव्यमिंद्रसूनुना; किंतु न ज्ञायते तस्य कीदृशी कार्यार्थितेति.

**भरतः**— वत्स, पुनश्च किंचित्तेषां श्रुतमस्ति.

**शत्रु०**— तदप्यनुगृह्यतामार्येण.

**भरतः**—

> नैवं कृतचरं भ्रातुः नापि श्रुतचरं क्वचित्
>
> अगाधे योजनशते सागरे सेतुबंधनम्. १२

**शत्रु०**— आर्य, ततः कपिराक्षसानीकयोर्युद्धमपि प्रवृत्तमिति मन्ये. यतः कस्मिन्नपि दिने प्रवृत्तं चंडानिलमुद्दिश्य तमुदर्कोऽयमौत्पातिको भवतीति शांतिकं प्रष्टुकामेन मया स्वमाश्रमपदं प्रेषितमार्य रामप्रियसखं पिंगलं प्रति वसिष्ठमिश्रैः प्रतिसंदिष्टं.

**भरतः**— कथमिव ?

**शत्रु०**—

> लंकापुरे वानरराक्षसानां रणं दिदृक्षोर्विनतासुतस्य
>
> गत्यागतिभ्यां गगने समुत्थः पक्षानिलोऽयं प्रसृते धरण्याम्. १३

तन्न भेतव्यमौत्पातिकोऽयमिति वत्सेनेति.

( नेपथ्ये )

**शत्रुघ्न**— इंद्रपुत्र **वाली** मारिला असेल, पण **इंद्र** हा कार्यार्थी असें ह्मटलें हें कसें समजत नाहीं.

**भरत**.— आणखीही थोडेसें त्यांचें बोलणें ऐकिलें आहे, तें ऐक ह्म- णजे समजेल.

**शत्रुघ्न**— तेंही दादांनीं कृपा करून सांगावें तर.

**भरत**— तें हें.—

**श्लोक.**

न पाहिलें ऐकिलें या कधीं कोणाहि पासुन
अगाधीं चारशें कोश सागरीं सेतुबंधन.

**शत्रुघ्न**.—तर मग वानर व राक्षस यांचें युद्धही झालें असेल असें म- ला वाटतें. कारण एकेदिवशीं मोठा प्रचंड वारा सुटला होता, ते- व्हां हा कांहीं उत्पातसूचक असल्यास यावर शांति वगैरे काय क- रायाची ती सांगावी, असें विचारण्याकरितां, मी आर्य **रामचंद्र** यांचा प्रिय सखा जो **पिंगल**, त्याला **वसिष्ठ** गुरूंचे आश्रमास पाठविलें. तेव्हां त्याला गुरुजींनीं उलट निरोप सांगून परत पाठविलें.

**भरत**.— तो कोणता निरोप बरें ?

**शत्रुघ्न**—

**श्लोक.**

"**लंकापुरी** वानरराक्षसांचा झाला असे संगर[1] उग्र साचा,
जाऊनियें तार्क्ष्य[2] पहावया त्या, तत्पक्षजन्याहि असेच वात्या[3].
ह्मणून हा उत्पातवायु आहे असें मानून वत्सांनीं किमपि मनांत भीति आणूं नये."

(इतक्यांत पडद्याच्या पलीकडे **शूर्पणखा** बोलते.)

---

टीप.— १ युद्ध. २ गरुड. ३ वाहाटुळ.

विनिपातेन सुहृदां विजयेन च दुर्हृदाम्,

विषण्णाहं तपस्तप्तुं व्रजामि तु हिमाचलं, १४

भरतः— ( आकर्ण्य ) युध्यमानानां केषामपि जयपराजयशंसनी केयं वृद्धतापसीव लक्ष्यते ?

( ततः प्रविशति वृद्धतापसीवेषेण शूर्पणखा )

शूर्प०— ( विनिपातेन सुहृदामित्यादि पुनः पठति ).

भरतः— वत्स, केयं कुत आगम्यत इति पृच्छ. वत्स, संभवेदप्यार्यस्य समरवृत्तिः, आकर्णयत्वस्या मुखात्.

शत्रु०— आर्य, भवत्वेवं. ( शूर्पणखां प्रति ) अयि तापसि, का त्वं ? कुत आगम्यते ?

शूर्प०— ( शत्रुघ्नं दृष्ट्वा सभयं स्व० ) कथमिहागतोपि कर्णनासावैरी मम क्षत्रियवटुः ? ( निपुणं निरूप्य ) नायं लक्ष्मणः. अनेन हि तत्स्वरूपेण तदनुजेन शत्रुघ्नेन भवितव्यम्. ( करेण नासिकामभिमृश्य ) मम गृहीततापसीरूपाया वर्तत एव नासिका.

अतः प्रतिपदं वर्णानानुनासिक्यरूषितान्

प्रभोस्तु सोपहसितुं शक्यमस्य मदुक्तिभिः १५

( प्र० ) किमुक्तं भवता ?

शत्रु०— ननु ब्रवीमि, का त्वं कुत आगम्यत इति.

## आर्या

मेले सर्व सुहृज्जन शत्रुजनीं साधलाहि विजय असे
तेणें उदास होउनि, हिमगिरितें मी तपास जात असें.

**भरत.**—( ऐकून ह्म० ) कोणा उभयपक्षांचें युद्ध होऊन जातें आणि त्यांच्या जयपराजया विषयीं जसें बोलावें, तसें बोलत बोलत तापसी सारिखी ही कोण रे येत आहे ?

( तदनंतर वृद्ध तापसीच्या वेषानें **शूर्पणखा** पडद्या बाहेर येते. )

**शूर्पण०**—( 'मेले सर्व सुहृज्जन' हीच आर्या पुन्हा ह्मणते ).

**भरत.**— ( वत्सा, ही कोण व कोठून आली याचा शोध कर. हिला आर्यांकडील युद्धाचें वर्त्तमान समजलें असलें तर असेल तेंही विचारून पहा बरें.

**शत्रु०**— बरें आहे दादा, विचारितों. ( **शूर्पण**खेप्रत ह्मणतो ) अगे तापसी, तूं कोण आहेस, व कोठून आलीस ?

**शूर्पण०**— ( **शत्रु**घाला पाहून मनांत ह्म० ) माझे कान व नाक कापुन टाकणारा जो क्षत्रिय बटु **लक्ष्मण** तोच एथें आला काय बाई ? ( निरखून पाहून ह्मणते ) छेछे ! हा **लक्ष्मण** नव्हे, तर त्याच्याच सारिखा हा त्याचा धाकटा भाऊ **शत्रुघ्न** असेल ( हातानें आपलें नाक चाचपून पाहून ह्म० ) हा ! कांहीं चिंता नाहीं ! मी तापसीचें रूप घेतलें आहे तेव्हां मला नाक आहे बरें ! आतां,

## आर्या

अनुनासिक वर्णांचा होईल कीं स्पष्ट आजि उच्चार,
ही तंव गतनासा स्त्री, याचे मनिं हा न येइल विचार.

( मोठ्यानें ह्म० ) त्वां काय ह्मटलें बाबा !

**शत्रु०**—तूं कोण आहेस ? कोठून आलीस ? हें विचारिलें, दुसरें कांहीं नाहीं.

शूर्प०— ( स्व० ) रावणानुजाहं लंकाद्वीपात् ( प्र० निश्वासेन खेदमभिनीय ) या काचिद्यतः कुतश्चिदिति जानीहि.

भरतः— ( स्व० ) नूनमियं यतस्तापसी, ततो न राक्षसपक्षपातिनी, विवर्णा चेयं दृश्यते. तत्कुशलं दुर्लभमिति प्रतिभात्यार्यस्य, वत्सं लक्ष्मणस्य वा, अथवा विवर्णेयमन्येन हेतुना स्यात्. ( प्र० ) अयि तापसि, किं ते नाम ?

शू०— ( स्व० ) अयमपि रूपेण मदीयनासिकाभेदमात्रफलकाभिलाषविषयक्षत्रियकुमार इव वर्तते. तदनेन भरतेन भवितव्यम्. प्रश्रितश्चायमस्मिन् शत्रुघ्नः. ( प्र० ) भद्र, किमाह भवान् ?

शत्रु०— किं ते नामेति पृच्छत्ययमार्यः.

शू०— ( स्व० ) मम तु जन्मकृतं नाम शूर्पणखेति, कर्मकृतं तु व्यंगमुखीति, ( प्र० ) पर्णादिनीति मामृष्यमूकगिरिवास्तव्या मुनयो व्यपदिशंति. यतः पुलस्त्यमहर्षेरियं कुलप्रसूतेति मयि प्रसीदंति.

शत्रु०— तर्ह्यनेन तव वचनेन पुलस्त्यकुलीना भवती ऋष्यमूकगिरेरागच्छंतीमवगच्छामि.

शू०— अथ किं.

शत्रु०— किं भवती राक्षसी ?

शूर्प०— ( स्व० ) किमत्र कश्चित्प्रष्टव्यः ( प्र० सकोपं ) किं पुलस्त्यकुलप्रसूत्या राक्षस्या भवितव्यं ?

**शूर्पणखा.**—(मनांत म्ह० ) मी रावणाची धाकटी बहीण आहे, व लंकाद्वीपाहून आलें. ( खेद झाल्या सारिखा उसासा टाकून मोठ्यानें म्ह० ) काय विचारतोस बाबा ! आहे कोणी एक माणूस व आलें आहे इकडून तिकडून कोठून तरी काय सांगूं ?

**भरत.**—( मनांत म्हणतो ) ज्या पेक्षां ही तापसी आहे, त्यापेक्षां ही राक्षसांच्या पक्षाची तर नाहींच नाहीं. आतां हिचें तोंड उतरलेसें दिसतें, त्यावरून आर्य रामचंद्राचें व वत्स लक्ष्मणाचें कुशळ दुर्लभ वाटतें ! मग काय असेल तें असो. अथवा दुसऱ्या कांहीं कारणानें ही खिन्न झाली असेल तर कोण जाणें? (उघडपणें बोलतो ) अगे तापसी तुझें नांव काय बरें ?

**शूर्प०**—( मनांत म्हणते ) ज्या विषयीं कामातुर झाल्यामुळें माझें नाक व कान गेले, त्याच क्षत्रियकुमार रामचंद्राप्रमाणें हा दिसतो, तेव्हां हा भरत असावा. शत्रुघ्नही याच्याशीं धाकटेपणाचे नात्यानेंच वागतो. ( मोठ्यानें म्हणते ) बाबा, त्वां काय म्हटलें रे ?

**शत्रुघ्न**— दादा तुझें नाव काय म्हणून विचारतात.

**शूर्प०**—( मनांत म्हणते ) माझें जन्मनाम शूर्पणखा, परंतु कर्मनाम व्यंगमुखी होय. ( मोठ्यानें म्हणते ) ऋष्यमूकपर्वतावर राहणारे मुनि मला पर्णादिनी म्हणतात, व पुलस्त्य महर्षींचे वंशांत जन्मलें म्हणून मजवर ते लोभही फार करितात.

**शत्रुघ्न.**—या तुझ्या भाषणावरून तूं पुलस्त्य कुलोत्पन्न आहेस व ऋष्यमूकपर्वतावरून आलीस असें समजलें.

**शूर्प०**—होय, तसेंच खरें.

**शत्रु०**—तर मग तूं राक्षसी आहेस तर ?

**शूर्प०**—(मनांत म्हणते) याविषयीं विचारणें काय ? ( मोठ्यानें क्रोध आणून म्हणते ) पुलस्त्याच्या कुलांत उत्पन्न झालें म्हणून राक्षसी झालें काय रे ?

भरतः— वत्स, न कोपयितव्या तापसी. न हि विश्रवसो वैश्रवणस्य वा राक्षसी जातिः.

शूर्प०— युक्तमुक्तं भद्रेण.

भरतः— कुतो निर्विण्णयेव भवत्या लक्ष्यते ?

शूर्प०— तर्हि श्रूयतां. ( विनिपातेन सुहृदामिति पुनः पठति ).

शत्रु०— के तव सुहृदः ? के तव दुर्हृदः ?

शूर्प०— ( स्वग० ) राक्षसाः सुहृदो, वानरा दुर्हृदः विभीषणहतकः सोपि तथा ( प्रकाशं ) वानराः सुहृदो, राक्षसा दुर्हृदः.

भरतः— ( स्व० सातंकं ) आर्यपक्षपातिना विनिपात इति दारुणमिव वर्तते. ( प्र० ) अयि पर्णादिनि, ऋश्यमूकगिराववस्थानमुक्तं भवत्या, किं तत्र केषां युद्धं विवृद्धं ?

शूर्प०— नहि नहि. लंकाद्वीपे.

भरतः— युज्यत एवैतत्. कथमवगतमिदं भवत्या ?

शू०— अस्ति खलु किष्किंधानाम गुहा.

शत्रु०— अस्ति. वाली यामनुशास्ति.

शूर्प०— न खल्विदानीं वाली, अपि तु तं निहत्य रघुकुलीनेन रामेण राज्येस्थापितस्तां सुग्रीवोऽनुशास्ति.

श०— ज्ञायत एतदपि.

शूर्प०— तस्य गुहायां रुमाधात्रेयी शंकुकर्णी नाम मत्प्रियसखी कापि वानरी रुमायाः स्वपतिना साकमग्निप्रवेशमवेक्ष्य

**भरत.**—वत्सा, तापसीला रागें भरूं नको. **विश्रवा** अथवा **वैश्रवण** हे **पुलस्त्य**कुलोत्पन्नच आहेत, ह्मणून ते कांहीं राक्षस आहेत असें नाहीं.

**शूर्प०**—बाबा, तूं हें ठीक बोलिलास.

**भरत.**—बरें तूं असी खिन्न झाल्यासारिखी कां बरें दिसतेस ?

**शूर्पण०**—ऐक तर सांगतें. ( असें बोलून 'मेले सर्व सुहृज्जन' हीच आर्या पुनः ह्मणते. )

**शत्रु०**—तुझे सुहृत् कोण, व शत्रु कोण बरे आहेत ?

**शूर्प०**—( मनांत ह्मणते ) राक्षस हे सुहृत् आणि वानर हे शत्रु, दुरात्मा **बिभीषण** तोही शत्रुच । ( मोठ्यानें ह्मणते ) वानर हे सुहृत्, आणि राक्षस हे शत्रु.

**भरत.**—( व्याकुळ होऊन मनांत ह्मणतो ) वानर हे आर्य **रामचं**द्राच्या पक्षाचे त्यांचा नाश ह्मणजे ही गोष्ट मोठी अनर्थकारक होय (मोठ्यानें ह्मणतो) अगे **पर्णा**दिनी, **ऋ**ष्यमूकपर्वतावर राहतें ह्मणून त्वां सांगीतलें, तर तेथें कोणा कोणाचें युद्ध झालें ?

**शूर्पणखा.**—तेथें नव्हे, **लं**काद्वीपांत युद्ध झालें.

**भरत.**—ठीक, ही गोष्ट सत्य आहे. बरें तें तुला कसें समजलें ?

**शूर्प०**—**किष्किं**धा ह्मणून एक गुहा आहे.

**शत्रु०**—होय, आहे खरीच. तिचा राजा **वा**ली आहे.

**शूर्प०**—आतां **वा**ली जीवंत राहिला नाहीं, रघुकुलोत्पन्न जो **राम**चंद्र त्यानें त्याला मारून **सुग्री**वाला गादीवर बसविलें, तो तिचा थोड्या दिवसांपूर्वी राजा झाला.

**शत्रु०**—होय. हेंही आम्ही ऐकिलें आहे.

**शूर्प०**—त्या गुहेंत **शंकुकर्णी** ह्मणून एक वानरी राहते ती माझी प्रियसखी आहे. ती **रुमे**च्या दाईची कन्या. **रुमे**नें आपल्या

व्यसनमसहमाना ऋष्यमूकगिरौ मम समीपमुपगता. तया निवेदितमिदं मे.

भरतः— ( सावेगं ) का रुमा नाम ?

शूर्प०— सुग्रीवस्य प्लवंगाधिराजस्य महिषी.

शत्रु०— ( सावेगं ) कथं सुग्रीवो राक्षसैर्व्यापादितः ?

शू०— ( सबाष्पगद्गदं ) न केवलं सः, तत्सचिवो हनूमान्, वालिपुत्रो युवराजोऽङ्गदो ऽन्ये सैन्याश्च.

शत्रु०— पर्णादिनि, तत्र गतयो रघुकुलीनयो राजपुत्रयोः कीदृशी प्रवृत्तिः ?

शूर्प०— का पुनरन्या भवितव्येति ? या मायाविनां राक्षसानामग्रे समुचिता.

शत्रु०— ( सबाष्पं ) कथं माया प्रयुक्ता तयोरपि दारुणं कर्तुं व्यवस्यता राक्षसराजेन ?

शूर्प०— तर्हि श्रूयतां.

साकेतात्भरतेन भूमिपतिना सैन्या वयं प्रेषिताः

साहाय्याय तवानुकर्णितवता लंकापुरे संगरं,

इत्यागत्य, सलक्ष्मणे रघुपतौ नक्तं प्रसुप्ते, तथा

पौलस्त्यस्य भटैः कृतं नृततनुभिर्—

भरतशत्रु०— ( सोद्वेगं ) कथं कृतं कथं कृतं ?

शूर्प०— ( स० )

पतीबरोबर अग्निप्रवेश केला, हें पाहून तिला फार दुःख झालें. तें सोसवेना ह्मणून ती ऋष्यमूक पर्वतावर मजकडे आली, तिनें हें मला सांगितलें.

**भरत.**—(दुःखाच्या आवेशानें म्हणतो). अगे, **रुमा** ती कोण होती?

**शूर्पणा॰**—वानरांचा राजा जो **सुग्रीव** याची पट्टराणी.

**शत्रु॰**—( दुःखाच्या भरानें ह्मणतो ) काय? **सुग्रीवाला** राक्षसांनीं मारिलें?

**शूर्प॰**—( सद्गदित होऊन व अश्रू आणून ह्मणते ) तोच एकटा मारिला असें नाहीं बाबा. त्याचा मंत्री **हनूमान्**, **वालिपुत्र** युवराज **अंगद**, आणि इतर सेनानायक,हे सर्वही मारिले,

**शत्रु॰**— अगे **पुण्यशीले**, रघुवंशांत उत्पन्न झालेले असे दोघे राजपुत्र तेथें गेले होते, त्यांचें काय बरें वर्तमान आहे?

**शूर्प॰**—त्यांचें वर्तमान निराळें काय असणार आहे? मायावी राक्षसांशीं प्रसंग पडला असतां जें व्हावयाचें, तेंच झालें. दुसरें काय होणार?

**शत्रु॰**—( आसवें आणून ह्मणतो ) काय? राक्षसराजानें मायाबळानें त्यांचाही घात केला?

**शूर्प॰**— सांगतें ऐकावें.

### श्लोक.

> साकेताहुनि[1] धाडिलें नृपतिनें[2] अह्मांस लंकापुरीं
> साह्याया करतां तुह्मास तुमुलीं जे गुंतलां संगरीं,
> ऐसें सांगुनि राहुनी निशिचरीं रात्रीं नराच्या मिसें,
> केलें, निद्रित राजपुत्र असतां त्यांना-

**भरत, शत्रु॰**—( उद्विग्न होऊन ह्मणतात) काय केलें? काय केलें?

**शूर्प॰**—( मनांत ह्मणते)

---

टीप.—१ अयोध्येहून २ भरतानें.

अग्रजं मे दशग्रीवं कुंभकर्णं तु योऽवधीत्

हन्यां भरतशत्रुघ्नौ यावेवा स्यानुजावहं १७

( प्र० )

नामैव शिष्टं तथा. १८

**भरतः**— हा राम, हा लक्ष्मण. ( इति मोहमुपगतः )

**शत्रु०**— हा कथमार्यावेवंगतौ । ( इति मूर्छति )

**शूर्प०**– कथमप्रियमेवमुक्तं युवयोः १ कौ पुनर्युवां १ समाश्वसितं, समाश्वसितं

**उभौ.**– ( समाश्वस्य ) कथमुभावेव संवृत्तौ ?

**शूर्प०**– अथ किं. अनन्तरं स्वपंत एव सुग्रीवादयो मरमुरन्दवो राक्षसैः शस्त्रपाणिभिः– ( इत्यर्द्धोक्ते ) ननु भणामि, कावुभाविति.

**भरतः**— ज्ञायत एव शेषमपि, हता इति.

**शत्रु०**– अयमार्यो भरतः, अहं तदनुजः शत्रुघ्नः.

**शूर्प०**– ( उद्वेगं नाटयति ) कथं रामलक्ष्मणयोर्भ्रातरौ युवाम् ? हा, हतास्मि ।

**श्लोक.**

कुंभकर्ण दशग्रीव या मद्बंधूंस मारिता[1],
जो त्याचे बंधु हे आता बाणिंनें मारितें स्वतां.

( मोठ्यानें "साकेताहुनी" या श्लोकाचा शेवट ह्मणते. )

कथाशेषसें.

**भरत.**— हा आर्या **रामा**, हा वत्सा **लक्ष्मणा**, ( असें ह्मणून मूर्छित होतो ).

**शत्रुघ्न**— अरेरे! दोघेहि आर्य गेले काय? हरहर काय हें! ( असें ह्मणून मूर्छित होतो ).

**शूर्प॰**—काय? ही मी तुह्माला अप्रियवार्ता सांगितली तर? अगे बाई! काय करावें आतां? अरे, तुह्मी कोण तरी आहां? सावध व्हा, सावध व्हा.

**दोघे.**—(सावध होऊन ह्म॰) **रामलक्ष्मण** हे दोघेही गेले काय?

**शूर्प॰**— होय, दोघेही गेले, असी त्या दोघांची अवस्था केल्यावर माझे सुह्रत् जे **सुग्री**वादिक वानर, यांना राक्षसांनीं शस्त्रें घेऊन ( असें अर्धेच वाक्य बोलून ह्मणते ) अरे पण तुह्मी कोण आहां हें मी विचारिलें, सांगा.

**भरत.**— असो, तूं सांगितलें नाहीं तरी "मारिलें" हा वाक्यशेष उघडच आहे.

**शत्रुघ्न**— ज्याला **भरत** ह्मणतात, तो हा माझा वडील भाऊ, आणि त्याचा धाकटा भाऊ मी **शत्रुघ्न**.

**शूर्प॰**— ( उद्विग्न झाल्यासारिखी होऊन ) काय? **रामलक्ष्मणा**चे बंधूच तुह्मी तर? हायहाय घात झाला!

---

टीप—१ मारणारा जो त्याचे.

सत्यमप्यप्रियं वक्तुं नार्हमित्यार्यभाषितं
जानानाप्येवमुक्काहं नरके निपतामि किं ? १८

भरतः- को दोषो भवत्याः ? यदन्येनापि वक्तव्यमेवेदमावयोः.

शूर्प०- पृच्छतोऽस्य शत्रुघ्नस्य संबंधानभिज्ञा शंकुकर्णी कथितमिदमद्याहमुक्तवती.

शत्रु०— कीदृशी सीतादेव्याः प्रवृत्तिः ?

शूर्प०- किमिति कथयामि ?

निशाचरेणापहृता निरुद्धा कथिष्यता केलिसखी भवेति
तयोरवस्थामपि बोधिताऽसून्तुद्बंधनान्मुक्तवती शुचं च १९

शत्रु०- (सशोकं) हा, कथमिदमापतितं !

आर्यै जानकि, यः प्रवासदिवसे श्वश्रूजनस्त्वां वधूं
पश्यन्वल्कलमध्यदर्शितकवीबंधक्रमं गृण्हतीं
शोकान्मोहमुपागतः स किमिदं शृण्वन्विसोढुं क्षमस्तु,
त्यक्ता यत्किल खिन्नया ननु रज्जूद्बंधनेन त्वया. २०

भरतः- आर्ये, धन्यासि यथाकालोचितमेवेदमाचरितं. अहं तु न जाने किमिदमात्मनोचितमाचरितव्यमिति.

आर्या.

सत्यहि अप्रिय जरि तें, बोलुं नये कधिं हि जाणते मनुजीं,
हें जाणूनिहि वदलें, मी केलें नरकसाधनास अजीं.

**भरत**— यांत तुझ्याकडे काय दोष आहे? हें वर्तमान कोणाला तरी सांगणें पडतेंच तें त्वां सांगितलें इतकेंच.

**शूर्प०**— शत्रुघ्नानें मला वर्तमान विचारिलें त्यावरून, शंकुकर्णीनें जें मला सांगितलें होतें तें मी येथें बोलिलें. तुमचें त्यांचें बंधुत्वाचें नातें आहे, हें बाई मला काय ठाऊक? हें ठाऊक असतें, तर हें वर्तमान बोलिलेंच नसतें.

**शत्रुघ्न**— **जानकी** वहिनीचें तरी काय वर्तमान आहे?

**शूर्प०**— काय सांगूं आतां?

श्लोक.

निशिचरें हरुनी वनि ठेविली, वदतसे मम अंतुरि[1] हो भली,
रघुकुमारकमृत्युहि ऐकुनी, त्यजि तनूशुच[2] ही गळिं[3] बांधुनि.

**शत्रुघ्न**— (शोकानें ह्म०) हायहाय! हा काय अनर्थ माय झाला? अगे **जानकी** वहिनी,

श्लोक.

जातांना वनि वल्कलास धरिलें नेसावया जैं तुवां,
शोकें मूर्छित जाहल्या सकळिका तैं ज्या तुझ्या सान्त्वा,
कंठीं बांधुनि पाश देह त्यजिला त्वां हें असें ऐकुनी,
त्या कैशा जगतील आजि परमा दुःखास या भोगुनी?

**भरत.**— आर्ये, धन्य आहेस. हें जें त्वां केलें, तें कालोचितच केलें. शाबास! मला तर आतां काय करावें, कोणती गोष्ट करणें प्रस्तुत योग्य आहे, हें कांहींच सुचत नाहींसें झालें आहे.

---

टीप.—१ स्त्री (माझी हो). २ देह व शोक बरोबर टाकिते झाली. ३ गळफांसास (तनू) बांधून. ४ सान्त्वा.

शत्रु०—

वैरं निर्यातयिष्यामो हत्वा वैरिणमाहवे.

शूर्प०— ( स्व० ) निवृत्तमेवेदं. ( प्र० )

इदानीं नैष पंथा वा सहाया न हि संति यत्. २१

अतो विषण्णानां तथाचरंत्या सीतयैव निरूपितः सदाचारः.

भरतः— कष्टं कष्टं ।

नीता एव चतुर्दशापि शरदो, यासां दिनेषु क्षणो

ऽप्येकः कल्पवदास्त, मे दिनमिदं स्वागमस्यावधिः,

प्रायेणाद्य समागतस्य विपिनादार्यस्य पादांबुजं

द्रक्ष्यामीति समुत्सुकस्य ननु मे भिन्नोऽभिलापद्रुमः२२

( इति मूर्च्छंति ).

शूर्प०— ( स्व० ) भरत, न केवलं भवतो, ममापि रूपवंतमिमम-

भिलषंत्याश्छिन्न एवायं, परंतु नासिकया साकमित्यवगंतव्यं.

( प्र० ) समाश्वसिहि, समाश्वसिहि कथमित परं दृश्यो रामः ?

शत्रु०— ( सोत्कंठं सशोकं ).

शत्रु०— श्लोक. ( अर्धा ).

रणीं मारूनि शत्रूला वैरनिर्यातना करूं

शूर्प०—( मनांत ह्मणते ) ही गोष्ट तर होऊन चुकली आहे, मोठ्यानें ह्मणते.

श्लोक. ( उत्तरार्ध ).

साध्य नाहीं ह्मणुनि ही गोष्ट चित्तीं नका धरूं.

आतां तुह्मांला अतिशय शोक झाला आहे. अशा शोकप्रसंगीं कसें वर्त्तावें हा सन्मार्ग सीतेनेंच दाखवून दिला आहे.

भरत.— अरेरे ! काय ऐकतों ?

श्लोक.

चौदावत्सर काळ ज्या अजवरी दुःखें बहू काढिला,
एकैक क्षण कल्पतुल्य[1] मजला भासे अहो ज्यांतला[2],
आजी हे दिन अंतिम, प्रभु आजी येईल रानांतुनी.
त्याला पाहिन हा मनोरथतरू गेला असे मोडुनी.

( असें ह्मणून मूर्छित होतो. )

शूर्प०—( मनांत ह्मणते ). भरता, तुझाच मनोरथतरू मोडला असें नव्हे, तर राम हा मोठा रूपवान् ह्मणून त्याविषयीं जो माझा अभिलाषतरू तोही मोडला, त्यांत तो माझ्या नाकासुद्धां, इतका माझा विशेषच आहे, (मोठ्यानें ह्म०) भरता सावध हो, सावध हो. याउपर राम हा बाबा कोठून दृष्टीस पडणार ? आतां तो दृष्टीस पडण्याची आशा ठेवूं नको.

शत्रु०—( उत्कंठित होऊन शोकानें ह्म० )

टीप.—१ कल्पाप्रमाणें. २ ज्या चौदावत्सर काळांतला.

तद्वक्त्रं शरदिन्दुबिंबमधुरं, ते पद्मपत्रायते
नेत्रे, तौ रमणीयगारुडमणिस्तंभोपमानौ भुजौ,
तौ लक्ष्मीकरपद्मकेलिकमलच्छायौ च पादौ तथा-
भावादार्यरघूद्वहस्य न पुनर्द्रष्टुं मया शक्यते. २२

( इति मूर्च्छति )

शूर्प०—( स्व० ) मया पुनस्तदखिलं दृष्ट्वापि न पूरितो मनोरथः. ( प्र० ) वत्स शत्रुघ्न, समाश्वसिहि. समाश्वसिहि समाश्वासय चैनं. परंत्वस्य शोकस्य प्रतीकारश्चिन्त्यतां

भर०—( समाश्वस्य )

भ्रातव्या, मणिपादुके मम पुरस्कृत्य, त्वया मेदिनी,
वस्तव्यं च वने चतुर्दश मया वर्षाणि ताताज्ञया;
कामं पूरयितुं ततस्तव भुवं शास्मीति मां लालयन्,
यातीयं न निवर्तयेद्यदि पुनः, शोकं सहिष्ये कथं १ २३

तदहमिदानीमनलं प्रवेक्ष्यामि.

शत्रु०( समाश्वस्य ) कः पुनरन्योऽस्य प्रतीकारः १ ( भरतं प्रत्यंजलिं बध्वा )

आर्येणार्योनुगमितो यथा रामेण लक्ष्मणः,
तथानुगमय त्वं मां प्रवेक्ष्यन्नार्य पावकं. २४

### श्लोक.

तें वक्त्र स्फुटशारदेंदुपरि[1], तीं दीर्घंहि नेत्राबुजें,
ते बाहू अतिनील गारुडमणिस्तंभापरी[2] दीर्घ जे,
लक्ष्मीहस्तगतांबुजापरि[3] हि तें नैर्मल्यशाली असे
पादाब्जद्वय, राम नष्ट[4] ह्मणुनी आतां न मातें दिसे.

( असें ह्मणून मूर्छित होतो. )

**शूर्प०**—(मनांत ह्म०) मी तर ते सर्व अवयव पाहिले ना? पण माझा मनोरथ कोठें पूर्ण झाला? (मोठ्यानें ह्म०) वत्सा शत्रुघ्ना, सावध हो, सावध हो. तूं सावध होऊन या भरतालाही सावध कर. आणि याचा शोक दूर होईल असा कांहीं उपाय शोध.

**भरत.**—( सावध होऊन ह्म० )

### श्लोक.

"राज्यीं स्थापुनि पादुका मम, धरा सांभाळ तूंची बरें,
ताताज्ञा करुनी चतुर्दशसमा रानांत राहीन रे,
त्वत्प्रीत्यर्थ करीन राज्य मग मी" सांगोनि मातें असा,
गेला तोहि पुन्हा नये परतुनी, तो शोक सोसूं कसा ?

तर आतां मी अग्निप्रवेश करितों.

**शत्रु०**—(सावध होऊन ह्म०) खरेंच, शोकनिवारणार्थ याहून दुसरा उपाय कोणता आहे ? ( भरताला हात जोडून ह्मणतो. )

### श्लोक.

आर्या सौमित्रिनें केलें रामानुगमना[5] जसें,
आज्ञापावें[6] मला तुम्ही स्वीयानुगमना[7] तसें.

---

टीप.—१ शरत्काळच्या चंद्राप्रमाणें. २ पाचूचे मण्याचे खांबाप्रमाणें लांब. ३ लक्ष्मीच्या हातांतील कमला प्रमाणें निर्मल. ४ मेला. ५ रामाबरोबर मृत्यु पावणें. ६ आज्ञा करावी. ७ आपल्याबरोबर अग्निकुंडांत उडी टाकण्यास.

**शूर्प०**—( सहर्षं स्व० ) एतदर्थः खल्वयं ममारंभः. ( प्र० ) वत्स भरत, सम्यगवधारितं भवता. वत्स शत्रुघ्न, भवतापि प्रतीकारः साधु चिंतितः. अहमपि तपसे न गमिष्यामि.

सुग्रीवविहितः शोको ममाप्येव सुहृत्सहः

अतोऽनलं प्रवेक्ष्यंतावनुयास्याम्यहं युवां.

**भरतः**—हा वत्स लक्ष्मण,

येनार्यस्य तदानुरुध्य हृदयं, क्षांतं पितुश्चेष्टितं;

माता मे न नियंत्रिता बलवता नोत्सारिता मंथरा ;

आर्यश्चानुगतः पुरादिव वने, नाके समीकांगनात्,

स त्वं दर्शितभक्तिरार्यविषये धन्योऽसि, नाहं तथा. २६

वत्स शत्रुघ्न,

कृच्छ्रेणेदमजप्रजाधिपकुलं शांताकुटुंबी मुनि-

र्वत्सापत्यमवर्द्धयत्करुणया कुर्वन्नपत्योदयं.

हा किं करोमि मंदभाग्यः ?

रामाद्येषु गतेषु च त्रिषु ततोऽपत्येषु गत्या विधे-

स्तुर्यस्त्वं नय जीवितात्पितृजनतृप्तिं निवापांबुभिः. २७

**शूर्प०**-(स्व०) कथं शत्रुघ्नो जीविष्यति ? हंत किं व्यर्थ एव भविष्यति मे मनोरथः ? ( प्र०) वत्स भरत, तवेव शत्रुघ्नस्यापि शोकभारः. तन्मन्ये वृथैवायं नियोग इति.

**शूर्प०**—( हर्ष पावून मनांत म्ह० ) एवढ्यासाठींच तर मी इतका प्रयत्न करीत आहें. (मोठ्यानें म्हणते) वत्सा **भरता**, तूं हा उत्तम विचार केला. वत्सा **शत्रुघ्ना**, तूंही शोकाचा प्रतीकार चांगला योजिला. शाबास ! मीही आतां तप करायास जात नाहीं, तर

**श्लोक.**

**सुग्रीव**निधनें शोक मला झाला सुदुस्तर,
तुम्हा मागुनि येतें मी अग्निकुंडींच सत्वर.

**भरत.**— हा वत्सा **लक्ष्मणा,**

**श्लोक.**

ताताचें[1] कुतिला निजाग्रजमतें[2] त्वां साहिलें आदरें,
माझी माय न दंडिली, हुसकिलें नाहीं तसें मंथरे,
आर्यामागुनि पत्तनांतुनि वनीं गेलास, युद्धांतुनी
स्वर्गीं[3] ही; दृढभक्त तूंच असशी, तैसा न मी या जनीं.

म्हणून खरा धन्य तूंच होस. वत्सा **शत्रुघ्ना,**

**श्लोक.** ( पूर्वार्ध )

वंशाची **अज**नामका नृपतिच्या वृद्धी अपत्योदयें
केली कर्मठ **ऋष्यशृंग**मुनिनें यज्ञा करोनी स्वयें,

अरेरे ! ऱ्या मंदभाग्यानें काय तरी करावें ?

**श्लोक.** ( उत्तरार्ध )

आतां मी अणि **रामलक्ष्मण** तिघे दैवेंचि मेलों निके,
चौथा तूं तरि राहुनी स्वपितरां तर्पीं निवापोदकें[4].

**शूर्प०**— (मनांत म्ह०)काय! **शत्रुघ्न** जिवंतच राहतो कीं काय बाई! हायहाय ! असें झालें तर माझा मनोरथ सर्व व्यर्थ होईल. ( मोठ्यानें म्हणते ) जसा तुला अतिशय शोक झाला, तसाच **शत्रुघ्ना**लाही झाला आहे. याजकरितां तूं जें त्याला मागें राहण्यास सांगतोस, ही गोष्ट व्यर्थ आहे. त्याच्यानें कसें राहवेल बरें ?

---

टीप—१ दशरथाचे. २ रामाच्या अभिप्रायावरून. ३ जसा पत्तनांतून (नगरांतून) वनास गेलास तसा युद्धांतून स्वर्गास गेलास. ४ तिलांजली देऊन.

शत्रु०— ( सास्रं )

प्रियापत्येषु युष्मासु गतेषु, रुदतः पितॄन्

निवापसलिलैर्बालः कथं तर्पयितुं क्षमः । २८

तदहमनलं प्रवेष्टुमार्यस्य पुरःसरो भविष्यामि.

शूर्प०— वत्स शत्रुघ्न, तेन हि त्वमेतामिधनानलयोरानयनाय.

भरत०— कष्टं भोः कष्टं !

मातः कौशलनंदने, निरपराधौ मन्यासि शोकाम्बुधौ,

कैकेयि त्वमकीर्तिपंकपतितैराचंद्रतारं वस.

पुत्रो द्वावपि सत्यजन्यसि । पुत्रं मांतु, सुमित्रेपि किं ।

सर्वानर्थवहे नु भुंक्ष्व नरकं हा कैकाकिनी मंथरे. २९

हा तात, पुरुहूतप्रियसख,

वर्द्धितुं चतुरो वत्तान्सुता जनयता त्वया

आर्य प्रेषयतारण्ये नाशितं न च रघोः कुलं. ३०

शत्रु०— किमनेन प्रलापेन । संपाद्यंते तावदिंधनानि हुताशनश्च.

( इति निष्क्रम्य प्रविश्य ) आर्य, द्वारदेशे शुष्केंधनसमिद्धो भगवाञ्जातवेदाः ।

भरत— प्रियं मे.

शूर्प०—( स्व० ) प्रियमितोप्यधिकं मे ( प्र० ) वत्स, तदुपधीय तामनलप्रवेशाय.

**शत्रुघ्न**— ( आसवें ढाळून म्ह० )

**आर्या.**

तुम्हापरियोग्य मुलें मेलीं म्हणुनी वडील रडतील.
त्यांना उदकें द्याया कैसा हा बाळ शक्त होईल ?
तस्मात् अग्निप्रवेश करण्याविषयीं मी तर आर्यांच्याही पुढें होणार.

**शूर्प०**— वत्सा शत्रुघ्ना, तर मग आतां इंधनें व अग्नि आणण्याची त्वरा करावी. उगाच उशीर कशाला ?

**भरत**— हरहर ! दैवा काय दुःख हें ?

**श्लोक.**

**कौसल्ये**[1], अयि, तूं बुडालिस अजी शोकाब्धिमध्यें अहा !
**कैकेयी**[1], अपकीर्तिपंकिं बुडुनी पापव्रजीं तूं रहा.
झाले नंदन दोन, शोक तुजला द्याया, **सुमित्रे** वृथा !
सर्वानर्थद **मंथरे**[1], यमपुरा जावोनि भोगीं व्यथा.
हा **पुरुहूत**प्रियसख्या,

**आर्या.**

रघुवंश वाढवाया केले उत्पन्न तूंचि सुत चार,
परि आर्या[2] वनिं धाडुनि तया बुडविलें तुवांचि साचार.

**शत्रुघ्न**— दादा, असा व्यर्थ आक्रोश करून उपयोग काय ? आतां इंधनें आणि अग्नि घेऊनि येतों (असें म्हणून बाहेर जाऊन आंत येतो व म्हणतो) दादा, दारापाशीं चांगलीं कोरडीं कोरडीं लांकडें जमा करून भगवान् अग्नि नारायण प्रदीप्त केला आहे.

**भरत**— फार उत्तम, तें आम्हास प्रियच आहे.

**शूर्प०**— ( मनांत म्ह० ) मला तर, बाबा, हें तुजपेक्षांही अधिक प्रिय आहे. ( मोठ्यानें म्हणते ) वत्सा, तर आतां अग्निप्रवेशाची सिद्धता करावी.

---

टीप- १ हीं सर्व संबोधनें आहेत. २ रामाला.

भरतः— अयि तापसि, तत्रभवत्या सविनयमरविंदबांधवकुलपरम-

गुरुररुंधतीजानिरवगमयितव्यो भरतस्य संदेशं.

शू०— ( स्व० सानंदं ) अनेन हेतुना सुपरिहारो ममानलप्रवेशः।

( प्र० ) अथकिं ?

भरतः—

> अद्यारभ्य महात्मनेव मनुना पृथ्वी स्वयं पालिता
>
> द्रष्टव्या भवता, यथा न च तथा शोचंति मे मातरः,
>
> दिव्यं धाम यथा वसेय वयमप्याशासितव्यास्तथा,
>
> शोचंस्त्वार्यमनुप्रयामि यदहं शत्रुघ्नमित्रोऽधुना. ३९

शूर्प०— ( स्व० ) फलतीव मे मनोरथः। ( प्र० ) किमिदं संदेष्टव्यं?

स्वयमेवायमृषिः सर्वं जानाति ( इत्यग्निं प्रदक्षिणीकरोति ).

शत्रु०— पर्णादिन्याचरितव्यमार्यसंदिष्टं. प्रथममावामेव प्रवेश्याव.

शूर्प०— ( स्व० ) बढीयानेतयोरयं व्यवसायः. तन्न मे किंचिदिह

कृत्यमवशिष्यते. ( प्र० ) नातिलंघनीयं युवयोरनुशासनं, विशेषे-

णास्यां दशायां ( इति निष्क्रांता ).

भरत.—अगे तापसी, सूर्यवंशाचा कुलगुरु असा अरुंधतीचा पति जो भगवान् वसिष्ठ ऋषि त्याला विनंतिपूर्वक हा येवढा भरताचा निरोप कळवावा.

शूर्पण०—(हर्ष पावून मनांत) बरेंच झालें ? अग्निप्रवेश करण्याची मला टाळाटाळी करायाची होतीच. तिला आतां हें निमित्त चांगलें मिळालें । ( मोठ्यानें ) बरें आहे. कळवितें. काय निरोप ?

भरत.—

### श्लोक.

पाळावी क्षिति आजपासुनि तुम्हीं न्यायें मनूचे परी,
माझ्या या जननी बुडोत न महाशोकार्णवा भीतरीं,
साधा योग असा, सुदिव्य पद कीं आम्हां कृपेनें मिळे;
शत्रुघ्नासह अग्निकाष्ठ गिळितों मी रामशोकामुळें.

शूर्प०—( मनांत० ) माझा मनोरथ बहुत करून आतां सफळ होतो, असें खचित दिसतें. ( मोठ्यानें ) निरोप सांगणें तरी कशाला पाहिजे ? तो ऋषीश्वर स्वतां सर्वज्ञच आहे. यास्तव त्याला सर्व कळतेंच आहे. असें ह्मणून अग्नीला प्रदक्षिणा करायास लागते. )

शत्रु०—अगे पर्णावित्ती, भरतदादा सांगतात, त्याप्रमाणें आधी निरोप सांगायास जा. पहिल्यानें अग्निप्रवेश आम्हींच करितों.

शूर्प०—( मनांत ) हीं ! आतां बरीक यांचा अग्निप्रवेश करण्याविषयींचा दृढ निश्चय झाला. आतां या उपर येथें आपल्यास कांहीं कर्त्तव्य उरलें नाहीं. ( मोठ्यानें ) काय करावें बाई ? माझ्यानें तुमचें वचन मोडवत नाहीं. त्यांत विशेषें करून तुम्हांवर असा प्रसंग येऊन पडला, तेव्हां यावेळीं नाहीं कसें ह्मणूं ? जातें तर. ( असें ह्मणून निघून जाते. )

**उभौ—** ( अग्निं प्रदक्षिणीकुरुतः )

( नेपथ्ये )

वनं व्रजंतं पितुराज्ञया मे वत्सा कथं नाथमनुव्रजंती

दुःखं व्यसोढेति विषीदतो मे रक्षोऽहृताभूदिव वज्रपातः. ३२

**भरतः—** कथमसौ जनकराजः संप्राप्तः। ( पुनर्नेपथ्ये ) भो भो

माहेश्वरप्रवर,

लंकानाथ, भवन्नपि प्रियसखस्त्वं वीतशंकं कथं

वत्सां मे हृतवान् ? ब्रुवे किमथवा ? जातिस्तवेयं यथा.

कष्टं भोः कष्टं।

हा वत्से, विजने वने दशमुखं दृष्ट्वा ऽपहारोद्यतं

कौशल्या भयशोकविह्वलतनोः सा ते दशासीत्कथं ? ३३

**शत्रु०—** आर्यामुद्दंधनत्यक्तजीविता न जानात्यार्यो जनकराजः.

**भरतः—** कथमेनमार्यमसंभाव्य युक्तमावयोरनलं प्रवेष्टुं ?

( इति प्रतीक्षमाणस्तिष्ठति ).

( प्रविश्य जनकः )

**जनकः—** अहो, कथमेतत् ?

अग्निं प्रदक्षिणीकुर्वन्नुच्चावचशिखाकुलं

भरतोऽयं सह भ्रात्रा प्रविशन्निव लक्ष्यते। ३४

( इति त्वरितमुपसर्पति ).

**उभौ—** आर्य, तत्रभवंतमभिवादयावहे.

**दोघे.**—( अग्नीला प्रदक्षिणा करितात. इतक्यांत पडद्यापलीकडे शब्द होतो. )

### श्लोक.

आज्ञेनें पितयाचिया रघुपती जातां महाकाननीं,
नेली त्यासह मत्सुता, पण तिला होतील दुःखें मनीं,
ही चिंता बहु वागवीत असतां, लंकापतीनें तिला,
नेलें चोरुनि, वज्रपातसम हा वृत्तांत म्यां ऐकिला.

**भरत.**—काय? हे जनकरावजी आले वाटतें. (पुनः पडद्यापलीकडे शब्द होतो. ) अरे, शिवभक्त शिरोमणे,

### श्लोक.

माझा मित्र असूनिही ममसुता त्वां हारिली, रे, कशी?
किंवा यांत न चित्र, कारण तुझी जातीच कीं राक्षसी.
हरहर!
हा वत्से, विजनीं वनीं दशमुखें नेतां धरूनी तुला
प्राया झालि दशा भयाविकरुनी, तीतें नसे, गे, तुला[1],

**शत्रुघ्न.**— आर्या जानकी वहिनीनें गळफास घेऊन जीव दिला, हें जनकरावजींस ठाऊकच नाहीं.

**भरत.**— अरे हे जनकरावजी येत आहेत, तर यांचा सत्कारपूर्वक निरोप घेतल्याविना आपणास अग्निप्रवेश करणें ठीक नाहीं. (असें ह्मणून त्यांची वाट पहात उभा राहतो. )

**जनक.**— ( पडद्याच्या बाहेर येऊन ) अहो हें काय?

### आर्या.

अग्नि प्रदीप्त करुनी दोघे त्याला प्रदक्षिणा करित,
वाटे घालित आहे त्यांत उडीतें सबंधु हा भरत.
( असें ह्मणून लौकर लौकर जवळ जातो. )

**दोघे.**— रावजी, आह्मी चरणांप्रत वंदन करितों. महाराज,

---

टीप.—१ तुलना.

चरमो ऽयं प्रणामस्ते, यदावां जहिवस्तनुं,

हतौ हि राक्षसैरास्तां मायया रामलक्ष्मणौ. ३५

जनकः— हा हतोस्मि मंदभाग्यः ( इति मूर्च्छति )

उभौ— समाश्वसिहि, समाश्वसिहि.

जन०— ( समाश्वस्य )

दीर्घायुषा विजयिना भवितव्यमस्या

भूजन्मनः सहचरेण, तथोर्मिलायाः,

इत्यब्रुवन् ग्रहगतिज्ञजना यदेतद्

आसीन्मृषैव मम भाग्यविपर्ययेण. ३६

हंत हंत !

अद्यैतद्दर्शनं यन्मे याज्ञवल्क्यानुशासनं,

तदपि क्वचिदेवास्ते, शोकोऽयं हंति मां क्वचित्. ३७

शत्रु०— आर्या सीतापि- ( इत्यर्द्धोक्ते सबाष्पकंठस्तिष्ठति )

जन०— यदि सापि गता तर्हि म्रियेत, तथापि परितप्यते मे हृदयं.

शत्रु०— परंतु बंधनेन.

जन०— कथं वत्सायाः एवं जातं !

आर्या.

प्रणाम हा शेवटला, आह्मी देहास वाकितों आतां,
सौमित्रि राम दोघे वधिले मार्गे निशाचरीं ताता.

**जनक—** अरेरे ! घात झाला रे मज मंदभाग्याचा घात झाला ! हाय हाय ! काय करूं आतां ?

(असें ह्मणून मूर्च्छित होतो.)

**दोघे.—** सावध व्हा, रावजी, सावध व्हा !

**जनक—** (सावध होऊन)

श्लोक.

दीर्घायु आणि विजयी पति जानकीचा,
तैसाचि होइल पती तव ऊर्मिलेचा,
दैवज्ञवर्ग वदला मज हें कसारे ?
झालें मदीय विधिनें लटिकेंच सारें !

हाय हाय !

आर्या.

याचें दर्शन आणि जें अनुशासन याज्ञवल्क्यकृत मज ला,
तें गेलें एकिकडे, हा कैसा शोक मधिच उद्भवला !

**शत्रुघ्न.—** आर्या, सीता वहिनीहि— (असें अर्धेच वाक्य बोलून सद्गदित होऊन उभा राहतो).

**जनक—** जर तीही गेली असली तर आह्माला ती गोष्ट इष्टच आहे. तथापि पोटांत वेठ उभे राहतात. काय करावें ?

**शत्रुघ्न—** गेली तर गेली, पण ती गळफांस घेऊन कीं हो गेली !

**जनक.—** काय ! वत्सेचा अशा रीतीनें परिणाम झाला काय ? (तिच्या बाळपणींची आठवण करून ह्मणतो.)

दृष्टव्यदंतमुकुलं, दरहासरम्यं,
लंबालकं, तरलरत्नललंतिकं च,
वक्त्रांबुजं तव शिशोरवलंब्य, वत्से,
संतापमेति हृदयं, बत, किंकरोमि ! ३८

( सनिःश्वासं ).

शृण्वन् रक्षोहृतां सीतां भरतो मे शपन्नृपाः
प्रस्थाप्यंते रिपूञ्जेतुमिति तुष्टोस्म्यहं वृथा. ३९

तदिदानीं

अनेन युवयोरंते संभृतेनैव वह्निना
कवलीकृतदेहोहं तरेयं शोकसागरं ४०

भरतः— मम खल्विदं प्रथमं.

आर्यस्योपगमालाभादसंपूर्णमनोरथः
ज्वलनं प्रविशाम्येवं जटाभिर्वल्कलेन च. ४१

जनकः शत्रुघ्नश्च— अतिकरुणमिदमस्य वचनमवकीर्यते.

( नेपथ्ये )

हत्वा दशाननमवाप्य विदेहकन्याम्,
आसाद्य कीर्तिमृषिदैवतगीयमानां,
आरुह्य पुष्पकमुपैति सलक्ष्मणोयं
रामः कृती, भरत, माविश हव्यवाहं. ४२

श्लोक.

शिशुपणीं जंव तूं हंससी मृदू, वदन सुंदरता किति ती वदूं;
हिरकण्यापरि दंत विराजती, कुटिल कुंतल केशहि शोभती,
हंसुनि हालविसी जंव मस्तका, विजवराहि हले तंव तो निका,
अठवितां तव बाळपणा, असें ह्रदय तप्त अजी बहु होतसे.

हाय हाय! काय करूं रे? ( निःश्वास टाकून स्व० ) हरहर.

श्लोक.

नेली **सीता** राक्षसें चोरुनीयां, आणावी ती त्याजला मारुनीयां,
या हेतूनें धाडितो हा नृपाला ऐकोनी हें व्यर्थ संतोष झाला.

तस्मात् आतां,

श्लोक.

तुमचिया जवळी बहु पेटला अनल, हाचि बरा मज वाटला,
त्वरित घालुनि यांत उडी, पहा, तरुनि जाइन शोकसमुद्र हा.

**भरत**— पहिल्या प्रथम तर मी उडी घालणार. त्यांत अंतर व्हायाचें नाहीं.

आर्या.

आर्य न आला म्हणुनी झाला मत्काम भग्न हा आजी,
सजव सवल्कल यास्तव तनुही होमीन पावकामाजी.

**जनक** व **शत्रुघ्न**— काय हा दीनवाणी होऊन बोलत आहे पहा!

( इतक्यांत पडद्या पलीकडे **हनुमान्** बोलतो. )

श्लोक.

मारोनि **रावण**, अणी **जन**कात्मजेला,
घेऊन कीर्तिहि, सुरादिक गाति जीला,
बैसोनि पुष्पकिं सबांधव येइ **राम**,
अग्निप्रवेशविधिचें, **भरता**, न काम.

शत्रु०—( अवलोक्य ) क एष वर्णी प्रियमावेदयति ?

जनकः— ( सहर्षं ) वत्स भरत, मा त्वरस्व मा त्वरस्व, श्रूयते हि कल्याणी वाणी.

भरतः—( विलोक्य आर्य मा मैवं.

विप्रियं श्रावयित्वा प्रागज्ञानादनुतप्तया
प्रियं निवेद्यते भूयस्तापस्या वर्णिरूपया. ४३

तदेतन्मिथ्या. ( इति त्वरितमग्निमुपसर्पति )

( प्रविश्य पवाक्षेपेण वर्णिरूपो हनूमान् )

हनूमा०—भरत, मा मैवं. कथमहेतुकः क्रियारंभः ? ( इति निवार्य ) शृणु तावत्,

रक्षःसैन्यपतिं प्रहस्तमवधीन्नीलश्चमूनायको,
देवेनावधि कुंभकर्ण इति यो ख्यातो दशास्यानुजः
सौमित्रिः कृतरावणात्मजवधः सर्वैस्तुतः खेचरै-
र्लब्धा लूनदशाननेन विभुना सीता जयश्रीरिव. ४४

तद नुभोक्ष्यते भवान् सदारानुजरामोपगमकंदलितमानंदं.

**शत्रुघ्न**—( पाहून ह्म० ) हा कोण ब्रह्मचारी प्रियवार्ता सांगत आहे?

**जनक**.— ( हर्ष पावून ह्म० ) वत्सा **भरता**, थांब थांब अग्मळ घाई करूं नको. शुभवार्ता ऐकण्यांत येत आहे.

**भरत**— रावजी, यांत कांहीं अर्थ नाहीं.

## आर्या.

अप्रिय वार्ता बोलुनि गेली जे तापसी न जाणुनि, हा
द्विजवेष घेउनी ही वदते प्रिय तीच सानुताप[1] पहा.

याजकरितां हें सर्व मिथ्या आहे. ( असें ह्मणून लौकर लौकर अग्नीच्या जवळ जातो. )

( इतक्यांत पडदा पलीकडे सारून ब्रह्मचाऱ्याच्या रूपानें **हनूमान्** प्रवेश करितो. )

**हनूमान्**— **भरता**, हें काय करितोस? कारण नसतां भलतीच गोष्ट करणें यास काय ह्मणावें? हो तर मागें. ( असें ह्मणून त्याला धरितो व ह्मणतो ) आतां वर्तमान ऐकून घे.

## श्लोक.

रक्षःसैन्यपती **प्रहस्त**[2] वधिला **नीलें**[3] चमूनायकें,
श्रीरामें वधिलें **दशास्यसहजा**[4] त्या **कुंभकर्णा** निकें,
**सौमित्री** वधि **पंक्तिवक्त्रतनुजा**[5], तैसी प्रभूनें खरी
**सीता** मेळविली **दशास्य** वधुनी अंतीं जयश्रीपरी[6]

असा जय मिळाला, त्याकाळीं संपूर्ण देव **श्रीरामचंद्रा**ची स्तुति करिते झाले. असो. आतां तो भार्या व बंधु यांसहवर्तमान समीप प्राप्त झाला आहे. यास्तव तो आनंद त्वां भोगावा. तें टाकून तूं हें काय करीत आहेस?

---

टीप–१ पश्चात्ताप पावून. २ राक्षससेनापती प्रहस्तनामा. ३ नीलनामें वानरानें. ४ रावणाचा भाऊ. ५ इंद्रजिताला. ६ विजयलक्ष्मीप्रमाणें.

भरतः— मायारणप्रवीणशोणपगणे कथमार्यस्य तादृशः स उपगमो नाम ?

हनूमा० — दैवबलमुपेयुषि रामे न प्रभवति मायाबलं राक्षसानां. तर्हि श्रूयतां.

> कपटवटुना काकुत्स्थौ तौ दशाननसूनुना
>
> प्रथमसमरे बद्धावास्तां भुजंगमयैः शरैः

शत्रु०— इदमेव तापस्यान्यथा श्रुतमस्यामूलापरिज्ञानात् उद्वेजितं वयमिति मन्ये.

भरतः— ततस्ततः ?

हनू०—

> तदनु विनतापुत्रो वृत्रारिणा प्रहितो रणे,

भरतः— वत्स त्वया विज्ञापितवसिष्ठमिश्रवचनं संभवतीदानीं.

हनू०—

> सदुपगमनाद्बद्धौ युद्धोद्यमोपरुजोस्तयोः. ४५

शत्रु०— कथं भगवति गरुत्मत्युपसर्पति नागसर्पेषु सर्पमयाः सायकाः ।

**भरत**— मायायुद्धाविषयीं राक्षस मोठे निपुण, त्यांच्या हातून सुटून आर्य **रामचंद्राचें** परत येणें कोठून होणार ? ही गोष्ट घडण्याची नाहीं.

**हनूमान्**— **रामचंद्राला** दैवबल अनुकूल झालें, त्यापुढें राक्षसीमायेचें बळ काय चालतें, तें कांहींच चाललें नाहीं ? कसें ह्मणसील तर ऐक.

## आर्या.

माया निपुणशिरोमणि राक्षसपतिसूनु[1] **इंद्रजिन्नामा**,
त्याणें भुजंगबाणीं बांधियलें अधि **सलक्ष्मणा रामा**.

**शत्रुघ्न**— हां, हेंच तापसीनें बरवें ऐकिलें, पुढचें खरें काय झालें; याचें परिज्ञान न झाल्यामुळें आपणही उद्विग्न होऊन गेलों.

**भरत**— बरें, मग काय झालें ?

**हनूमान्**—

## आर्या. ( पूर्वार्ध. )

तेंव समरीं इंद्रानें पाठविला **गरुड** सर्प माराया,

**भरत**— वत्सा, तूं जें मघां ह्मटलें कीं **वसिष्ठ** गुरुजींनीं हा गरुडाच्या पंखाचा वारा, हा औत्पातिक वायु नव्हे, ह्मणून सांगितलें ती गोष्ट आतां पटली.

**हनूमान्**—

## आर्या. ( उत्तरार्ध ).

तो येतांचि रणोद्यम दोघांचा चालु जाहला, राया.

**शत्रुघ्न**— प्रत्यक्ष भगवान् **गरुड** आल्यावर सर्पमय बाण कसे दूर पळणार नाहींत बरें ?

---

टीप—१ रावणपुत्र.

**भरतः**—( सहर्षं ) विदितेदानीमार्येण कार्यार्थिता दशमुखनिपातकांक्षिणः शतमखस्य. य एवमार्यरक्षणाय पक्षिणां प्रभुं प्राहिणोत्.

**जनकः**—( सहर्षं ) कथयतु भवान्निर्व्याजमस्मत्प्राणदाता किंनामधेयो वर्णिवरः ?

**हनू०**—

सुग्रीवसचिवो नाम्ना हनूमानिति मारुतिः,
भरतस्यांतिकं यं स प्राहिणोद्रावणांतकः. ४६

**जनकः**—

याज्ञवल्क्य इव त्वं मे माननीयोसि, मारुते,
स इवाधिगमद्विद्यां सवितुर्यस्त्वमीममात्. ४७

**शत्रु०**—( सविस्मयं ) ननु तापस्या पर्णादिन्या ससैनिकसचिवस्य सुग्रीवस्य लंकारणे यातुधानैर्विनिपात उक्तः. तत्कथं हनुमतो जीवनं नाम ?

**हनू०**— का नाम पर्णादिनी ?

**शत्रु०**— या ऋष्यमूकगिरिवास्तव्या, यस्याश्च सुग्रीवादयः सुहृदः

**हनू०**—( स्वग० ) नैवंविधा काचिदस्ति. ( विचिंत्य ) एतया शूर्पणखया भवितव्यं, या दशग्रीवकुंभकर्णादिवधेन बिभीषणराज्यलाभेन च दुर्मनायत इत्यमात्यसंपातिनोक्तं. तस्याः किलायं भरतशत्रुघ्नयोः

भरत.— ( हर्षित होऊन म्ह० ) आर्यरामचंद्रापासीं इंद्राची कार्यार्थिता कोणती ती आतां ध्यानांत आली. त्याचे हातानें रावणाचा वध करावयाचा होता ह्मणून त्याचा रक्षणार्थ गरुडास पाठविलें.

जनक— ( हर्ष पावून म्ह० ) हे ब्रह्मचारिश्रेष्ठा, निर्व्याजपणें तूं अह्मांला आज जीवदान दिलें, आतां तुझें नांव काय तें सांगावें तेंवढें ?

हनूमान्—

आर्या.

माझें नांव हनूमान् सुग्रीवामात्य मीच वायुसुत.
भरतांप्रत पाठविलें मज रामें यत्पदाब्ज[1] देवनुत[2].

जनक.— आर्या.

ऋषि याज्ञवल्क्य मजला पूज्य, तसा तूंहि पूज्य मज जाणें,
त्याचे परि रविपासुनि विद्या संपादिली असे ज्याणें.

शत्रुघ्न.— ( विस्मित होऊन म्ह० ) अहो, तापसी पर्णादिनीनें तर सैनिक व सचिव यां सर्वांसुद्धां सुग्रीवाचा लंकानगरीच्या रणांत राक्षसांनीं नाश करून टाकिला ह्मणून सांगितलें; मग हनूमान् जिवंत राहिला हें कसें ?

हनू०— पर्णादिनी ही कोण ब्वा !

शत्रु०— जी ऋष्यमूक पर्वतावर राहते, व सुग्रीवादिक हे जिचे सुह्रद आहेत, ती तुह्मांला कसी ठाऊक नाहीं ?

हनू०-(मनांत म्ह०) असी तर तेथें कोणी नाहीं. (विचार करून) हां! ती शूर्पणखा असेल! रावण कुंभकर्णांचा वध झाला आणि बिभीषणाला राज्य मिळालें, म्हणून ती खिन्न झाली आहे, असें अमात्य संपातीनें सांगितलें होतें खरें. तिणेंच भरत व शत्रुघ्न

टीप—१ ज्या रामाचें पादकमल. २ देवांनींही स्तुत.

समापनाय यत्नो भवेत्. (प्र० ) सा खलु देवे दशग्रीवविजयिन्य मर्षेण गृहीततापसीवेषा तद्भगिनी शूर्पणखा. यथा ननु भवताम प्रियमिदं निवेदितं.

**भरत**.—युज्यत एवैतत्, अनया खल्वात्मनः पुलस्त्यकुलप्रसूतिरुक्ता ।

**हनू**.—भरत, दृश्यतामसौ लंकेश्वरविजयी सीतया परिजनेन च सह पुष्पकमारूढो मेघाध्वनोपसर्पति.

( सर्वे साश्चर्यं पश्यंति ).

**हनू**०—नन्विदानीं

द्रष्टव्या भरत, द्रुमाद्द्रुममभिप्लुत्योद्धतं सत्वरा
त्वद्भ्रातुः प्लवगाच्छभल्लुनिबिडा सेनेयमासीदिति.
यत्पातोत्पतनप्रयुक्तविटपानत्युल्लतिव्याजतो
नंदिग्रामसमीपविभ्रसवनं नूनं मुदा नृत्यति. ४८

**जनकः**— कथं वत्सया सीतयालंकृतवामभागो वत्सरामभद्रो लक्ष्मणेन परिजनैश्च समवतीर्ण एव पुष्पकात् ।

**भरतः**— ( दृष्ट्वा सहर्षं )

कालाद्दृष्टो कमललोचनमविकल्प्या कांतालिकेक्षणपरोक्षितिकामरूपं
आर्यं नवांबुदकदंबविडंबितांगमालोक्य संप्रति सुधाभिरिवाप्लुतोऽस्मि ४९

पास सारून वाकावें म्हणून हा उद्योग केला असेल. (मोठ्यानें स०) अहो, ती रावणाची बहीण **शूर्पणखा** बरें. देव **रामचंद्र** याणें **रावणाला** मारिलें, त्या रोषानें तिनें तापसीचें रूप घेतलें, आणि तुह्माला ही असी अप्रियवार्त्ता सांगितली, हीच गोष्ट खरी.

**भरत.**— होय होय, हाच तर्क बरोबर आहे. तिनेंही मी **पुलस्त्य** कुलांत उत्पन्न झालें ह्मणून सांगीतलें होतें.

**हनूमान्-भरता,** पहा पहा, हा **लंकेश्वराला** जिंकणारा देव **रामचंद्र, सीता** व सेवकजन यांसह, **पुष्पक**विमानांत बसून आकाशमार्गानें कसा येत आहे तो ?

( सारे आश्चर्ययुक्त होऊन पाहतात. )

**हनूमान्—** **आर्या.**

एके वृक्षावरुनी दुसऱ्या वृक्षीं असे उड्या घेत,
वानरभल्लुकसेना त्वद्भ्रात्याची समीप ही येत.
त्यांच्या उड्डाणें हे लवति पुन्हा उंच होति वृक्ष कसे ।
**नंदिग्राम** निकटिंचें वन या व्याजें[1] जसें किं नाचतसे.

**जनक.**—काय ? वत्सा **सीता** बसल्यामुळें ज्याचा वामांक अलंकृत झाला आहे, असा हा वत्स **रामभद्र, लक्ष्मण** व परिजन यांसहित **पुष्पक**विमानांतून उतरला देखील ।

**भरत.**— ( पाहून हर्षानें ह्मणतो. )

**श्लोक.**

विमलकमल नेत्रें, रूप कामापरी हें,
सजलजलदतुल्य[2] श्याम जें अंग आहे,
नयनिं बहुदिनांनीं पाहिलें याच योगें,
अजि जसिं अमृतेंचि स्नात होती मदंगें.

---

टीप—१ मिषानें. २ सजलमेघाप्रमाणें.

**शत्रु०—**

स्यादर्थेदमिदं नेति कः फलं वेत्ति कर्मणां ?
मग्नमग्निप्रवेशार्तैर्यदस्माभिः सुधांबुधौ. ५०

( ततः प्रविशति यथानिर्दिष्टो रामः )

**रामः—**अये जानकि,

सिंधोःसेतुमतीत्य योजनशतं, तीर्त्वा महेंद्राचलं,
शैलं प्रस्रवणं विलंघ्य, विपुलामाक्रम्य विंध्याटवीं,
उत्तुंगादपि चित्रकूटशिखराद्दूर्ध्वं गृहीताध्वना
नंदिग्राममनेन तीव्रगतिना यानेन नीता वयम्. ५१

किं च

समुद्रमिव निस्तीर्य समरं कपिरक्षसां,
संप्राप्य च शुभांगि त्वां, स्वदेशं प्राप्तवानहं ।५२

**लक्ष्मणः—** आर्य पश्य पश्य. तातजनकेंद्रेण वत्सशत्रुघ्नेन च सह समुत्सर्पत्यसावार्यभरतः. य एषः

जटाकलापं दधदुत्तमांगे, कटीतटे वल्कलमप्यनर्हं,
तपःकृशांगस्त्वददर्शनोत्थः शोकः शरीरीव पुरो विभाति.५३

**रामः—** एवमेवैतत्. किंतु

पौलस्त्येन हृता विदेहतनयेत्येवं यदासीत्पुरा
शल्यं तन्मम तावदुद्धृतममूत्त्रोचितैः कर्मभिः,
यद्भ्रातर्यद्भरतः श्रियं परिहरंल्लब्धामपि क्लिश्यते
मद्भक्तोरिति सांप्रतं तदपि मे दिष्ट्या भवत्युद्धृतं ५४

**शत्रुघ्न—**

**आर्या.**

कर्म केव्हां कैसें होइल हें कोण पुरुष जाणतसे ?
अग्निप्रवेशसमर्थी बुडलों आह्मी सुधाब्धिमाजि कसे !

( तदनंतर पूर्वी वर्णिल्याप्रमाणें **राम** पडद्याबाहेर येतो. )

**राम**—अगे **जानकी,**

**श्लोक.**

सेतू शंभर योजनें उदधिचा, तैसा **महेंद्राद्रि** हा,
शैल **प्रस्रवणाख्य,** लंघुनि तसी **विंध्याटवी** ही महा,
खालीं टाकुनि **चित्रकूट**शिखरा, आकाशमार्गें असे
आलों आपण **नंदिपुरीं** सखये शिघ्रं विमानें कसे !

अणखी

**आर्या.**

जैसा सागर तरलों, तैसा कपिराक्षसेंद्रसंगर हा,
घेउनि, शुभांगि, तुजला आलों निजदेशिं येथ सुस्थ रहा.

**लक्ष्मण**— दादा पहा पहा, **जनकरावजी** व वत्स **शत्रुघ्न** यां-
सहवर्तमान आर्य **भरत** आपल्याकडे येत आहे, तो तुमच्या
वियोगानें कसा दिसतो पहा !

**श्लोक.**

शिरीं जटाभार, कटीतटीं हें अयोग्य हीं वल्कल भासताहें,
श्रमें तपाच्या कृश फार अंग, उभा जसा शोकचि हा धृतांग.

**राम**— असेंच खरें, यांत संशय नाहीं. परंतु

**श्लोक.**

**लंकेशें** हरिली **विदेह**तनया तेंव्हांच जें शल्य रे,
झालें प्राप्त, तयास तें उपटिलें त्या त्या उपायीं खरें.
संपत्ती त्यजुनी मदर्थ **भरत** क्लेशास भोगीतसे,
शल्या ह्या दुसऱ्यासही उपटितो दैवप्रभावें असें.

भरतः-(उपसृत्य) आर्य, दशरथप्रियनंदन, भक्तजनवत्सल, सत्यसंध, भरतस्यैष चिरकांक्षितस्त्वत्पादयोः प्रणामः (इति सबाष्पकंठंप्रणमति)

रामः—( सस्नेहानंदं बाहुभ्यां समुत्थाप्य परिष्वजते )

रामभरतौ.—( स्व० )

कर्पूरवापिकागर्भे कलये किं निमज्जनं,
समेतस्य परिष्वंगः शीतली कुरुते तथा.

रामः—( प्र० ) वत्स, दिष्ट्या त्वं दृष्टोसि.

भरतः—( प्रकाशं ) अत एवार्यस्य मयि कृतार्थीकरणाय प्रसादगरिमा.

( रामभरतौ प्रति लक्ष्मणशत्रुघ्नावभिवाद्य गृहीताशिषौ तिष्ठतः )

रामः—( उपसृत्य ) तातजनक, दाशरथिरभिवादये.

लक्ष्मणः—तात, लक्ष्मणः प्रणमति.

सीता.—णमो दे णमो दे.

जनकः—( यथोचितमाशिषा वर्धयन् रामं प्रति सहर्षबाष्पगद्गदं )

वत्स लंकेश्वरविजयिन्,

**भरत**— ( **रामा**च्या जवळ जाऊन ह्मणतो ) अहो आर्य **दशरथ** प्रियनंदन, भक्तजनवत्सल, सत्यप्रतिज्ञ, तुमचे चरणांची वाट हा **भरत** फार दिवस पाहत होता, तो आज आतां त्यांप्रत वंदन करितो ( असें म्हणून सद्गदित होऊन नमन करितो. )

**राम**— ( प्रीतियुक्त व आनंदयुक्त होऊन त्याला हातानें उठवून आलिंगन देतो. )

**राम व भरत**— ( आपआपल्या मनांत म्हणतात )

## आर्या.

> कर्पूरवापिकेच्या गर्भींच स्नान करितसें काय ?
> आलिंगनें ज्याच्या झाला शीतळ तसाचि मत्काय[1] !

**राम**— ( मोठ्यानें बोलतो ) वत्सा, दैव थोर म्हणून तूं भेटलास.

**भरत**— ( मोठ्यानें ह्मणतो ) येवढ्याच करितां तर आर्यांनीं कृतार्थ होण्याकरितां मजवर इतका थोर प्रसाद केला.

( **राम** व **भरत** यांप्रत शत्रुघ्न **लक्ष्मण** हे वंदन करितात, व तेही त्यांस आशीर्वाद देतात. )

**राम**— ( **जन**काजवळ जाऊन ) रावजी, हा **दशरथ**पुत्र आपल्या चरणाप्रत वंदन करितो. )

**लक्ष्मण**— रावजी, मी **लक्ष्म**णही वंदन करितों.

**सीता**— बाबा, मी तुमच्या पायां पडतें.

**जनक**— ( **राम** व **लक्ष्मण** यांस प्रत्येकीं ) वत्स, आयुष्यवान् पुत्रवान् भव. ( **सीते**प्रत ) वत्से, अष्टपुत्रा अखंडसौभाग्यवती भव. ( असे यथोचित आशीर्वाद देतो, व हर्षानें सद्गदित होऊन **रामा**प्रत ह्मणतो ) वत्स **लंकेश्वर**विजयिन्,

---

टीप—१ माझा देह.

वत्साया वीर्यशुल्काया यत्तथा पाणिमग्रहीः,

यश्च वंशे मनोर्जातस्तस्यानुगुणमाचरः. ५५

**रामः**—( सविनयांजलिबंधं ) तात, अलयिदस्तत्रभवतः प्रसादादग-स्त्यवसिष्ठकौशिकप्रभृतीनामृषीणां शीलानुसंधानाद्विप्रादीनाममृता-धसामनुग्रहाच्च निगृहीतो दशकंधरः.

( ततः प्रविशति कौशिकः )

**कौशिकः**—( स्व० ) सफलमद्य मे देवयजनस्य निदेशाचरणं. य-द्रावणो रणे रामभद्रेण निहत इति समाधिदृशा समद्राक्षमहं. तथा खलु मे देवयजनस्य निदेशो यथा,—

रामो यथा भाविदशाननस्य वैरी स्ववंशेन निपातितेन,

यथा वधायास्यच राघवोऽपि स्यात्स्ववानाक्रियतां तथेति. ५६

( इति परिक्रामति )

**रामः**—( दृष्ट्वोपसृत्य ) भगवन्नैक्ष्वाकोऽहमभिवादये.

**कौशिकः**— वत्स, सिध्यतु ते मनोरथः.

( इतरेपि कौशिकं प्रणमंति. सोपि तानाशिषा यथोचितमुपचरति. रामंप्रति संप्रति हि )

जाता महर्षयस्त्राता देवास्त्रातं जगत्त्रयं

त्रैलोक्यकंटकं हत्वा दशकंठं रणे त्वया. ५७

**रामः**—सर्वमिदं भवत्प्रसादात्.

## आर्या

त्वद्वीर्य शुल्कसीतापाणिग्रह आणि मनुकुलीं जनन,

यांना योग्य असी त्वां केली कृति कोण हें ह्मणे जन न ?

**राम.**—( नम्रपणें हात जोडून ह्म० ) रावजी, आपण ब्रह्मवेत्ते अहां, आपल्या प्रसादेंकरून, अगस्ति, वसिष्ठ, कौसिक इत्यादिक ऋषींच्या उपदेशाप्रमाणें वागल्यावरून, आणि इंद्रादिक देवांच्या अनुग्रहेंकरून माझ्या हातानें दशकंधर रावण याचा वध झाला.

( तदनंतर कौशिक पडद्याच्या बाहेर येतो. )

**कौशिक.**—होमसमयीं देवांनीं मला सांगितलें होतें कीं,

## आर्या

स्वजनवध रावण हा येरा होईल रामचंद्राचा,

असाला देखनियां रावणवधदक्ष त्यास करि साचा.

या सांगण्याप्रमाणें मी केलें, तें आज सफळ झालें. कां कीं, रामानें रावणाला युद्धांत मारिलें असें आज समाधि लावून बसलों असतां मला समजलें. ( असें बोलून इकडे तिकडे फिरतो ).

**राम.**—( त्याला पाहून जवळ जातो व ह्मणतो ) भगवन् इक्ष्वाकुकुलोत्पन्न, मी राम तुमच्या चरणाप्रत वंदन करितो.

**कौशि०**—वत्स, चिंतितमनोरथसिद्धिरस्तु.

(इतरही कौशिकाला वंदितात तोही त्यांना यथोचित् आशीर्वाद देतो व रामाप्रत ह्मणतो ).

## आर्या.

त्रैलोक्याला कंटक ऐसा रावण वधुनि तूं ताता,

देवां, महर्षिवर्गा, जगत्त्रयालाहि रक्षिलें आतां

**राम.**—महाराज, हें सर्व आपल्या चरणप्रसादेंकरूनच घडलें.

---

टीप—१तुझा पराक्रम हें जीचें मूल्य अशा सीतेसीं लग्न२ रामाला.

**भरतः**— भगवन्कुशिकनंदन, युष्माभिरिहैव राज्ये समेनमभिषिच्य सोयमयोध्यां प्रवेशयितव्यः.

**जनकः**— अहो विलंबासहता भरतस्य ।

**हनू०**—एते सुग्रीवविभीषणप्रभृतयः स्वामिनः प्रियसुहृदोऽप्येवमुत्कंठन्ते. तदहं त्रिभिर्वानरैः सह समुद्रजलमानयिष्यामि ( इति निष्क्रांतः )

**जनकः**—वत्स शत्रुघ्न, वसिष्ठप्रमुखान्नृपान्पुरोधसो मन्त्रिणश्चोपस्थापय.

**शत्रु०**—तथा ( इति निष्क्रांतः )

**सीता.**— लंकेश्वरविजइणो अज्जउत्तस्स रज्जाहिसेओ त्ति णंदइ मे हिअअं.

( नेपथ्ये )

सज्ज्यंतामभिषववेदिरुचकाः श्रीगंधपुष्पाक्षताः
स्थाप्यंतां शुभवारिपूर्णकलशाश्छत्रं तथा चामरे,
कन्याः काश्चन तत्र संतु, वसतुपाले गजो, वाजिन-
स्ताड्यंतां पटहा यतो रघुपतेः पट्टाभिषेकोऽधुना. ५८

**जनकः**— वसिष्ठादीनां निवेशः,

( प्रविश्य शत्रुघ्नः )

**शत्रुघ्नः**— सर्वे उपस्थिताः.

**भरत.**—भगवंता कुशिकनंदना, आपण आर्य रामचंद्राला आतां येथेंच पट्टाभिषेक करून मग सावकाशपणें अयोध्यापुरींत घेऊन जाऊं.

**जनक.**—काय हो या भरताला उतावीळपणा झाला आहे! अयोध्येंत जाण्याला का फार वेळ पाहिजे? पण तेवढाही विलंब त्याला सोसत नाहीं?

**हनु०**—सुग्रीव बिभीषणप्रभृति जे हे स्वामिरामचंद्राचे प्रियमित्र, यांनाही असीच उत्कंठा झाली आहे. तर मी व अणखी तिघे वानर असे जाऊन चतुःसमुद्रांचें उदक घेऊन येतों. (असें ह्मणून निघून जातो).

**जनक.**—वत्सा शत्रुघ्ना, वसिष्ठादिक ऋषि, उपाध्याय, आणि मंत्रिजन यांना जाऊन घेऊन यावें.

**शत्रु०**—उत्तम आहे. रावजी, घेऊन येतों, (असें ह्मणून निघून जातो).

**सीता.**—लंकेश्वरविजयी जो प्राणनाथ, याजला राज्याभिषेक होत आहे ह्मणून माझ्या ह्रदयास मोठा अनंद होतो बाई!

(पडद्यापलीकडे वसिष्ठ बोलतो)

### श्लोक.

ठेवा येथ सुवर्णभेरिजवळीं सत्पुष्प गंधाक्षता,
छत्री, दोन सुचामरां, शुभजलें पूर्ण सुकुंभा अतां.
कन्या कांहिं, तसेंच अश्व, गज तों येथें असोंद्या बरें,
ठोका नौबदि, होतसे रघुवरा पट्टाभिषेक त्वरें.

**जनक.**—हां! ही वसिष्ठादिक मंडळी आज्ञा करीत आहे.

**शत्रु०**—(पडद्या बाहेर येऊन ह्मणतो) रावजी, सर्व मंडळी आली.

( ततः प्रविशति वसिष्ठः )

**वसिष्ठः—** सखे कौशिक, सीतारामावस्मिन् रत्नसिंहासने निवेश्य महर्षिभिरन्यैश्च सहाभिषिचावः.

**कौशिकः—** यथा रोचते मैत्रावरुणाय.

**जनकः—** कथमभिषिक्त एव रामभद्रः, क्षौमाभरणाद्यमितप्रीतिदानैः संभावयति पौरजानपदान् । कथं दिवि देवदुंदुभिध्वनिः पुष्पवृष्टिरप्सरसां नटाभटीच ।

**कौशिकः—** वत्स, भूयः किं ते प्रियमुपहरामि ?

**रामः—** ( सहर्ष )

निर्विघ्नं मम जानकीपरिणयो जातः प्रसादेन ते,
पौलस्त्यं सगणं विजित्य समरे प्रत्याहृतेयं प्रिया,
दृष्टोयं भरतश्चिराभिलषितो, राज्याभिषेकोपि मे
लब्धः, किं प्रियमस्ति मेऽत्र भुवने ? यत्साधनीयं त्वया.५१

तथापीदमस्तु.

( भरतवाक्यम् )

आचंद्रार्कमिदं भवेदविरलं गोब्राह्मणेभ्यः शुभं,
भूपस्त्वामनुवृत्तिभिरिति प्रत्यैरमी राजभिः

( तदनंतर वसिष्ठ पडद्याबाहेर येतो. )

**वसिष्ठ—** अहो **कौशिक, रामचंद्र** व **सीता** या उभयतांस त्या-
रत्नमय सिंहासनावर बसवून महर्षि व इतर ब्राह्मण यांसहवर्तमा-
न यांस आपण अभिषेक करूं.

**कौशिक—** उत्तम गोष्ट आहे. तुमच्या विचारास जें आलें, त्या
विषयीं माझी सिद्धताच आहे. चला, तर करावा आरंभ.

**जनक—** काय! **रामभद्राचें** अभिषेक कर्म आटपून तो नगर-
वासी वगैरे लोकांस शालजोड्या, शेले, पागोटीं इत्यादि वस्त्रें, व
कडीं, तोडे, कंठ्या, चौकडे इत्यादिभूषणें देऊन त्यांची संभावना
करीत आहे कीं! अहो, स्वर्गांत दिव्य दुंदुभि वाजताहेत! देव
पुष्पवृष्टि करीत आहेत! अप्सरा नृत्य करीत आहेत! गंधर्व गा-
यन करीत आहेत! असी या समयीं मंगलोत्सवाची मोठी धमाक
होऊन सर्वजन आनंदभरित झाले आहेत! अहाहा! केवढा सु-
दिन हा!

**कौशिक.—** वत्सा **रामभद्रा,** या उपर तुला कोणती इच्छा आहे,
सांग, ती मी पूर्ण करीन.

**राम—** ( हर्ष पावून )

**श्लोक.**

गेला सिद्धिस **जानकीपरिणय,** मरण्यात शत्रू[1] रणीं,
मारोनी अणिलें प्रियेस, **भरताही** भेटलों, या क्षणीं,
झालें प्राप्त मला स्वराज्य तुझिया पूर्ण प्रसादें भलें,
मागावें तुजपासि मी अजि असें कांहीं नसे राहिलें,
तथापि देणारच तर हें द्यावें.

( सूत्रधाराचें वाक्य. )

गाई, ब्राह्मणमंडळी सुखि असो आदित्यचंद्रावधी[2],
काव्यज्ञां, सरसा कवींस नृपती देवो धनाचे निधी,

टीप—१ रावण. २ जोंपर्यंत चंद्रसूर्य आहेत तोंपर्यंत.

लाल्यंतां सरसोक्तयश्च कवयः शश्वद्रसज्ञैः समं,

स्यादेतस्य कवेश्च भक्तिरचला देवे रघूणां प्रभौ ६०

( इति निष्क्रांताः सर्वे )

( सप्तमांकः ७ )

इति श्रीरामभद्रदीक्षितविरचितजानकीपरिणयं

नाटकं समाप्तं.

सन्मार्गी श्रुतिसाधुवृद्धभजनीं प्रीती नृपाची असो,
रामाच्या पदपंकजीं दृढमती याही कवीची वसो.
( असें बोलून सर्व निघून जातात ).

## सातवा अंक समाप्त.

---

## भाषांतरकर्त्याचे श्लोक.

ज्याचा तात असे सदाशिव कृती, माता सती पार्वती,
गांव त्र्यंबक हें, गणेश अभिधा, लेले उपाख्याहि ती,
त्यानें नाटक रम्य हें उतरिलें भाषांतरीं प्राकृतीं,
देखावी रसिकें जनें अभिनवा अत्यादरें ही कृती.
जें कां नाटक जानकीपरिणय प्रख्यात लोकीं असे,
त्याची अद्भुत संविधानरचना नाट्यांतरीं ती नसे,
त्यातें प्राकृत मी करूनि रसिकां अत्यादरें अर्पिलें,
दोषांचे गण टाकुनी गुणलवा घेवोत ते यांतले.

## आर्या.

सत्राशें चौऱ्यांशीं शककालीं कार्तिकांत पुनवेस
गेला श्रीशदयेनें निर्विघ्न ग्रंथ हा समाप्तीस.

## समाप्त.